# आनंदाचें साम्राज्य

## व इतर प्रवचनें




ग्रंथकार

**जे. कृष्णमूर्ति**


---


भाषान्तरकार

श्री. देवीदास भास्कर लेले, बी. ए.

श्री. शिवराम नारायण कानविंदे, बी. ए.


---


प्रकाशक—गणेश महादेव आणि कंपनी

६०८ सदाशिव पेठ, पुणें शहर


---


किंमत सव्वा रुपया

# संपादकाची विज्ञप्ति

गेलीं कित्येक वर्षें '**धर्मजागृति माला**' नामक एक पुस्तकमाला चालू असून त्या मालेचीं सात पुस्तकें पूर्वीच प्रसिद्ध झालेलीं आहेत. "**मरणोत्तर स्थिति व परलोकविद्या**" हें या मालेचें आठवें पुस्तक असून "**आनंदाचें साम्राज्य**" हें प्रस्तुतचें पुस्तक नववें होय. या मालेच्या व्यवस्थेंत आतां फरक करण्यांत आलेला आहे. यापुढें या मालेच्या पुस्तकांस धर्मजागृति माला असें वेगळें नांव देण्यांत येणार नाहीं. **गणेश महादेव आणि कंपनी, ६०८ सदाशिव पेठ, पुणें शहर,** हे यापुढील पुस्तकें प्रसिद्ध करतील. पुस्तकांचें संपादकत्व आमच्याकडे राहील. पुस्तकाच्या बांधणीचे दोन प्रकार यापुढें ठेवण्यांत येणार नाहींत. **पूर्वी झालेल्या कायमच्या वर्गणीदारांस पूर्वीचीं व भावी पुस्तकें पाऊणपट किंमतीस मिळतील.** ज्यांस नवीन कायम वर्गणीदार होणें असेल त्यांनीं गणेश महादेव आणि कंपनी यांजकडे **१ रु. प्रवेश फी** पाठवून कायम वर्गणीदारांच्या पटांत आपलें नांव नोंदवावें. त्यांस पुढील सर्व पुस्तकें व पाहिजे असलेलीं मागील पुस्तकें पाऊणपट किंमतीस मिळतील. मालेंतील पुस्तकांचा दर्जा पूर्वीप्रमाणेंच राहील. दरसाल सुमारें दीडशें पानांचीं तीन किंवा चार पुस्तकें प्रसिद्ध करण्याचा संकल्प आहे. पुढील पुस्तक "**परलोकचा प्रवास**" हें आहे.

मराठी पेहेरावांत हें पुस्तक प्रसिद्ध करण्याची परवानगी माजी पूर्वतारक-संघाचे हिंदुस्थानचे प्रतिनिधि मि. एन्. एस्. रामराव यांनीं दिली त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

ठाणें,
जानेवारी १९३० } राजाराम सखाराम भागवत,

संपादक

# अनुक्रमणिका







# उपोद्घात

लेखक—श्री. **राजाराम सखाराम भागवत, एम्. ए.**

या पुस्तकांतील सर्व व्याख्यानें मि. जे. कृष्णमूर्ति यांचीं आहेत. मि. कृष्णमूर्ति यांचेसंबंधानें अलीकडे वर्तमानपत्रांतून सर्व जगभर बराच बोलबाला झालेला आहे. कित्येक माणसें त्यास जगद्गुरु म्हणत आहेत. तारकसंघ किंवा The Order of the Star नांवाची एक संस्था गेलीं अनेक वर्षे अस्तित्वांत होती व सर्व जगभर तिचा प्रसारही झालेला होता. त्या संस्थेचें मि. कृष्णमूर्ति यानीं कांहीं दिवसापूर्वीं विसर्जन केलें असलें तरी ती संस्था जोंवर विद्यमान होती तोंवर ते तिचे अधिपति होते. मि. कृष्णमूर्ति यांचा त्या संस्थेशीं निकट संबंध असल्यामुळे त्यांच्या विचाराचें मर्म समजण्यासाठीं वाचकांस त्या संस्थेचीही माहिती असणें जरूर आहे. पण त्या संस्थेसंबंधानें किंवा मि. कृष्णमूर्ति यांचेसंबंधानें वर्तमानपत्रांत जरी वारंवार अनेक बातम्या येत असल्या तरी त्या दोहोंसंबंधींची विश्वसनीय अशी माहिती बहुतेक लोकांस नाहीं; उलट अनेक चुकीचे ग्रह मात्र पुष्कळ मंडळींत पसरलेले दिसून येतात. अशा स्थितींत मि. कृष्णमूर्ति यांचे विचार, त्यांचें चरित्र, त्यांचा तारकसंघ वगैरे अनेक गोष्टींसंबंधींची खरी माहिती वाचकांसमोर ठेवणें अवश्य झालें आहे. ती माहिती संगतवार मिळावी या हेतूनें हा उपोद्घात आम्ही लिहीत आहों. तो काळजीपूर्वक वाचल्यास वाचकांचे अनेक गैरसमज दूर होतील व मि. कृष्णमूर्ति यांच्या विचाराची दिशा ध्यानांत येणें वाचकांस सुलभ होईल असें आम्हांस वाटतें.

## मि. कृष्णमूर्ति यांचें चरित्र

मि. कृष्णमूर्ति यांचा जन्म तारीख ११ मे १८९५ रोजीं मद्रासेकडील एका ब्राह्मणकुळांत मदनपल्ली येथें झाला. त्यांची मातोश्री त्यांच्या लहानपणींच निवर्तली. त्यांचे वडील थिऑसफिकल सोसायटीचे सभासद होते व पेनशन घेतल्यावर आपल्या कुटुंबांतील माणसांसह कांहीं काळपर्यंत सोसायटीचें मुख्य पीठ जें अड्यार तेथें ते रहात होते. १९०९ सालीं कृष्णमूर्ति हे आपल्या

वडिलांसह अडयार येथें असतांना त्यांची आणि डॉ. बेझंट व मि. लेडबीटर यांची गांठ पडली. डॉ. बेझंट यांनीं याच सुमारास त्यांच्या शिक्षणाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली व त्यांस शाळेंतून काढून आपल्या देखरेखीखालीं त्यांचे शिक्षण सुरू केलें. १९१० सालीं म्हणजे आपल्या वयाच्या चवदाव्या वर्षीं मि. कृष्णमूर्ति यांनीं At the Feet of the Master या नांवाचें पुस्तक लिहून प्रसिद्ध केले. या पुस्तकाचीं जगांतील बहुतेक भाषांत भाषान्तरें झालीं आहेत व मराठींत 'साधनचतुष्टय' या नांवानें ते पुस्तक प्रसिद्ध आहे. पुढें लवकरच Education as Service हें दुसरें पुस्तक त्यानीं लिहिलें. डॉ. ॲनी बेझंट यांनीं मि. कृष्णमूर्ति यांचे शिक्षण खासगी रीतीनें सुरू केल्यानंतर त्यानीं हिंदुस्थानांत व इतर देशात शिक्षणाकरिता त्याचेकडून बराच प्रवासही करविला. मि. कृष्णमूर्ति याचे बहुतेक शिक्षण फ्रान्स व इंग्लंड या देशांत डॉ. ॲनी बेझंट यांनीं करविलेले आहे शिक्षण संपल्यानंतर मि. कृष्णमूर्ति हे १९२१ सालीं हिंदुस्थानात परत आले व त्या सालच्या डिसेंबर महिन्यांत थिऑसफिकल सोसायटीची कन्व्हेनशन भरली होती तेथें त्यांचें पहिले सार्वजनिक व्याख्यान झाले. तेव्हांपासून ते बहुश देशोदेशीं प्रवास करीत आहेत. १९२२ व १९२५ सालीं ते ऑस्ट्रेलियांत गेले होते. अलीकडे कित्येक वर्षे हॉलंड देशांत ऑमेन गावानजिक प्रतिवर्षी एक कॉंग्रेस भरत असते व तेथें एक आठवडाभर अडीच तीन हजार मंडळी एका विस्तीर्ण उपवनांत आनंदाने रहात असतात. कृष्णमूर्ति हे या कॉंग्रेसला हजर असतात व सर्व पुढाकार त्यांचेकडेसच असतो येथें एक मोठा जुना किल्ला व सुमारें चारपांच हजार एकरांचें उपवन मि. कृष्णमूर्ति याच्या कार्यासाठीं बक्षिस म्हणून देण्यात आले आहे. कांहीं दिवस एकत्र उपवनांत राहून तेथेच परिषदा भरविण्याचा उपक्रम मि. कृष्णमूर्तींनीं जगांत इतरत्रही सुरू केला आहे. यंदा म १९२८ सालीं एक एक अशी वनपरिषद अमेरिकेंत झाली. हिंदुस्थानांतही काशी व अडयार येथें वार्षिक वनपरिषदा सुरु झाल्या आहेत. इतर अनेक ठिकाणींही अशा परिषदा भरण्याचे घाटत आहे. या परिषदांच्या व इतर सभांच्या निमित्तानें मि. कृष्णमूर्ति यांस देशोदेशीं हिंडावें लागते, व अलीकडे त्यांचा बहुतेक काळ प्रवासांत जात असतो. मुंबईस ते अनेक वेळां येऊन गेलेले आहेत.

मि. जे. कृष्णमूर्ति यांस अलीकडे अनेक लोक प्रेमानें कृष्णजी या छोट्या नांवानें संबोधीत असतात. या उपोद्घातांत आम्ही त्याच नांवाचा यापुढें उपयोग करणार आहों. कृष्णजींच्या चरित्राचे सर्व धागेदोरे नीट ध्यानांत येण्यास डॉ. ॲनी बेझंट यांच्या कित्येक मतांचा व उद्योगांचा थोडाफार विचार करणें या ठिकाणीं आवश्यक आहे. डॉ. ॲनी बेझंट या आज ८३ वर्षें वयाच्या आहेत व त्यांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमास सुमारें पंचावन्न वर्षें होत आलीं आहेत. या अवधींत त्यांनीं अनेक देशांत व अनेक क्षेत्रांत मोठी कामगिरी केली असून अखिल जगांत अग्रेसर असणाऱ्या व्यक्तींमध्यें त्यांची गणना आहे. वक्तृत्वकला, लेखनकला, स्वतंत्र विचार, धैर्य, स्वार्थ-त्याग, जाडी विद्वत्ता, हे गुण त्यांच्या अंगीं विशेष प्रमाणांत विलसत असून धर्म, राजकारण, शिक्षण, समाजसुधारणा वगैरे अनेक क्षेत्रांत त्या पुढारी आहेत. नवीन विचार करण्यांत जशा त्या अग्रेसर आहेत त्याचप्रमाणे लोकांस स्वतःसभोंवतीं गोळा करणें, निरनिराळ्या संस्था स्थापणें, इष्ट कार्याकरितां चिकाटीनें प्रचंड चळवळी करणें, या उद्योगांतही त्या तितक्याच अग्रेसर आहेत. आध्यात्मशास्त्र, योगशास्त्र, धर्म, या विषयांचा त्यांनीं १८९० साला-पासून सारखा व सप्रयोग अभ्यास केलेला असून त्या गेलीं पस्तीस वर्षें थिऑसॉफिकल सोसायटीच्या पुढारी आहेत व वीस वर्षें त्या सोसायटीच्या अध्यक्षस्थानीं निवडण्यांत आलेल्या आहेत.

## आजचा काळ

डॉ. बेझंट यांचें एक मत असें आहे कीं पृथ्वीवर ठिकठिकाणीं आज जीव-न्मुक्त माणसें विद्यमान आहेत व पृथ्वीवरील सर्व घडामोडींचीं सूत्रें हीं माणसें आंतून हलवीत असतात. हें मत हिंदु धर्मास धरून आहे हें आमच्या वाचकांच्या लक्षांत येईलच. '**शान्तो महान्तो निवसन्ति सन्तः वसन्त-वल्लोकहितम् चरंतः ।**' वसन्तऋतूप्रमाणें लोकहित करणारे असे थोर व शान्त संत पृथ्वीवर असतात हें संस्कृत वचन कित्येकांस या मताचा अनुवाद करणारें म्हणून या ठिकाणीं आठवण्याचा संभव आहे. पृथ्वीवर कांहीं व्यक्ति चिरंजीव अशा असतात, देव व ऋषी सभा करून पृथ्वीवरील घडा-मोडींची चर्चा करितात, पृथ्वीवर भलत्या गोष्टींचें वर्चस्व माजल्यास

त्याचा बंदोबस्तही तेच करतात या कल्पना आपल्या पुराणांत आहेत. डॉ. बेझंट यांचे म्हणणे असें आहे कीं या पौराणिक कल्पना जरी शब्दशः घेण्याच्या नसल्या तरी त्या मूळांत खऱ्या आहेत; व आजही योग्य अधिकार असलेल्या माणसांस पृथ्वीवरील ह्या ज्ञानी जीवन्मुक्तांशीं स्वतःचा संबंध जोडतां येतो, आणि ते जीवन्मुक्त पुरुष हल्लीं विद्यमान आहेत व पृथ्वीवरील उत्क्रान्तीचें खरें व आंतलें सूत्र त्यांच्या हातीं आहे, ह्या गोष्टींचें प्रत्यक्ष ज्ञान त्यास मिळवितां येतें. इतकेंच नव्हे, तर हिंदुधर्माच्या वाङ्मयात ज्यास '**मैत्रेय**' असें नांव आहे, बुद्धधर्मानें ज्यांस **मैत्तेय बोधिसत्व** या संज्ञेनें संबोधिलें आहे ते ऋषि आज हिमालयाच्या दक्षिण उतरणीवर सध्यां रहात आहेत असें डॉ. बेझंट यांचें म्हणणें आहे, व या बाबतींत माझी मला प्रत्यक्ष माहिती आहे असें त्यांनीं लिहिलें आहे. हे ऋषि पृथ्वीवर लवकरच प्रकट होतील असें विधान डॉ. ॲनी बेझंट यांनीं १९०९ सालीं जाहीर रीतीनें केलें. त्या सालीं लंडन येथें त्यांचीं अनेक व्याख्यानें झालीं व तीं नंतर लगेच The Changing World नामक पुस्तकांत प्रसिद्ध झालीं या व्याख्यानांत बाईंनीं असें प्रतिपादिलें होतें कीं हल्लींचा काळ हा सामान्य प्रकारचा काल नव्हे आहे, एक स्थिती मावळावी व दुसरी उजाडावी अशा प्रकारचा संक्रमणकाल हल्लीं आलेला आहे, एक युग संपून दुसरें लागण्याचा हल्लींचा समय आहे. इतिहासाचा प्रवाह अनेक शतकें संथपणानें, शान्तपणानें व सरळपणानें नीट वहात असतो, उत्क्रान्तीच्या गाड्याचीं चाकें त्या वेळीं सपाट रस्त्यावरून सावकाशीनें चालत असतात व आंतील जीवांस धक्के चपेटे फारसे सोसावे लागत नाहींत. पुढें एकदम नवें वळण येतें, जगांत फिरवाफिरव होऊं लागते, सर्व गोष्टी वायुवेगानें धावूं लागतात, आकस्मिक प्रकार वारंवार घडूं लागतात, प्रचंड घडामोडी तडकाफडकीनें होण्याची सुरुवात होते, व जुन्या काळीं शंभर वर्षांतही जीं स्थित्यंतरें लोकांस पहावयास मिळालेलीं नव्हतीं तीं नवीन काळीं एका वर्षाच्या अल्पावधींत त्यांच्या डोळ्यांसमोर घडून येतात आणि त्यामानानें माणसाची वाढ जलदीनें होऊं लागते. असल्या संक्रमणकालाशीं सध्यां जग येऊन ठेपलें आहे असा त्यांच्या या व्याख्यानाचा निष्कर्ष होता.* ह्या

*डॉ. बेझंट याच्या उपरोक्त पुस्तकात पुढील वाक्यें आहेत--

For many a century the slow course of evolution

वेळीं त्यांनीं असेंही प्रतिपादिलें कीं देहाच्या ठेवणींत आणि मनाच्या प्रकारांत भिन्न असलेले जसे हिंदी, ब्रह्मी, केल्ट, टयूटन वगैरे मानववंश सध्यां पृथ्वीवर आहेत तसा आणखी एक नवीन प्रकार लवकरच उत्पन्न होणार असून या वंशाचीं माणसें आतां वाढत्या प्रमाणांत जन्मास येऊं लागतील व मुख्यतः तीं माणसें अमेरिकेंत जन्मतील. या सर्व व्याख्यानांचा हेतु पृथ्वीवर एक महान् अधिकारी पुरुष थोड्याच काळांत अवतरतील हें स्पष्टपणें सांगण्याचा होता व त्या व्याख्यानांत We are on the thershold of a new manifestatiou and the mighty Teacher will again appear as man amongst men, म्हणजे आपण आतां नवयुगाच्या उंबरठ्यापाशीं आलेलों आहों व तो अधिकारी पुरुष जगाच्या बाजारांत हिंडण्यासाठीं फिरून एकवार येईल अशा अर्थाचें त्यांनीं स्वच्छ विधानही केलेलें होतें.

## पूर्वतारक संघ

जगद्गुरूंच्या आगमनापूर्वी जगाची योग्य ती तयारी करण्यासाठीं पुढें दोन वर्षांनीं डॉ. बेझंट यांच्या नेतृत्वाखालीं ‘ पूर्वतारक संघ ’ नांवाची संस्था स्थापण्यांत आली व मि. कृष्णमूर्ति हे त्या संस्थेचे अधिपति नेमण्यांत आले. मि. कृष्णमूर्ति यांच्या देहांतून मैत्रेय जगद्गुरूंची जाणीव प्रगट होणार आहे, हें मला

---

goes on quietly without much of jolt or trouble, the wheels run fairly smoothly and continuously with little of shock. Then suddenly comes a change in which all movement is rapid, in which catastrophies are frequent, in which sudden changes make themselves felt, in which men grow in a year more than their forefathers grew perhaps in a century. In such a transition age again the world is standing at the present time. निरनिराळीं वाक्यें थोडक्यांत एकत्र आणण्यासाठीं व व्याकरणदोष टाळण्याकरितां मूळांतले शब्द क्वचित् येथें फिरवावे लागले आहेत.

त्या वेळीं अंतरंगाच्या भूमिकेवर समजलेलें होतें असें बाईंनीं अलीकडे सांगितलेले आहे. त्याच अंतर्ज्ञानावर विसंबून राहून डॉ. बेझंट यांनीं कृष्णजींच्या शिक्षणाची जबाबदारी आपल्या अंगावर घेतली होती. कृष्णजींच्या वडिलांपासून कायदेशीर कागदपत्र करवून कृष्णजींस त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतलें, शिक्षणाच्या खर्चाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली व शिक्षण उत्कृष्ट व्हावें म्हणून त्यांची इंग्लंडला रवानगी करून दिली.† कृष्णजींचे वडील वृद्ध व जुन्या समजुतीचे होते. डॉ. बेझंट यांच्याउलट असलेल्या मद्रासेकडील थिऑसफीच्या विरोधकांनीं कृष्णजींच्या वडिलांस बाईंच्याविरुद्ध चिथाविलें. तुमचे मुलगे परदेशीं गेले आहेत, त्यांचेवर जातिबहिष्कार पडेल, डॉ. बेझंट तुमच्या मुलांस ब्रह्मचारी रहावयास सांगतील व त्यांचीं लग्नें होऊं देणार नाहींत, तुम्ही आपलीं मुलें मिसेस बेझंट यांस विकलीं आहां, आतां तुम्ही आपल्या मुलांस मुकलांत वगैरे नानाप्रकारच्या गोष्टी या विघ्नसंतोषी मंडळींनीं कृष्णजींच्या वडिलांच्या मनांत भरविल्या व त्यांच्या मुखानें थिऑसफिकल सोसायटीमधील एक पुढारी मि. लेडबीटर यांचेवर अनीतिमत्तेचे आरोपही करविले; आणि पुढें या गोष्टी विकोपास जाऊन कृष्णजींस पुनः माझ्या ताब्यांत द्यावें अशी त्यांच्या वडिलांनीं डॉ. बेझंट यांस नोटीस दिली व हें प्रकरण कोर्टांत गेलें. ही केस मद्रास हायकोर्टांत चालली व जज्जानें निकाल दिला कीं, कृष्णजींच्या वडिलांनीं खोटा पुरावा देऊन अनीतिमत्तेचे आरोप रचले आहेत, व हे अनीतिचे आरोप सिद्ध झालेले नाहींत. पण मुलावर बापाचा हक्क आहे व जरी बापानें बाईंस कायदेशीर कागद करून दिला असला तरी तो कागद रद्द करण्याचा त्यास अधिकार आहे. यासाठीं बाईंनीं मुलांस बापाच्या ताब्यांत परत द्यावें, आणि जर बाईंनीं मुलांच्या शिक्षणाप्रीत्यर्थ पैसा खर्च केला असेल तर बापावर वेगळी फिर्याद करून आपले पैसे त्यांनीं वसूल करून घ्यावे. या निकालावर हायकोर्टच्या अपिलेट बाजूकडे बाईंनीं अपील केलें. अपिलांत खालील निकाल कायम करण्यांत आला. पुढें बाईंनीं प्रीव्ही कौन्सिलकडे अपील केलें. या वेळीं

† कृष्णजींच्याबरोबर मि. जे. नित्यानंद नांवाच्या त्यांच्या लहान बंधूंच्या शिक्षणाची जबाबदारीही बाईंनीं आपल्या शिरावर घेतली होती. पण पुढें नित्यानंद बरेच वर्षें क्षयानें आजारी होते, व त्यांतच त्यांचा अंत झाला.

मुलांच्या वतीनें एक वकील देण्यांत आलेला होता. प्रीव्ही कौन्सिलनें मुख्य विचार केला तो बापाच्या हक्काचा न करतां मुलांच्या हिताहिताचा केला, व डॉ. बेझंट यांच्या ताब्यांत असतांना मुलांचें जितकें चांगलें शिक्षण होत होतें तितकें चांगलें शिक्षण बापाच्या हातून होणार नाहीं, व कृष्णजी जवळजवळ अठरा वर्षांचे झाले आहेत, त्यांची बापाकडे जाण्याची इच्छा नाहीं, वगैरे गोष्टी प्रीव्ही कौन्सिलनें लक्षांत घेतल्या, व आपल्या मुलावरील हक्काचा उपयोग बापानें केल्यामुळें जर मुलाचें नुकसान होत असेल तर तो हक्क आम्हीं मान्य करीत नाहीं असा निकाल दिला. अशा रीतीनें कृष्णजी डॉ. बेझंट यांचे ताब्यांत राहिले व त्यांच्या शिक्षणांत व्यत्यय येण्याचें टळलें. प्रीव्ही कौन्सिलचा हा निकाल १९१४ सालीं झाला.

## कृष्णजींच्या अंतर्यामींचीं स्थित्यंतरें

पुढें कृष्णजींचें शिक्षण नीटपणे तडीस गेलें व ते संपल्यावर The Path Towards Dicipleship, Self-Preparation वगैरे पुस्तकें त्यांनीं प्रसिद्ध केलीं. या काळांत जसें कृष्णजींचें लौकिक शिक्षण सुरू होतें त्याचप्रमाणें अंतरंगाचा विकासही जलदीनें होत होता. त्यांनीं आध्यात्ममार्गावर स्वतःची विशेष प्रगति करून घेतली व स्वतःचा असा मोठा अधिकार संपादन केला. त्याविषयींचा तपशील येथें देणें अप्रस्तुत असल्यामुळें आम्ही तो येथें दिलेला नाहीं. अगदीं अलीकडे म्हणजे १९२५–२७ या सालांत कृष्णजींच्या अंतरंगांत पुष्कळच बदल झालेले आहेत. १९२५ सालच्या डिसेंबर महिन्यांत अड्यार येथें व्याख्यान देत असतांना एका प्रसंगीं त्यांच्या चर्येंत व वाणींत एकदम फरक पडला व

ज्यांना सहानुभूतीची अपेक्षा आहे,
ज्यांना सुख, समाधान पाहिजे आहे,
ज्यांना क्लेशांतून मुक्त होण्याची तळमळ लागली आहे,
ज्यांना सर्व परिस्थितींत सुख सांपडावें अशी उत्कंठा लागली आहे,
त्यांच्यासाठीं मी येत आहें.
मी सुधारण्यासाठीं येत आहें,
विध्वंसासाठीं नव्हे.

मी मोडण्यासाठीं येत नाहीं,
घडण्यासाठीं येत आहें.

असे जगद्गुरूंचे शब्द त्यांच्या मुखांतून बाहेर पडले. त्यानंतर जो काळ आजवर लोटला आहे त्या काळांत कृष्णजींच्या अंतरंगांत आणखी बराच फेरबदल झालेला आहे. डॉ. बेझंट यांनीं त्यांचेविषयीं पुढील उद्गार काढले आहेत—"त्या दिवसापासून कृष्णजींच्यामध्यें शीघ्रगतीनें एकसारखे फेरबदल होत आले आहेत. त्यांनीं लिहिलेल्या कविता वाचल्यास ते फेरबदल ध्यानांत येण्याजोगे आहेत. जगद्गुरूंच्या जाणीवेचा जो अंश मानवदेहाच्या मर्यादेंतून प्रकट होऊं शकेल त्या अंशांशीं कृष्णजींची जाणीव मिळून गेली आहे. ......आपल्या हिमालयस्थ निवास-स्थानामध्यें तेजःपुंज देह धारण करून राहिलेले जे जगद्गुरु, सर्वसमर्थ व सर्वसाक्षी जे जगद्गुरु, त्यांचें मला प्रत्यक्ष ज्ञान आहे. त्या दूरस्थ हिमालयावर, त्या तेजस्वी देहांत जे जगद्गुरु आहेत, तेच जगद्गुरु खरोखरी ह्या मृण्मय देहांत वास करून आहेत; मानवदेहांत ते आले असून मानवदेहरूपी मर्यादित साधनाच्याद्वारानें ते प्रकट होत असल्यानें मीं त्यांस वंदन करीत आहें. जें रूप ते धारण करतील त्याची सेवा करण्याचा माझा संकल्प आहे व या पार्थिव जगतांत ती त्यांची सेवा माझ्या हातून घडावी हें माझें महद्भाग्य होय असें मी समजतें."†

कृष्णजींनीं स्वतः १९२७च्या ऑगस्टमध्यें हॉलंड देशांत "सत्याचें उगमस्थान कोठें असतें ? या नांवाचें जें व्याख्यान दिलें आहे त्यांत वरीलप्रमाणेंच उद्गार त्यांनीं काढलेले आहेत. ते म्हणतात—

मी गुरु आहें असें मी आज म्हणत आहें. पण गुदस्तां मला तसें म्हणतां आलें नसतें. गुदस्तां झालीं मी तसें म्हणतों तर तें अप्रामाणिकपणाचें झालें असतें, असत्य झालें असतें; कारण गुदस्तां मजमध्यें उगम आणि अंत यांचा संगम झालेला नव्हता. अर्थात् मी गुरु आहें असें बोलण्यास मी समर्थ नव्हतों. आतां मला तसें म्हणतां येत आहे; कारण आतां मी माझ्या आत्मसख्याशीं एकजीव झालों आहें. बालबोध झालों आहें...तो अनुभव ज्यांस प्राप्त झालेला नाहीं त्यांस तो देणें

† पहा The Star, जानेवारी १९२८ पृ. १० व ११.

हें माझें कर्तव्य आहे, माझा तो धर्म आहे, मला त्यांत आनंद आहे....... पृथ्वीवर हिंडून जगास शिकविणें हें मला अगदीं सोपें आहे.......मला पाहिजे होतें तें मला मिळून गेलेलें आहे. त्या आत्मसत्याशीं मला सायुज्यता प्राप्त झालेली आहे व तो आणि मी असे जोडीनें जगाच्या पाठीवर सर्वत्र संचार करणार आहोंत !†

## खऱ्याखोट्याचा निर्णय

येथें आमच्या वाचकांच्या मनासमोर एक प्रश्न उभा रहाण्याचा संभव आहे. तो असा कीं या गोष्टी खऱ्या आहेत हें कशावरून ? डॉ. बेझंट यांनी कृष्णजींसंबंधानें जीं विधानें केलीं आहेत तीं खरीं किंवा खोटीं हें इतरांनीं कसें ठरवावयाचें ? 'माझी माहिती अंतरंगाच्या भूमिकेवरून मी मिळविली आहे' असें जरी डॉ. बेझंट या म्हणत असल्या तरी ती माहिती खरोखरीच अंतरंगाच्या भूमिकेवरून त्यांनीं मिळविली आहे व ती विश्वसनीय आहे असें सामान्य जनतेनें कशाच्या आधारावर म्हणावें ? या प्रश्नास उत्तर असें आहे कीं कोणत्याही गोष्टीचा कायमचा निकाल त्या गोष्टीचा अनुभव घेतल्यावरच लागूं शकतो. ज्यास स्वतःचें अंतर्ज्ञान आहे त्यासच दुसऱ्याचें अंतर्ज्ञान कितपत बरोबर वा चुकीचें आहे तें नक्की सांगतां येईल. ज्याच्यापाशीं अंतरंगाच्या भूमिकेवरचीं, सत्यासत्य निर्णयाचीं स्वतःचीं खरीं मापें नाहींत त्यांस दुसऱ्या माणसाच्या आंतरनुभवाचें खरें वजन सांगतां यावयाचें नाहीं. याचा अर्थ उघड असा होतो कीं ज्याचा स्वतःचा अंतःश्चक्षू नीट उघडलेला नाहीं, ज्याला अंतरंगांतील गोष्टीचें नीट निरीक्षण करण्याची स्वतःची शक्ति आलेली नाहीं त्यास दुसऱ्या माणसाचें अंतरंग-ज्ञान खरें आहे कीं खोटें आहे, त्यांत किती भाग श्रद्धेय व किती हीणकस आहे याचा स्पष्ट व अखेरचा असा निर्णय देतां येणार नाहीं. हा सिद्धान्त तत्त्वतः सत्य आहे हें आम्हांस कबूल आहे; पण जरी स्वतःच्या अंतरंग-विकासाविना दुसऱ्या माणसाच्या अंतर्ज्ञानाची खरी पारख माणसास करतां येत नसली तरी सामान्य माणसासही— ज्याचा अंतश्चक्षु मुळींच उघडलेला नाहीं अशा माणसासही—दुसऱ्याच्या अंतर्ज्ञानाचा आजवर आपणांस कितपत पडताळा आलेला आहे, या गोष्टी-

---

† हें व्याख्यान या पुस्तकांत पुढें समग्र आलेलें आहे.

वरून त्या अंतर्ज्ञानाच्या विश्वसनीयतेबद्दल कांहीं अनुमान करतां येईल. उदाहरणार्थ, एखाद्या माणसानें अंतर्ज्ञानानें कांहीं गोष्टी जर अगोदर सांगितल्या व मग जर त्या खरोखरीच तशा घडून आल्या तर माणसाचें अंतर्ज्ञान श्रद्धेय आहे असें म्हणणें सयुक्तिक ठरेल. डॉ. बेझंट यांनीं अशा ज्या गोष्टी पूर्वी सांगितल्या होत्या त्या आजपावेतों कितपत खऱ्या झाल्या आहेत याचा विचार करून त्यांचें अतर्ज्ञान खरें कीं खोटें याचे चांगलेंच अनुमान आपणास बांधतां येईल. ज्यांत काकतालीय न्याय नाहीं, ज्या गोष्टी प्रथम लोकांस अगदीं वेडगळपणाच्या अशा वाटत होत्या त्या नंतर खऱ्या झाल्याचीं कित्येक उदाहरणें येथें नमूद करण्याजोगीं आहेत. त्या उदाहरणांचा शान्त मनानें विचार केल्यास डॉ. बेझंट यांचें म्हणणे अनेकवार खरें ठरल्याचें वाचकांच्या लक्षांत येईल व त्यांचें अंतर्ज्ञान विश्वसनीय आहे असें अनुमान त्यावरून निघूं शकेल. हीं उदाहरणें आपण क्रमानें थोडक्यांत पाहूं:—

( १ ) सबंध जग हें एका संक्रमण—कालाशीं येऊन ठेपलें आहे, या संक्रमण-कालांत सबंध जगभर प्रचंड घडामोडी होतील, जुन्या गोष्टींत फार मोठे फेरफार होतील, उत्क्रान्तीचा गाडा संथपणानें पुढें न जातां खांचा खळग्यांतून धक्के खात जाऊं लागेल, आकस्मिक गोष्टी व सर्व क्षेत्रांतील उलथापालथ यांचें साम्राज्य या संक्रमणकालीं सुरू होईल, असें भविष्य १९०९ सालीं डॉ. बेझंट यांनीं आपल्या The Changing World नामक पुस्तकांत केले होतें हें आम्ही वर सविस्तर सांगितलेंच आहे. १९०९ सालीं हें भाकित हास्यास्पद वाटलें होतें, पण आज तें खरें ठरलें आहे व हल्लींचा काळ नेहेमींच्या काळासारखा नाहीं हें सर्वांसच दिसून येत आहे.

( २ ) अमेरिकेंत एका नवीन उपवंशाचीं माणसें जन्मास येतील असें भाकित त्याच सालीं डॉ. बेझंट यांनीं केलेलें होतें; हीही गोष्ट लोकांस त्या वेळीं मूर्खपणाची वाटत होती. पण नव्या प्रकारचीं मुलें अमेरिकेत कित्येक ठिकाणीं जन्मास येत आहेत, या मुलांची मनोवृत्ति व त्यांच्या चेहऱ्याचें वळण, यांत कांहीं निराळेपणा आहे ही गोष्ट आतां सिद्ध झालेली आहे. असल्या मुलांच्या-करितां कांहीं ठिकाणच्या शाळांत निराळे वर्ग काढणें जरूर झालें असून या विषयावर वर्तमानपत्रांतही चर्चा येऊं लागली आहे. डॉ. हृड्लिका ह्या विषया-

वरील एक प्रमुख व अधिकारी शास्त्रज्ञ आहे व हीं माणसें कदाचित् एका निराळ्या उपवंशाचीं असूं शकतील असें त्यानें लिहिलें आहे.

( ३ ) कृष्णजींसंबंधींची जी कोर्टांत केस चालू होती तीविषयींची हकीकत वर दिलीच आहे. प्रथम ही केस मद्रास हायकोर्टांत चालली, मग त्याच हायकोर्टांत अपील चाललें व दोन्ही वेळीं डॉ. बेझंट यांस अपयश आलें. या वेळीं डॉ. बेझंट यांच्या अनुयायामध्यें निराशेची कांहीं छाया पडली होती. डॉ. बेझंट यांनीं या दोन्ही निकालाच्या वेळीं थिऑसाफिकल सोसायटींत लेखनाने व भाषणानें असें प्रतिपादिलें होतें कीं या केसच्या मूळाशी लोकोत्तर अशा कांहीं गोष्टी आहेत, नुसत्या दृश्य व लौकिक बाबींखेरीज इतर अंतरंगांतील महत्त्वाच्या गोष्टी या केसशीं संलग्न आहेत, व जरी प्रारंभीं मला या केसमध्यें अपयश आलें तरी कृष्णजींचे शिक्षण सरशेवटीं माझ्याच हातीं राहील; तेव्हां माझ्या अनुयायांनीं कोर्टाच्या प्रतिकूल निकालानें हिरमुष्टी होऊं नये, शेवटीं मला या कार्यांत यश येईलच येईल. पुढें प्रीव्ही कौन्सिलचा निकाल बाईस अनुकूल असा झाला व त्यांचें म्हणणें खरें ठरलें. या वेळीं डॉ. बेझंट यांचेविरुद्ध हिंदुस्थानांतील लोकमत खवळलेलें होतें व मद्रास हायकोर्टाचा निकाल बाईच्या विरुद्ध झाला हें पाहिल्यावर तो पुढें फिरेल असा संभव कोणासही तेव्हां वाटत नव्हता. या निकालावर त्या वेळीं केसरीनें एक मोठा अग्रलेख लिहून डॉ. बेझंट यांचेवर झोड उडवून दिली होती. हा अग्रलेख वाचल्यास आतां हा निकाल फिरत नाहीं, याविषयीं जनतेस किती खात्री वाटत होती त्याची कल्पना कोणासही येईल. ज्या माणसांस भूतभविष्य समजण्याचें अंतर्ज्ञान आहे, त्यांस कोर्टाचा निकाल आपल्याविरुद्ध जाईल, ही नाकासमोरची गोष्ट कशी दिसली नाहीं असा टोमणा त्या वेळीं केसरीनें मिसेस बेझंट यांचेवर मारला होता. पण सरतेशेवटीं डॉ. बेझंट यांच्या अपेक्षेप्रमाणेंच या प्रकरणाचा शेवट लागला.

( ४ ) कृष्णजी हे तेरा चवदा वर्षांचे असतांना डॉ. बेझंट यांनीं त्यांस आपल्या ताब्यांत त्यांच्या शिक्षणाकरितां घेतलें. कृष्णाजी त्या वयांत तरतरीत व हुशार असे मुळींच नव्हते $ हा मुलगा थोडा मंद व बावळट

$ १९१३ सालीं Veritas ह्या टोपणनांवाच्या एका ग्रंथकारानें Mrs Besant and the Alcyone Case नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें होतें.

आहे व यासाठींच त्याचे देव्हारे डॉ. बेझंट ह्या माजवणार आहेत, अशी त्यांच्याविरुद्ध असणाऱ्या लोकांची तक्रार होती. तेरा चवदा वर्षांचा मुलगा पुढे कसा काय निपजेल हें लौकिक ज्ञानाच्या जोरावर कोणासही नक्की सांगतां येणार नाही. आज कृष्णजी हे सामान्य माणसापेक्षां कांहीं अधिक अधिकाराचे पुरुष आहेत ही गोष्ट सर्वमान्य झाली आहे. ते जगद्गुरु आहेत असें आज पुष्कळांस वाटत नसेल. (त्या गोष्टीचा निकाल पुढे लागेल.) पण ज्यानें ज्यानें त्यांचेविषयींची नीट चौकशी केली आहे त्या प्रत्येकास सामान्य माणसापेक्षां ते वरच्या दर्जाचे पुरुष आहेत याविषयींची खात्री पटलेली आहे. बुद्धीनें मंद असलेला तेरा चवदा वर्षांचा मुलगा डॉ. बेझंट यांनीं अंतर्ज्ञानाच्या जोरावर हातीं धरावा व तो सामान्य माणसापेक्षां अधिक योग्यतेचा असा निपजावा यावरून काय निष्पन्न होतें बरें? ज्यांस यांत फक्त काक-तालीय न्याय दिसत असेल त्यांनीं असलीं दुसरीं उदाहरणें दाखवून द्यावीं.

(५) डॉ. बेझंट या १९१७ सालच्या राष्ट्रीय सभेच्या अध्यक्ष होत्या. त्या वेळीं युरोपांतील महायुद्ध चालू होतें व तें किती दिवस लांबेल व शेवटीं कोणास विजय मिळेल याची मोठमोठ्या तज्ज्ञांसही त्या वेळीं कल्पना नव्हती. कांग्रेसच्या अध्यक्ष–पीठावरून बाईंनीं जें भाषण केलें त्यांत महायुद्धास अनुलक्षून बाई म्हणाल्या, To me speaking for a moment not as a politician but as a student of spiritual laws, its end is sure (मी मुत्सद्दी या नात्यानें बोलत नाहीं, तर क्षणभर आध्यात्मशास्त्रजिज्ञासू म्हणून म्हणतें कीं या युद्धांचा एकच शेवट ठरलेला आहे.) व जर्मनी या युद्धांत हरेल असें त्यांनीं लगेच भाषणांत बोलूनही

---

या पुस्तकांत डॉ. बेझंट यांचेवर कृष्णजींच्या वडिलांनीं केलेल्या फिर्यादीची हकीकत आहे. कृष्णार्जींच्या वडिलांस फिर्यादीबाबत पैशाची मदत करण्याकरितां तें प्रसिद्ध करण्यांत आलें होतें. त्यांत पृ. ३३ वर पुढील वाक्य आहे-- Krishnamurti had been known at the Mylapore boy's school as a dull boy (म्हणजे मैलापूर येथील मुलांच्या शाळेंत असतां कृष्णमूर्ति हा मुलगा बुद्धिमंद असल्याचा लौकिक होता.)

दाखविलें. हें भविष्यही खरें ठरलें आहे. महायुद्धाची ज्यांस धड आठवण असेल त्यांस तें युद्ध आकस्मिक रीतीनें एकदम कसें थांबलें, त्याची कल्पना मोठमोठया मुत्सद्यांसही अगोदर कशी आलेली नव्हती, या युद्धांत शेवटी काय होईल याचा चांगल्या तज्ज्ञांसही त्या वेळीं कसा पेंच पडला होता वगैरे गोष्टींचें स्मरण करून देण्याचें कारण नाहीं. अशा प्रकारची सर्वांची मनस्थिति असतानाही हें भविष्य डॉ. बेझंट यांनीं केलेलें होतें हें आमच्या वाचकांनीं ध्यानांत बाळगावें. हें भविष्य त्यांनीं १९१७ सालच्या अगोदर म्हणजे १९१४ सालीं महायुद्ध सुरू झाल्यावर नंतर लागलेच थिऑसाफिस्ट मासिकांत लेख लिहून प्रसिद्ध केलेलें होतें ही गोष्ट येथें जातां जातां नमूद करणें इष्ट होय.

आणखीही अशा गोष्टी देतां येतील; पण येथें इतक्याच पुरत. ज्या अंतर्ज्ञानाच्या जोरावर इतक्या गोष्टी पूर्वी खऱ्या झाल्या तें विश्वसनीय होय. निदान तें विचार करण्याजोगें तरी आहे असें अनुमान काढणें रास्त होय. ज्यांस स्वतःचें असें अंतर्ज्ञान नाहीं त्यांनी वरील गोष्टी शान्तपणें विचारांत घ्याव्यात व कृष्णजींसंबंधानें डॉ. बेझंट यांचें जें म्हणणें आहे तें संभवनीय आहे कीं नाहीं हें आपल्या मनाशीं निःपक्षपातबुद्धीनें ठरवावें.

## १९२७ चें साल

१९२७ च्या ऑमेन येथील कॉंग्रेसच्यानंतरचे कृष्णजी व पूर्वीचे कृष्णजी यांचेमध्यें बराच मोठा फेर दिसून येतो. त्यांच्या अगोदरच्या लेखांत व ग्रंथांत ते साधक असल्याचें दिसून येतें. नंतरच्या ग्रंथांत ते स्वतःस सिद्ध असें म्हणवितात. "मी स्वानंदसाम्राज्यांतला कायमचा रहिवासी आहें, उगम व अंत हीं मजमध्यें एकवटलीं आहेत, ज्या स्थितीस मुक्ति म्हणतात ती मी अनुभवीत आहें, माझा आत्मसखा व मी आतां कायमचे एकरूप झालों आहोंत, नदी समुद्रास मिळाल्यावर जसें तिला अनंतत्व प्राप्त होतें तसें माझें झालें आहे" ही भाषा १९२७च्या अगोदर त्यांच्या भाषणांत नसे. "सत्याचें उगमस्थान कोठें असतें ?" ह्या १९२७ च्या ऑगस्ट महिन्यांतील त्यांच्या व्याख्यानांत प्रथम ही भाषा सार्वजनिक रीतीनें जनतेसमोर आलेली दिसते. या व्याख्यानानंतर कृष्णजींनीं जें काय लिहिलेलें अथवा बोललेलें आहे त्यांत एक

नवीन वळण सर्वत्र दिसून येतें. त्यांचे नंतरचे लेख व भाषणें यांत कित्येकांस कांहीं विशेष असें वाटलेलें आहे. ते प्रत्यक्ष बोलत असतांना आपणांस कांहीं अंतरंगाचा अनुभव आला, अशी पुष्कळांस प्रचीति आलेली आहे. ते जवळ असले म्हणजे त्यांचे म्हणणें अगदीं साधे व सुबोध वाटावें, तें तात्काळ पटावें, त्यानें आपल्या हृदयांतील एक नवीन खण उघडलासें वाटावें, पण त्यांचें सान्निध्य संपलें म्हणजे आपणास पुनः त्या स्थितींत जातां येत नाहीं, जें श्रेय त्यांच्या संनिध आपणांस सांपडले होतें तें आतां हरपलें असून ते पुनः आपणास मिळत नाहीं असाही कित्येकांस अनुभव आलेला आहे. त्यांची भाषा न समजतांही कांहीं मंडळीस त्यांच्या संनिध आपल्या हृदयांत स्फूर्ति संचारल्याचा अनुभव आलेला आहे. कित्येकांस त्यांच्याशीं हस्तांदोलन करून, कित्येकांस त्यांचे ग्रंथ मननपूर्वक वाचून, कित्येकांस त्यांस दुरून पाहून व कित्येकांस त्यांची फक्त आठवण करून अंतर्यामीं त्यांची कांहीं साक्ष पटलेली आहे. ते कितीही अंतरावर असले तरी त्यांच्याशीं मनानें एकरूप होण्याचा प्रयत्न केल्यास आपल्या अंतर्यामीं कांहीं प्रत्यय येतो असा कित्येक माणसांचा अनुभव आहे. सर्वांसच असले अनुभव येतात असें म्हणणें नाहीं. अनुभव येणारांपेक्षां ते न येणारांची संख्या पुष्कळच अधिक आहे. पण बऱ्याच लोकांस परस्परसदृश अनुभव यावे यांत कांहीं तरी खोल भाग असला पाहिजे हें उघड आहे. हे अनुभव काय आहेत त्याची फोड करून सांगण्याची प्रस्तुत लेखकाची योग्यता नाहीं. पण अंतरंगाच्या विकासाची चाहूल या गोष्टींत असावी असें मात्र त्यास वाटतें.

कृष्णजी म्हणतात, मी स्वतः ज्या मार्गानें गेलों, त्या मार्गानें इतरांनीं जावें, मी स्वतः जे आत्मसुख अनुभवीत आहें, ते त्यांनीं अनुभवावें अशी माझी इच्छा आहे. पण हा प्रयत्न ज्याचा त्यानें केला पाहिजे. मी लोकांस प्रयत्नाची दिशा दाखवीन, प्रयत्न करण्याची ईर्षा व हिंमत त्यांच्यामध्यें उत्पन्नही करीन, पण मानवी उत्क्रान्तीच्या गिरिशिखरावर चढून जाण्याचें काम ज्याचें त्यानेंच केलें पाहिजे. हा वाढीचा, विकासाचा प्रश्न आहे, व मी जरी तुम्हांस सहाय्य केलें, तरी तुमची कलिका तुमची तुम्हीच फुलविली पाहिजे. या त्यांच्या बोलण्यावरून उघड आहे कीं आपण कृष्णजींच्या संनिध राहिल्यास आपल्या तोंडांत आध्यात्मशास्त्राचें जांभूळ आपोआप पडेल अशी

कोणाही शहाण्यानें अपेक्षा धरूं नये. स्वतःच्या विकासा-प्रीत्यर्थ जर लोकांस कृष्णजींचा उपयोग करून घ्यावयाचा असेल तर लोकांनींही आपल्या परीनें नेटाचा प्रयत्न केला पाहिजे असे त्यांचे म्हणणें आहे. कृष्णजींचे विचार एका दृष्टीने साधे, सोपे व बालबोध असतात. पण आपण ज्या गोष्टी गृहीत धरतो त्या त्यांनीं गृहीत धरलेल्या नसतात, आपल्या मनास ज्या भानगडींची सदा संवय झालेली असते, त्या सर्व भानगडी त्यांनी दूर सारलेल्या असतात. पूर्व-परंपरा, चालीरीति, मनाचे आग्रह, यांच्या चष्म्याशिवाय सर्व गोष्टींकडे पहा, असा त्यांचा उपदेश असतो. वाचलेले ग्रंथ व थोरामोठ्यांचीं मतें यांच्या आधारावर विसंबून न रहातां प्रत्येक माणसानें स्वतःच्या पायावर उभें राहिले पाहिजे, स्वतःचा अनुभव पदरी बांधला पाहिजे असें त्यांचें नेहेमीचें म्हणणें असतें. अर्थात् अशा तऱ्हेने नवीन दृष्टिकोण आणण्याचा येथें प्रश्न येत असल्या-मुळें कृष्णजींची शिकवण एका अर्थाने सोपी दिसली तरी दुसऱ्या अर्थानें ती समजण्यास व आचरण्यास पुष्कळच कठीण जाईल हें उघड आहे. त्यांच्या शिकवणीचा आपणांस पूर्ण फायदा घेता यावा म्हणून त्यांनीं आपल्या व्याख्यानां-तून कांहीं गोष्टी मुद्दाम सुचविलेल्या आहेत. त्या येथें पुढें आम्ही लवकरच नमूद करणार आहों. त्याचे ग्रंथ उमजण्यास त्यांपासून वाचकांस बरेंच सहाय्य होईल असें वाटतें. खेरीज त्यांवरून कृष्णजींची मनोवृत्ति कशी आहे याचीही कल्पना वाचकांस येईल. स्टारच्या संस्थेचीं जीं स्थित्यंतरें झालीं त्यांतही कृष्णजींची ही दृष्टि दिसून येत आहे. तेव्हां प्रथम येथे त्या संस्थेचा इतिहास थोडक्यांत देऊन मग त्यांच्या ग्रंथांतल्या मुद्याच्या बाबींकडे वळूं.

## कृष्णजी व स्टारची संस्था

कृष्णजींचें संवर्धन थिऑसॉफिकल सोसायटीच्या अध्यक्ष डॉ. बेझंट यांनीं केलें. त्यांचें प्रारंभीचें शिक्षण मि.लेडबीटर याच्या देखरेखीखालीं झालें कृष्णजींचा व थिऑसॉफिकल सोसायटीचा गेलीं अनेक वर्षे निकट संबंध आहे. तारकसंघाचे तर ते अध्यक्ष होते. या सर्व गोष्टींवरून आमच्या वाचकांस असें वाटण्याचा संभव आहे कीं कृष्णजींची दृष्टि बेझंट-लेडबीटर यांच्या दृष्टीसारखी असणार; तसेंच थिऑसॉफिकल सोसायटी व तारकसंघ यांतील मंडळीमध्यें जी वृत्ति बहुशः आढळते त्यासारखीच कृष्णजींची वृत्ति असणार. पण खरी स्थिति अगदीं

वेगळी आहे. थिऑसॉफिकल सोसायटी व तारकसंघ या संस्थांमधील बहुतेक लोकांचें असें मत आजवर होतें कीं, सध्यांचीं जगांतील बहुतेक कोडीं जगद्गुरूंच्या आगमनानंतर लवकरच सुटतील; ते ज्ञान शिकवितील व त्यांचे अनुयायी तें भराभर ग्रहण करतील; जग सुधारण्याचे रामबाण उपाय ते आपल्या ज्ञानशक्तीच्या जोरावर शोधून काढतील, ते उपाय अमुक एका रीतीनें अमलांत आणा अशी आपल्या अनुयायांना ते जगद्गुरु आज्ञा करितील व त्यांचे अनुयायी तदनुसार वागतील; आणि अशा रीतीनें जगांतील कोडीं सुटूं लागतील. त्यांची अपेक्षा अशी होती कीं सारासार विचार करणें, जग सुधारण्याचे उपाय शोधणें, ते अमलांत आणण्याची दिशा ठरविणे, लोकांस ज्ञान देणे वगैरे सर्व जबाबदारीचीं कामें जगद्गुरु आपल्या अंगावर घेतील; जगद्गुरूंचे विचार व त्यांनीं सुचविलेली उपाययोजना हीं सामान्य जनतेसमोर मांडणें, व ते उपाय योजण्याचा उद्योग करणें हीं कामें त्यांचे सांगकामे अनुयायी करतील; व अशा रीतीनें जग ज्ञानी होईल आणि जगांतील अडचणींच्या गांठी सुटतील. जगद्गुरु हे सूत्रधार होत; ते ज्या-प्रमाणें पुढेंमागे सूत्रें ओढतील त्याप्रमाणे त्यांचे अनुयायी यंत्राप्रमाणें अभिनय करतील, असें या संस्थेतील लोकांना वाटत होतें; व जगद्गुरु आल्यावर आपले काम सोपें होईल, त्यांचें सांगणें मन लावून ऐकणें व तदनुसार निष्ठेनें आपण वागून लोकांसही वागवणें हें त्या मानानें सोपें असलेलें काम आपणांला करावे लागेल अशी त्यांची अपेक्षा होती. मी जगद्गुरू आहें असें कृष्णजींनीं स्पष्टपणें म्हटल्यास दोन वर्षेच काय तीं होऊन गेलीं आहेत. निदान ह्या दोन वर्षांतल्या अनुभवावरून पहातां ही अपेक्षा खरी ठरण्याचा संभव फारसा आम्हांस तरी दिसत नाहीं. कृष्णजींच्या या नवीन चरित्रास नुकताच प्रारंभ झाला आहे. तेव्हां त्या चरित्राच्या भावी धोरणाचा अजमास आज नीटपणें करतां येणार नाहीं हें खरें. पण आतांपर्यंत त्यांचें जें धोरण दिसून येत आहे त्यावरून पहातां आपल्या अनुयायांनीं सांगकाम्या शिपायाचे काम करावें ही गोष्ट त्यांस अगदीं अनिष्ट वाटत आहे हें उघड दिसतें. आपण ओढलेल्या सूत्रानुसार अभिनय करणारे लोक त्यांस नको आहेत, तर योग्य प्रकारें सूत्रें ओढण्याची अक्कल असणारे सूत्रधारच त्यांस पाहिजे आहेत. " राजा बोले आणि दळ हाले " असें दळ त्यांना नको आहे.

तर राजा मरून गेला तरीही ज्या दळातील शिपाई आपली अक्कल खर्च करून योग्य त्या हालचाली आपल्या जबाबदारीवर आपण करतील असे सहकारी त्यांस पाहिजे आहेत. टोपलीभर फुलें गोळा करून तीं आपण आपल्या घरच्या अत्तरांत बुडवावीं आणि बागेतल्या दर झाडावर एकेक फूल बांधून सर्व उपवन सुगंधित करावें अशी त्याची कल्पना दिसत नाहीं. तर सबंध उपवनावर आपले सूर्यकिरण पाडून सर्व झाडातलें चैतन्य असें जागृत करावें कीं प्रत्येक झाड स्वतःच्या अंतरंगांतून प्रथम कळी उत्पन्न करील, मग ती स्वप्रयत्नानें फुलवील आणि अशा रीतीनें जगाच्या उपवनांत सुगंध सर्वत्र पसरेल ही त्याची योजना दिसते. अर्थात् लोकाना त्याच्यापासून कोणतीही गोष्ट आयती मिळण्याचा संभव दिसत नाहीं. स्वतः े फूल फुलविण्याची खटपट लोकांची लोकासच करावी लागणार आहे. थिऑसाफिकल सोसायटी व तारकसंघ यांमधील लोकांचे पूर्वीचे विचार व कृष्णजींचे विचार यात जसा भिन्नपणा आहे तद्वत् कृष्णजी व बेझंट-लेडबीटर यांच्या विचारांतही भिन्नपणा आहे. हा भिन्नपणा इतका आहे कीं, कृष्णजींचीं मते व बेझंट-लेडबीटर यांचीं मतें यांत उघडउघड पुष्कळ विरोध आहे असेंही कित्येक माणसे म्हणूं लागलीं आहेत. आम्हास तसा विरोध दिसत नाही, पण भिन्नपणा मात्र दिसतो. एक नदी पूर्ववाहिनी असली व दुसरी पश्चिमवाहिनी असली तर त्यांचे प्रवाह परस्परविरुद्ध दिशेनें वहात असतात. एकींतलें पाणी उदयाचलाकडे धांवतें व दुसरींतले अस्ताचलाकडे धावतें, आणि ज्या नावाड्यानीं आपल्या या नवखंड पृथ्वीचा अफाट विस्तार पाहिला नसेल त्यांस या नद्यांचे प्रवाह परस्परांशीं येऊन भिडतील ही कल्पनाही शक्य वाटत नाहीं. पण पुष्कळदां ते प्रवाह एकमेकांस भेटतात आणि परस्परास मिळून मग समुद्रांत लीन होतात. तद्वत् आम्हांस वाटतें कीं कृष्णजींचे विचार व थिऑसफी यांत जरी भिन्नपणा दिसला, क्वचित् विरोधही दिसला, मडम ब्लॉव्हॅट्स्की यांनीं प्रथम जगासमोर मांडलेली व नंतर बेझंट-लेडबीटर यांनीं सुधारून वाढविलेली त्या जुन्या सत्याची नवीन आवृत्ति कृष्णजींच्या विचारपद्धतीहून जरी वेगळी दिसली, तरी हा विरोध आभासिक आहे व सर्व विचार-क्षेत्र नीट प्रकाशित झाल्यावर तो नाहींसा होईल. पण हा पुढचा विचार झाला. सध्यापुरतेंच पाहिल्यास कृष्णजी व बेझंट-लेडबीटर यांच्या विचारसरणी थोड्याफार भिन्न

दिशेनें वहात आहेत हें कोणासही दिसून येण्यासारखें आहे. अर्थात् कृष्णजींची विचारसरणी नीट समजण्यास थिऑसफीचा अभ्यास पुरा पडणार नाहीं. क्षणभर थिऑसफी बाजूस ठेवून अगदीं स्वतंत्र दृष्टीने त्यांच्या विचारसरणीचा प्रत्येकाने विचार केला पाहिजे.

कृष्णजींची धर्माकडे पहाण्याची दृष्टि एक विशेष प्रकारची आहे. फूल जसें फुलते तसें माणसानें स्वप्रयत्नानें फुलावें, स्वतःच्या शक्तीचा आंतून विकास करावा, अंतर्यामीं असलेल्या जीवनाची परिपूर्ति करावी, त्या मार्गांत जे जे अडथळे असतील ते दूर करावे व अंतर्यामीं नेट धरून तें जीवन माणसानें फुलवावें या गोष्टीवर त्यांचा फार भर आहे. हे माणसास करतां येण्यास त्याची समजूत पडली पाहिजे, जीवन फुलविण्याची त्याच्या मनांत खरी हौस उत्पन्न झाली पाहिजे, तो प्रयत्न करण्याचें त्यास अगत्य वाटून त्यानें स्वतःचा तसा निश्चय ठाम केला पाहिजे असें ते म्हणतात. हाच त्यांस ‘ धर्म ’ वाटतो. पण हल्लीं जे जगांत धर्म आहेत त्यांत अशा समजुतीचा, अशा हौसेचा, अशा प्रयत्नाची परमावधी करण्याचा भाग फार थोडा आहे. त्या दिशेनें कोणत्याही धर्माची खटपट चाललेली दिसून येत नाहीं. इतकेंच नव्हे तर हल्लीं जगांतील धर्म ज्या गोष्टी करीत आहेत त्यांनीं या जीवन-परिपूर्णतेला मोठा अडथळा येत आहे. जगांतील धर्मांमध्यें आपापले अनुयायी वाढविण्याचा आज मोठा प्रयत्न दिसून येत आहे. धर्माची बाह्यरचना व संघटना जोरदार करण्याचा त्या त्या धर्मगुरूंचा सारखा कटाक्ष आहे. धर्मगुरूची गादी स्थिर करावी, आपापल्या अनुयायांस आपापल्या धर्मांचे विधि व संस्कार करण्याचा आग्रह धरावा, ते विधिसंस्कार केले असतां, तसेच धर्मशास्त्रानें घालून दिलेले नियम पाळले असतां या लोकीं तसेंच परलोकीं बक्षीस मिळेल असें त्यांच्या डोक्यांत वारंवार भरवून त्या मतांविषयीं अनुयायांच्या मनांत श्रद्धा उत्पन्न करावी; देवळें, दानें, भिक्षुक, विधि, संस्काराचें अवडंबर, धर्मांतल्या रूढी, उपासना, व्रत-वैकल्यें, हीं वाढवावीं व आपली घटना संघटित करावी असाच सर्व धर्मांचा प्रयत्न आहे. सर्व धर्मांचें या बाह्यांगाकडे, धर्माची संघटना व तिचे विधिनिषेध यांकडेसच लक्ष आहे, व अंतरंगांतील जीवन फुलविणें, माणसाची समजूत वाढविणें, त्याचा त्यास विकास करण्याच्या कामीं सहाय्य करणें या गोष्टींकडे लक्ष देण्यास कोणत्याही धर्मास आज तादृश वेळ

सांपडेनासा झाला आहे. धर्मगुरूंनीं सांगावें व अनुयायांनीं ऐकावें हाच प्रकार उत्तम होय असें सर्व धर्मांतल्या अधिकाऱ्यांस सांप्रत वाटत आहे. कृष्णजींस हा प्रकार अत्यंत अनिष्ट वाटतो. खऱ्या धन्याला नौकरानें पदच्युत करून त्यास परागंदा करावें व त्याची मालमत्ता आपण घ्यावी हे जसें कधींकधीं व्यवहारांत आपण पहातों तसें धर्मांत झालेलें आहे. धर्माच्या बाह्य गोष्टींचा, त्याच्या बाह्य घटनेचा पसारा इतका वाढला आहे कीं त्यांतल्या अंतर्जीवनाच्या ज्योतीला तेवत रहाण्यास वावच राहिलेला नाहीं. स्वतः कृष्णजी जो प्रयत्न करीत आहेत त्यांत तरी असा प्रकार होऊं नये अशी त्याची इच्छा आहे. माणसानें स्वतःच्या अंतर्यामींची वाणी कशी जागृत करावी, त्याचें ध्येय कोणतें असावे, त्यानें आपल्या मार्गावरील बांडगुळें कशीं उपटून काढावीं, त्यानें स्वतःची समजूत कशी पाडून घ्यावी, विचार-भावना यांचें भवितव्य कोणतें ठेवावें, सुखदुःखानुभवाचा उपयोग या मार्गावर कसा करून घ्यावा, वासनाविषयींचा उमज पाडून त्या कशा हातात खेळवाव्या, स्वतःच्या ध्येयाचा कसा शोध करावा, आपल्या अंतर्यामीं जीवनाची विहीर कशी खणावी, ह्या अंतरंगांतील गोष्टी कृष्णजींस मुद्याच्या वाटत आहेत. त्यांकडे दुर्लक्ष करून जर बाह्यांग पुष्ट होत असेल तर त्यांना तें नको आहे. या दृष्टीनेच त्यानीं विचार करून तारकसंघाचें यंदा त्यांनीं विसर्जन करून टाकलें आहे. जगातील धर्मांकडे आज पाहिलें तर धर्मांतला जो जिव्हाळ्याचा भाग आहे तो मरणोन्मुख झाला असून त्याचे बाह्य अवडंबर अतीशय वाढलें आहे. धर्म हा परमार्थ मिळविण्याचा मार्ग होय, ज्ञानाचें पैलतीर गांठण्याचें, ईश्वराशीं एकरूप होण्याचें साधन होय. पण जगांतील कोठल्याही धर्माची आजची स्थिती पहा. त्यांतली ईश्वरापर्यंत जाण्याची वाट आज बहुतेक बुजालेली दिसते, आणि मते व सिद्धान्त, रूढी व परंपरा, विधी व निषेध, ग्रंथ व भाष्यें, देवळें व मूर्ति, भट व भिक्षुक, आचार्यांचें पीठ व त्याचा अधिकार, अनुयायांची संख्या व त्यांची संघशक्ति या गोष्टी मात्र सर्वत्र बळावलेल्या दिसतात. कुंपणानें जसें झाडास खाऊन टाकावें तसें सऱ्या सर्व धर्मांचें झालेलें आहे; असला अनिष्ट प्रकार स्वतःच्या संस्थेत होऊं नये म्हणूनच कृष्णजींनीं वर लिहिल्याप्रमाणें स्टारची संस्था (तारकसंघ) नुकतीच मोडून टाकली,आहे. "पूर्व तारकसंघ" नांवाची संस्था १९११ सालीं प्रथमतः स्थापण्यांत आली, व कृष्णजींस

त्या संस्थेचे अधिपति करण्यांत आलें. डॉ. बेझंट, मि. लेडबीटर, डॉ. ॲरंडेल वगैरे थिऑसफिकल सोसायटींतील सुप्रसिद्ध माणसें या संस्थेंत प्रमुख होतीं. जगद्गुरु पृथ्वीवर लवकरच येणार आहेत, त्यांच्या आगमनाचा लोकांना नीट फायदा घेतां यावा यासाठीं त्यांनीं स्वत:ची चित्तशुद्धि केली पाहिजे, त्यासाठीं कांहीं सद्‌गुण अंगीं आणण्याचा विशेष प्रयत्न केला पाहिजे असे या पुढारी मंडळींचें मत होतें. त्यासाठीं त्यांनीं पूर्व तारकसंघाची स्थापना केली, व जगद्‌गुरु येणार आहेत असें ज्यांस वाटत होतें, व त्यासाठीं स्वत:च्या अंतरंगाची तयारी करण्याची ज्याची इच्छा होती अशा माणसांस त्या संघाचे सभासद करण्यांत आलें. डॉ. बेझंट यांनीं जगद्‌गुरूंच्या आगमनाची द्वाही सुमारें सोळा वर्षें सर्व जगभर मोठ्या नेटानें फिरविली व संघाच्या शाखा पृथ्वीवरच्या सर्व देशांत स्थापन झाल्या. असें ऐकतों की, या संघाच्या सभासदांची संख्या एक लाखांवर गेली होती. संस्था इतकी मोठी झाल्यामुळें व ती संघटित असल्यामुळे जगद्‌गुरूंच्या आगमनाची कल्पना जगांतील कोनाकोंपऱ्यांतही पसरण्यास कठीण गेलें नाहीं. १९२७ सालच्या ऑगस्ट महिन्यांत ऑमेन येथील कॉंग्रेसच्या वेळीं कृष्णाजी स्पष्टपणें बोलूं लागले कीं, मी माझें परमपद गांठलें आहे व सर्व जगाला शिकविण्याचा मी संकल्प केला आहे. त्या वेळीं सभासदांस कळून चुकलें कीं, जगद्‌गुरु येणार ही आपली आजपावेतोची आशा आतां सफल झाली आहे. त्यामुळें पूर्व तारकसंघाची घटना त्या कॉंग्रेसच्या वेळीं बदलण्यांत आली. पूर्व तारकसंघ या नांवांतील पूर्व या विशेषणास काट देण्यांत येऊन तारकसंघ हें या संस्थेचें नाव ठरविण्यांत आलें. डॉ. बेझंट व बिशप लेडबीटर हे या संस्थेचे प्रारंभापासून जे संरक्षक (प्रोटेक्टर) होते त्यांचीही नांवें कमी करण्यांत आलीं. पूर्वींचे जे उद्देश होते ते रद्द करण्यांत आले व जगद्‌गुरु जगांत आले आहेत अशी श्रद्धा असणारांस एकत्र संघटित करणें आणि त्या जगद्‌गुरूंचीं ध्येयें जगांत प्रस्थापित करण्यासाठीं त्यांशीं सहकार्य करणे हे दोन नवीन उद्देश संस्थेंत घालण्यांत आले. मि. कृष्णमूर्ति मात्र पूर्वीप्रमाणेंच या संघाचे अधिपति राहिले.

दोन वर्षें विचार करून १९२९ च्या ऑगस्ट महिन्यांत ऑमेन कॉंग्रेसच्या वेळीं कृष्णाजींनीं ही नवीन संस्था पार मोडून टाकिली. त्याचीं कारणें देतांना ते

म्हणाले कीं " सत्य.शोधण्याचा प्रयत्न म्हणजे डोंगरावर चढण्यासारखा प्रयत्न होय. तो प्रत्येक व्यक्तीनें केला पाहिजे. पर्वताचें शिखर उपटून तें दरींतल्या माणसाच्याजवळ कोणासही आणून ठेवतां येणार नाहीं. सत्य-संशोधनाची संस्था काढिली तर त्या संस्थेचे सभासद स्वतःला त्या संस्थेच्या चौकटींत बसवून घेतात, त्या संस्थेच्या लौकिक उपाधींत स्वतःला गुंतवितात, आपण ज्या अर्थी या संस्थेचे सभासद आहों त्या अर्थी आपोआपच आपणाला सत्य सांपडेल अशी त्यांची भावना होते व स्वतःची खटपट ते सोडून देतात. सत्य माणसाच्या अंतर्यामी असतें. त्यासाठीं अंतरंगशुद्धि, आकुंचित आग्रहांचा व अनावश्यक गोष्टींचा त्याग वगैरे उपाय माणसानें स्वतः केले पाहिजेत. तसें तारकसंघांतील सभासदांनीं केलेलें नाहीं. उलट ही संस्था आपणांस शहाणें करील असला परावलंबीपणा मात्र त्यांच्यामध्यें आलेला दिसत आहे. असल्या निर्जीव सभासदांचा मला उपयोग नसल्यामुळें मी ती मोडीत आहें. संस्था ही टाइपरायटरच्या यंत्रासारखी असते मजकूर लिहिण्यास त्याचा उपयोग असतो. पण त्या टाइपरायटरवर गंधाक्षता घालून त्याची पूजा करणे वेडेपणाचें आहे. संस्थेस असलें महत्त्व येऊं पहात असल्यामुळें मी ती मोडीत आहे." सर्व जगभर नाना देशांतले एक लाख सुशिक्षित व निष्ठावान् अनुयायी ज्या माणसाला आहेत त्यानें तो अनुयायांचा संघ मोडून टाकावा हें सामान्य माणसाचें काम नाहीं. त्याला वैराग्य लागतें आणि महत्त्वाची गोष्ट कोणती व गौण कोणती याचा विवेकही लागतो. कृष्णार्जींची मनोवृत्ति या गोष्टीवरून कोणाच्याही लक्षांत येईल.

## कृष्णजींनीं लिहिलेलीं पुस्तकें

कृष्णजी यांनीं निरनिराळ्या वेळीं निरनिराळीं पुस्तकें लिहिलेलीं आहेत. त्यांच्या चरित्रांत दोन मोठे विभाग पाडण्याजोगे आहेत. १९२७ च्या ऑगस्ट महिन्यापूर्वीचा एक विभाग व त्याच्यानंतरचा दुसरा विभाग. या पहिल्या काळांत असतांना त्यांची वृत्ति साधकाची होती. १९२७ सालीं तींत मोठें स्थित्यंतर झालें. त्या वर्षाच्या प्रारंभापासून तें अधिकाधिक स्पष्ट होऊं लागलें व त्या सालच्या ऑगस्ट महिन्यांत कृष्णजींनीं सार्वजनिकरीत्या बोलून दाखविलें कीं, " मी कृतार्थ झालो आहें, मी जगद्गुरु

आहें, माझ्या आत्मसख्याशी मी एकरूप झालों आहे. मानवस्थितीचें सर्वांत जें उंच शिखर तें मीं गाठलें असून तो मार्ग इतरांस दाखविणें हें माझें काम आहे."

१९२७ सालच्या पूर्वी कृष्णजींनीं जीं पुस्तकें लिहिलीं त्यांचें वळण व नंतर लिहिलेल्या पुस्तकांचे वळण हीं वेगवेगळीं आहेत. अगोदरच्या पुस्तकांत आपण एका थोर जीवन्मुक्त गुरूचे शिष्य आहों असें ते म्हणतात. इतरांनींही तसलें शिष्यत्व मिळविण्याचा प्रयत्न करावा हें ध्येय त्यांनीं आपल्या त्या वेळच्या पुस्तकात आपल्या वाचकांसमोर ठेवण्याचा प्रयत्न केलेला आहे. ज्यांस कृष्णजींचे सध्याचे विचार समजून घ्यावयाचे आहेत, त्यांस त्यांच्या पूर्वीच्या पुस्तकांचा सामान्यतः फारसा उपयोग व्हावयाचा नाहीं. वाचक तितका विचारी नसेल तर त्यांचीं जुनीं पुस्तकें व नवीं पुस्तकें यांच्या भिन्न धोरणामुळें त्याचा घोटाळाही होण्याचा संभव आहे. त्यांच्या जुन्या पुस्तकांस क्षणभर बाजूस ठेवून नवीन पुस्तकें जिज्ञासूंनीं वाचावीं असें आम्हांला वाटतें. जो वाचक तितका विचारी आहे, आभासिक व खऱ्या खोट्या विरोधांना बिचकून जाणार नाहीं, ज्यास कृष्णजींच्या सर्व पुस्तकांचा तुलनात्मक-दृष्ट्या विचार करावयाचा आहे अशांनीं कृष्णजींच्या सध्याच्या विचारांतील मुख्य मुद्दे नीट समजून घेऊन मग त्यांचीं नवीं व जुनीं सर्व पुस्तकें वाचलीं तर त्यांत तोटा नाहीं. पण प्रथम वाचणारानें तसें केल्यास त्याचा गोंधळ उडेल असें आम्हास वाटतें.

त्यांच्या जुन्या पुस्तकांपैकीं At the Feet of the Master किंवा 'साधनचतुष्टय' हें एका दृष्टीनें विशेष महत्त्वाचें पुस्तक होय. हें पुस्तक व त्यांचीं नवीन पुस्तकें यांत फारसे विरोध वाचकांस आढळणार नाहींत. खरोखरी हें पुस्तक मूळचें कृष्णजींनीं लिहिलेलें नसून मास्टर कुटूमी यांनीं लिहिलेलें आहे, हें त्या पुस्तकावरून कोणाच्याही लक्षांत येईल. शिष्यत्व व पहिली महादीक्षा या ध्येयावर या पुस्तकांत विशेष जोर आहे. शिष्यानें आपल्या जीवन्मुक्त गुरूस कसोटीप्रमाणें मानावें व त्या कसोटीनुरूप चांगलें वाईट निवडावें असेंही या पुस्तकांत लिहिलेलें आहे. कृष्णजींच्या नंतरच्या पुस्तकांत शिष्यत्वाची पदवी व पहिली महादीक्षा यांस ध्येयदृष्ट्या महत्त्व देण्यांत आलेलें नाहीं. या पायऱ्यांस तितकें महत्त्व नाहीं, त्याचा नीट अर्थ लोकांस उमजत नाहीं; शिष्यत्व

दीक्षा, वगैरे गोष्टी माणसाच्या नांवाच्या पुढें मागें असलेल्या पदव्यांप्रमाणें लोकांस वाटतात, व अशिक्षित माणूस युनिव्हर्सिटीच्या पदव्यांची किंमत व गुणदोष न समजतां त्या अक्षराची जशी पूजा करितो तसें या पदव्यांचें होतें आणि अशा प्रकारें लोकांची दिशाभूल होत असते; असें वाटल्यामुळें म्हणा किंवा अन्य कारणामुळें म्हणा, कृष्णजींच्या नंतरच्या पुस्तकांत हीं ध्येयें त्यांनीं आपल्या वाचकांसमोर ठेविलीं नाहींत. दुसऱ्याचे आंधळे शिष्य होण्यापेक्षां स्वतः ज्ञानाच्या पैलतीरास जाण्याचें ध्येय माणसाने स्वतःसमोर ठेवावें; ती अंतिम स्थिति म्हणजे मुक्ति अथवा स्वतंत्रता होय; तींत अनुभवाची, आनंदाची व सत्याची परमावधी असते असें त्यांच्या नंतरच्या पुस्तकांत त्यांनीं प्रतिपादिलेलें आहे. तसेंच लौकिक गुरूस वा जीवन्मुक्त गुरूस कसोटीसारखें न मानतां, हें जें मुक्तीचें ध्येय आहे, हें जें सत्य आहे त्याचा कसोटीप्रमाणें उपयोग करावा असें त्यांनीं नंतरच्या पुस्तकांत लिहिलेले आहे. त्यांच्या पूर्वीच्या पुस्तकांपैकीं Education as Service या पुस्तकांत मुलांच्या शिक्षणाविषयींचे विचार आहेत. हे पुस्तक 'शिक्षणसेवा' या नांवानें मराठींत प्रसिद्ध आहे. Towards Discipleship या पुस्तकात शिष्यत्वास काय गुण लागतात याचे विवेचन आहे. The Path या पुस्तकात स्वतःच्या मार्गाचे काव्य-मय व अलंकारिक वर्णन त्यांनी दिले आहे. यांखेरीज Temple Talks व Self Preperation नांवाचीं दुसरीं त्याचीं दोन पुस्तकें प्रसिद्ध आहेत. नवीन वाचकांनीं प्रथमारंभीं या पुस्तकांपैकीं (एक 'साधनचतुष्टय' खेरीज करून) कोणतींही न वाचणें बरें असें आम्हांस वाटतें. कृष्णजींच्या हल्लींच्या शिकवणीची दिशा नीट ध्यानांत आल्यावर मग तीं त्यांनीं सावकाशपणें वाचावीं.

नवीन वळणाचा त्यांचा पहिला ग्रंथ म्हणजे The Kingdom of Happiness अथवा 'आनंदाचें साम्राज्य' हा होय. यांतील भाषणे नक्की केव्हां झालीं तें त्या पुस्तकांत नमूद नाहीं पण तीं १९२७ च्या जरा अगोदरचीं असावींत असें वाटतें. कृष्णजींच्या नंतरच्या पुस्तकांत "मी जगद्गुरु आहे, मी आत्मसत्याशीं एकरूप झालों आहें, मी माझें परमपद गांठलें आहे" असें जे त्यांनीं स्पष्टपणानें म्हटले आहे तसें या पुस्तकांत म्हटलेलें

नाहीं. पण एकंदरीनें पहातां नव्या वळणाचीच छाया या पुस्तकांत आहे. कृष्णजींचे हल्लींचे विचार समजण्यास हे पुस्तक वाचकांस उपयोगी पडेल मात्र नव्या वळणांत कृष्णाजी संपूर्णपणें गेल्यानंतरचें हे पुस्तक नसून त्यांत जात असतांवेळचे तें आहे, हें चाणाक्ष वाचकानें विसरतां कामा नये. प्रस्तुत मराठी पुस्तकांतील पहिला भाग म्हणजे त्या ग्रंथांचें मराठी रूपान्तर होय. हें पुस्तक वाचण्यास गोड व स्फूर्तिदायक आहे, व कृष्णजींचे विचार जर समजून घ्यावयाचे असतील तर तें प्रत्येकाने वाचले पाहिजे. The Pool of Wisdom नांवाचे त्यांचें जें दुसरें पुस्तक प्रसिद्ध आहे, त्यांतील व्याख्यानें १९२६ च्या ऑगस्टमधील आहेत. या पुस्तकावरही नवीन वळणाची पुष्कळ छाया आहे व तेंही नवीन वळणाच्या पुस्तकांत गणण्यास हरकत नाहीं. पण हें पुस्तक 'आनंदाचे साम्राज्य' या पुस्तकाइतकें लोकप्रिय व प्रसिद्ध नाही.

१९२७ सालच्या ऑगस्टमध्यें Who Brings the Truth या नांवाचें एक व्याख्यान त्यांनीं दिलेले होतें. तें इंग्रजींत लघुपुस्तकरूपाने प्रसिद्ध आहे. त्यांत "मी जगद्गुरु आहें, मी कृतार्थ झालों आहें," अशी स्पष्ट भाषा कृष्णजींनीं पहिल्याप्रथम योजलेली आहे. हें पुस्तक वाचणें अत्यवश्य आहे; पण तें समजण्यास कांहींसें कठीण आहे. प्रस्तुत पुस्तकांतील 'सत्याचें उगमस्थान कोठें असतें ?' ह्या नांवाचें प्रकरण हें त्याच लघु पुस्तकावरून मराठींत उतरलेलें आहे. By What Authority या पुस्तकांतील व्याख्यानेंही १९२७ च्या ऑगस्टमधील आहेत व तीं महत्त्वाचीं आहेत. हे पुस्तक वाचण्यास अगदीं सोपें वाटतें, व त्यांत विशेष काय आहे, असा माणसास प्रश्न पडतो. पण तें पुस्तक फार खोल असून तें काळजीनें वाचणें जरूर आहे. हें पुस्तक वाचतांना सोप्या भाषेमुळें वाचकांची असली दिशाभूल वारंवार होते. प्रस्तुत पुस्तकांतील शेवटचा भाग By What Authority या पुस्तकावरून उतरलेला आहे व 'सत्य-प्रतीतीचें प्रमाण कोणतें' असें नांव त्या भागास आम्ही दिलेलें आहे.

या पुस्तकानंतरचीं कृष्णजींचीं तीन पुस्तकें प्रसिद्ध आहेत. हीं १९२८ सालांतलीं असावींत असें वाटतें. निदान दोन त्या सालांतलीं आहेत. पैकीं Let understanding Be the Law व Life the Goal हीं छोटीं पुस्तकें आहेत. पहिल्यांत प्रश्नोत्तरें आहेत. थिऑसफिस्टांच्या प्रचलित

विचारांकडे कृष्णर्जींची पहाण्याची दृष्टि कोणती आहे हे त्यावरून दिसेल. थिऑसफिस्ट व स्टारचे सभासद यांस हें पुस्तक अधिक महत्त्वाचे आहे. Life the Goal हें पुस्तक समजण्यास कठीण आहे. पण त्यांत एक महत्त्वाची अशी दृष्टि आहे. तिसरें पुस्तक म्हणजे Life in Freedom हें होय. यांत कृष्णजींचे सर्व विचार एकत्र संकलित झाले आहेत असें म्हणण्यास अडचण नाहीं; त्यामुळें इंग्रजी जाणणारांनीं तें पुस्तक प्रथम वाचण्यास घेण्याजोगें आहे.

याखेरीज कृष्णर्जींनीं कविता लिहिलेल्या आहेत. त्या बऱ्याचशा संकीर्ण आहेत. पण The Search व The Immortal Friend या पुस्तकांत अनेक कविता ग्रथित झाल्या आहेत. एका विशिष्ट प्रकारच्या माणसांस त्यांच्या गद्य ग्रंथांपेक्षां हीं काव्याचीं पुस्तकेंच अधिक बोध देतात असा अनुभव आहे; पण अनेक मंडळीस त्यांचा तादृश फायदा वाटत नाहीं. या सर्व कविता थोड्याफार नवीन वळणाच्याच आहेत.

कृष्णजींचे विचार नीट समजून घ्यावयाचे असले तर त्यांचीं हीं सर्व नवीन वळणाचीं पुस्तकें नीट मनन करून व पुनः पुनः वाचणे अत्यवश्यक आहे. कृष्णजींची मनोरचना शब्दवेदान्त्याच्यापेक्षां फारच भिन्न आहे. इतकेंच नव्हे तर एखादी गोष्ट शब्दांनीं अगदीं स्पष्ट केली तर लोक त्या शब्दांच्या कवचास घट्ट चिकटून बसतात व आंतला जिवंत अर्थ विसरतात असें त्यांचें म्हणणें आहे. एखादी गोष्ट अगदीं स्पष्ट करून विशिष्ट स्वरूपांत लोकांसमोर मांडली असतां लोक त्या गोष्टीचा एक ठराविक अर्थ करितात, त्यांच्या मनांत त्या गोष्टीचें एक ठराविक स्वरूप बद्धमूल होतें व त्या स्वरूपांतच त्यांचीं मनें अडकून रहातात असें त्यांनीं एके ठिकाणीं म्हटलेलें आहे.† या कारणासाठीं कधीं कधीं ते एखादी गोष्ट वाजवीपेक्षां अधिक स्पष्ट व उघड करून सांगत नाहींत. लहान मुलास जसें आई अन्न भरवित तद्वत् लोकांच्या मनांत आध्यात्मशास्त्रांतील माहिती भरवावी असा त्यांचा उद्देश नाहीं. सूर्यप्रकाशाच्या उबेनें जशा कळ्या फुलतात तशीं लोकाचीं हृदयें फुलवावीं, त्याचा विकास करावा असा त्यांचा रोख असतो. कृष्णजींचीं व्याख्यानें ऐकतांना अथवा पुस्तकें वाचतांना आपण हें लक्षांत ठेविलें पाहिजे. त्यांचेकडून

---

† या पुस्तकांतील पृ. ७३ पहा.

निरनिराळ्या प्रकारची माहिती घेऊन ती आपणांस आपल्या मनांत सांठवावयाची आहे अशी वृत्ति आपण ठेवतां कामा नये. सुंदर आलाप ऐकतांना, सुंदर चित्र रसिकतेनें पहातांना, किंवा सुंदर सृष्टि-प्रदेशाचें अवलोकन करतांना जसें आपण आपलें हृदय विशाल करितों तसें आपण करणें अवश्य आहे. कृष्णजींस जर आपण मनानें मिळणार असलों तर आपण त्या दिशेनें मुद्दाम प्रयत्न केला पाहिजे. त्यांच्या शब्दांस बाहेरून न चिकटतां त्या शब्दांच्या गाभाऱ्यांत, त्यांच्या मनांतील अर्थांत आपण हौसेनें, आनंदानें, त्याचप्रमाणे शान्तपणानें शिरण्याचा प्रयत्न केला पाहिजे. "माझ्या शब्दांकडे आपण पाहूं नका पण त्या शब्दांच्यापलीकडे जाऊन अर्थाकडे पहा, आपला अंतःचक्षु उघडा." "माझ्या मनांत, माझ्या भावनांत तुम्ही शिरा म्हणजे तुम्हांस माझ्या म्हणण्याची समजूत पडेल." "जर तुम्हांस माझें म्हणणें समजून घ्यावयाचें असेल तर तुम्ही माझ्या मनानें पहा, जर माझ्या म्हणण्याची तुम्हांस संवेदना हवी असेल तर माझ्या हृदयांतून ती घ्या," अशा अर्थाचीं वाक्यें त्यांच्या पुस्तकांत वारंवार दिसून येतात. त्यावरून उघड होईल कीं त्यांचीं व्याख्यानें ऐकून किंवा त्यांचीं पुस्तकें वाचून त्यांचा स्वतःस फायदा करून घ्यावयाचा असेल तर माणसानें स्वतःचा प्रयत्न केला पाहिजे. कृष्णजींच्या मनाशीं आपलें मन मिळविण्याची खटपट केली पाहिजे. अर्थात् त्यांचे ग्रंथ वाचतांना शाब्दिक वाद दूर सारून ते ग्रंथ मननपूर्वक व शान्त मनानें व पुनः पुनः वाचले पाहिजेत. मनाचे पूर्वग्रह, पुस्तकी विद्वत्ता, समजुतीचीं लौकिक बंधनें, अंतःकरणाचा आकुंचितपणा, मनास बांधून टाकणारीं चालीरीतीचीं व पूर्वपरंपरेचीं बंधनें हीं सर्व सोडून निवान्तपणानें|| त्यांचें म्हणणें आपण समजून घेतलें पाहिजे.

## कृष्णजींची दृष्टि व शिकवण

कळीचें फूल होतें, फुलाचें फळ होतें हा जसा विकास होतो, तसा माणसाचा विकास व्हावयास पाहिजे व यासाठीं अध्यात्मशास्त्रात एकानें सांगावें ...

---

|| ज्ञानेश्वरी कशी श्रवण करावी तें सांगतांना ज्ञानेश्वर म्हणतातः × × × अनुभवाची ही कथा। अति हळुवारपण चित्ता। आणुनियां॥ दुसऱ्या एका ठिकाणीं त्यांनीं "व्युत्पत्ति आघवी विसरिजे" असा उपदेश केला आहे.

दुसऱ्यानें ऐकावें हें ठीक नाहीं असें कृष्णजी वारंवार म्हणत असतात. असल्या "बाबावाक्यम् प्रमाणम्" च्या आंधळ्या आज्ञाधारकतेनें माणसाच्या विकासास अडथळा होतो, त्याच्या हृदयाची कळी न उमलतां ती चिरडून जाते असें त्यांचें म्हणणें आहे. माणसानें स्वतःच्या पायावर उभें राहिलें पाहिजे, स्वतःचा अनुभव गोळा करून स्वतः शहाणें झालें पाहिजे; विचार करण्याचा, खरेंखोटें निवडण्याचा, योग्यायोग्य ठरविण्याचा मक्ता ग्रंथांनीं, धर्मगुरूंनीं व शास्त्र-कारांनीं घ्यावा व इतर माणसांनीं डोळे मिटून त्याप्रमाणें वागावें असें केलें तर त्या माणसाचा विकास बंद पडतो, जबाबदारीची त्याची जाणीव नाहींशी होते व अशा लोकांना आध्यात्मप्रगति करतां येत नाहीं. ज्ञानसूर्याकडे पाहिलें तर डोळे दिपतात म्हणून पुष्कळ माणसे धर्मगुरूंच्यामागें किंवा ग्रंथांच्यामागें त्यांच्या सावलींत बसतात व असें करणें त्यांस सोपें वाटतें. ज्यास स्वतःचा आध्यात्म-विकास करावयाचा असेल त्याने असें करून भागावयाचें नाहीं. म्हणून कृष्णजी नेहमीं असें सांगतात कीं, कोणालाही आंधळेपणानें प्रमाण मानूं नका. आध्यात्म-शास्त्र हें आज्ञाधारकतेचें शास्त्र नसून समजूत करून घेण्याचें शास्त्र आहे. दुसऱ्यास प्रमाण मानून तो सांगेल तसें वागणें ही गोष्ट सोपी आहे, कारण त्यांत आपण आपल्या जबाबदारीचें ओझें दुसऱ्यावर घातलेलें असतें. असें केल्याने माणसास दोन दिवस बरे वाटेल, पण त्यास सत्य समजणार नाहीं व सांपडणार नाहीं. जो माणूस स्वतःचा अनुभव घेतो, व स्वतःच्या अनुभवाचें देवालय आपल्या हृदय-मंदिरांत उभें करितो त्याचें ज्ञान त्याच्यापाशीं सदैव असतें. ज्यास या अध्यात्ममार्गांत पुढें जावयाचें असेल त्यानें स्वतःचा अनुभव घेण्याची व त्यामार्गीं येतील तीं सुखदुःखें भोग-ण्याची तयारी केली पाहिजे; तरच त्याचा विकास होईल. म्हणून ते नेहमीं सांगतात कीं दुसऱ्या कोणासही आंधळेपणानें प्रमाण मानूं नका.§ आपल्या स्वतःसंबंधानेंही त्यांनीं असें अनेकवार म्हटलें आहे कीं माझें म्हणणें तुम्हांस

---

§ प्रस्तुत पुस्तकांतील दुसऱ्या भागाचें नांव 'सत्याचें उगमस्थान कोठें असत ?' असें आहे. तिसऱ्या भागाचें नांव 'सत्य-प्रतीतिचें प्रमाण कोणतें ?' असें आहे. या प्रश्नार्थक मथळ्यास, सत्याचें उगमस्थान तुमच्या अंतरंगांत आहे, तुमची समजूतच तुम्हांस प्रमाणभूत होईल असें कृष्णजींचें उत्तर असणार हें चाणाक्ष वाचक ओळखतीलच.

पटत नसेल तर तें प्रमाण मानूं नका, त्याचा शान्तपणानें विचार करून पहा. पटत नसलें तर तें कां पटत नाहीं त्याचीं कारणें शोधून पहा, म्हणजे तुमच्या हृदयांत प्रकाश पडेल. ते म्हणतात कीं डॉक्टरची गोळी पोटांत घेतली म्हणजे त्याचा आपोआप परिणाम होतो; तशी लोकांस ज्ञानी व मुक्त करणारी डॉक्टरची गोळी मजपाशीं नाहीं. मी स्वतः ज्ञानी व मुक्त झालों आहें; कोणत्या प्रक्रियेनें मी तसा झालों तें मी तुम्हांस सांगूं शकेन. तुम्ही त्या मार्गानें गेलांत तर तुम्हीही मजसारखे व्हाल. रस्त्यावर जशी पाटी लावलेली असते कीं हा रस्ता अमुक का गांवाकडे जातो, तसा मी आहें. मी फक्त वाट दाखवीन, चालण्याचा प्रयत्न तुम्ही केला पाहिजे.

मी जी वाट दाखवितों, मी जें सत्य सांगतों त्याची पूजा करा असें ते म्हणतात. माझी स्वतःची पूजा करण्यांत, माझे स्वतःचे देव्हारे माजविण्यांत कांहीं अर्थ नाहीं असे ते सांगतात. मजवर अवलंबून राहिलांत तर फसाल, कारण माझा देह विनाशी आहे, तो केव्हा तरी मरेल व मग तुम्ही कष्टी व असहाय व्हाल. मी जें सत्य सांगतों, जो मार्ग दाखवितों त्या सत्याचे तुम्ही शिष्य व्हा; कारण तें सत्य अविनाशी आहे. त्या सत्याचे तुम्ही शिष्य झालांत म्हणजे ते सत्य तुमच्या अंतर्यामीं उदित होईल व तें कधींही हरपणार नाहीं. पण तुम्ही माझ्यामागें लागलांत, माझी पूजा करूं लागलांत तर त्या सत्यास विसराल व जगांत आणखी एक पंथ निर्माण कराल. समुद्राचें पाणी जसें अफाट असतें, जिवंतपणानें जसें ते सारखें हेलावत असतें, तसें सत्य आहे, व तें प्रत्येकाच्या अंतर्यामीं आहे; स्वतःच्या अंतर्यामीं खणून तें जीवन तुम्ही शोधिलें पाहिजे. तसें न करतां माझें वैयक्तिक महत्त्व वाढवाल, कृष्णमूर्ति या माणसाची पूजा कराल, त्याच्या नांवचा पंथ स्थापाल, त्याचीं दगडी स्मारकें उभाराल तर तुम्ही चुकाल. असल्या बाह्य व निर्जीव गोष्टींत न अडकतां स्वतःच्या अंतर्यामीं सत्य शोधणें व त्या सत्याचा आनंद अनुभवणें हें तुमचें खरें काम आहे. ही दृष्टी असल्यामुळेंच कृष्णजींनीं तारकसंघ मोडून टाकलेला आहे.

प्रत्येकाच्या अंतर्यामीं हें सत्य, हें सुखाचें साम्राज्य, ही विकासाची परमावधि आहे. अंतरंगांतलें सत्य कसें हस्तगत करावें हें कृष्णजींनीं सांगितलेलें आहे. त्याचीं साधनें, त्या प्रयत्नाची सामान्य दिशा, वगैरे गोष्टी

त्यांनीं ठिकठिकाणीं दाखवून दिलेल्या आहेत. त्या मार्गानें जाणें, तसा प्रयत्न नेटानें करणे हें आपलें काम आहे. अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे कृष्णजींची शिकवण व्यावहारिक आहे, कृतींत उतरण्यासाठीं आहे, वादविवादासाठीं किंवा एखादी उपपत्ति बसविण्यासाठीं नाहीं हें सर्वांनीं लक्षांत ठेवणें जरूर आहे. तर्क, वादविवाद, उपपत्ति, विद्वत्ता या गोष्टी जाड्या शब्दपंडितांनीं पहाव्या, ज्यास स्वतःचा विकास करणें असेल, आध्यात्माची ज्यास खरी तहान लागली असेल, त्यानें त्यात गुंतून राहूं नये; त्यानें तडक मार्गानें चालूं लागावें असें त्यांचें म्हणणें आहे. डोंगरावर चढतांना जितकें खांद्यावर वजन अधिक तितकें चढण्याचें काम कठीण होत असतें. आध्यात्मविकासाच्या चढावावरून चढत असतांना असल्या लौकिक भानगडींचीं ओझीं टाकून दिलीं पाहिजेत असा त्यांचा उपदेश आहे.

कृष्णजींची शिकवण ध्येयवजा आहे. त्यांत तपशिलाचा भाग व बारीकसारीक गोष्टी फारशा नाहींत. त्या त्यानीं त्यांत मुद्दाम घातल्या नाहींत असें वाटतें. कृष्णजी ज्या मार्गानें स्वतः गेले त्या मार्गाचें सामान्य वर्णन ते सांगतात. माणसानें कोणत्या दिशेनें व कसा प्रयत्न केला पाहिजे याची सामान्य दिशा ते दाखवितात. मुद्याच्याच गोष्टी खरोखरी महत्त्वाच्या आहेत, त्याबाबतच जनता आज घोड-चुका करीत आहे, मुद्याच्या गोष्टी सुधारल्या म्हणजे सर्व सुधारेल, तपशिलाच्या गोष्टी प्रत्येक विचारी माणसाला आपापल्या गरजांनुसार ठरवितां येतील, असें वाटूनच त्यांनीं आपल्या शिकवणींत त्या आणलेल्या दिसत नाहींत. तपशिलाच्या बाबी सर्व माणसांना एकच प्रकारच्या असणार नाहींत, त्या स्थलमानानें व कालमानाने वेगवेगळ्या असतात, यासाठीं त्या त्यांनीं आपल्या शिकवणींतून मुद्दाम गाळल्या असाव्यात असें वाटतें. एखाद्या ध्येयाचें अगत्य हृदयांत बिंबलें म्हणजे मग विचारी माणूस आपापला तपशील ठरवीलच. अंगावरच्या कपड्याच्या स्वच्छतेचें महत्त्व माणसाच्या हृदयाला खरोखरी पटलें, म्हणजे ज्याला जे अनुकूल असेल, ज्याला जुळण्याजोगें जें असेल तें तो साधन घेईल. कोणी मुबलक पाण्याचा उपयोग करील, कोणी थोडें पाणी घेऊन साबणाची त्याला जोड देईल, कोणी कपड्यावर धाण पडूं नये याचा बंदोबस्त करील, कोणी ड्रायक्लिनिंग करील. हीं साधनें मुद्याचीं नाहींत. साधन म्हणून आपापल्या आवडीप्रमाणें

व आपापल्या परिस्थितीप्रमाणें ज्याला जें योग्य दिसेल तें त्याने उपयोगांत आणावें अशी कृष्णजींची विचारसरणी दिसते. त्यांनीं एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं " मी जर तपशिलाच्या सूचना केल्या तर त्या फक्त एका पिढीला लागू पडतील; कोणत्या नियमांनुसार लोकांनीं वागावें ते नियम जर मी घालून दिले तर तेच बंधनकारक होतील. यासाठीं तुम्ही निरीक्षण करून स्वतःला शिकवा. हाच मार्ग सर्वांत साधा आहे, इतर मार्गांनीं भानगडी मात्र उद्भवतील $ " एकदा एका स्त्रीने कृष्णजींची मुलाखत घेतली व मुलांचे शिक्षण आणि स्त्रीपुरुषांचे नैतिक संबंध या बाबतींत सर्व जगाला कोणते नियम हितकर होतील याबद्दल प्रश्न विचारले. कृष्णजी म्हणाले, " कोणती पद्धति चांगली हें विचारण्यांत अर्थ नाहीं; कारण सर्व जगाला एकच पद्धत लागू करणें शक्य नाहीं. एकच प्रमाण सर्वांना लावतां येणार नाहीं "‡ त्यांच्या म्हणण्याचा अर्थ असा कीं दिशा योग्य अ ली म्हणजे त्या दिशेने जाण्याचीं सर्व साधनें एकच असलीं पाहिजेत असें नाहीं. त्याच

---

$ If I gave directions for attaining freedom, they would apply only to one generation. If I laid down rules by: :which men should abide, these rules again would be a limitation. Train yourself through observation. Tha, is this simplest way. All others are complicated. आनंद, एप्रिल १९२९, पृ. ११७.

‡ " You cannot ask which system is the better because you cannot standardise 'one system for the whole world * * * you cannot lay down a standard which all must follow * * * If you could have laws laid down by men who have seen the goal, and who want to help those who have not yet seen it to work towards that goal, the result would be to produce order." International Star Bulletin, June 1929 पृ. ७, ८ व १२.

मुलाखतींत कायद्याच्यासंबंधानें ते म्हणाले कीं "ध्येय ज्यांना दिसलेलें आहे, व अद्यापि ध्येय न पाहिलेल्या लोकांना त्या ध्येयप्राप्तीच्या बाबतींत सहाय्य करावयाची ज्यांना इच्छा आहे अशाच माणसांनीं कायदे केले तर सुव्यवस्था निर्माण होईल." ध्येय दिसणें हा महत्त्वाचा भाग, तो साधल्यावर माणसानें इतर गोष्टी स्वत:च्या अकलेनें त्या धोरणानुसार स्वतःसाठीं ठरवून घ्याव्या असें त्यांचें मत दिसतें.

माझ्या अंतरंगांतील भानगडींचा किंवा मी कोण आहें याचा तुम्हीं फुकट विचार करीत बसूं नका असेंही त्यांनीं म्हटले आहे. मी काय म्हणतों तें तुम्हांस पटते कीं नाहीं त्याचा स्वतः विचार करा, व पटत असेल तर त्या मार्गास लागा व अवान्तर सर्व गोष्टी बाजूस सारा असें ते म्हणत असतात. ते वारंवार सांगतात कीं मी जगद्‌गुरु आहें किंवा नाहीं हा प्रश्न तुम्हांला मुळींच महत्त्वाचा नाहीं, व लोकांनीं मला जगद्गुरु मानावें हें अवश्यही नाहीं. मी काय सांगतों त्याचा विचार करणें ही एकच बाब मुद्याची आहे. मैत्रेयऋषि हिमालयावर आहेत कीं नाहींत, ते कृष्णजींच्या देहांत शिरतात कीं काय, शिरत असल्यास ते जेव्हां कृष्णजींच्या देहात शिरतात तेव्हां कृष्णजींस काय वाटते, जेव्हां ते कृष्णजींच्या देहात येतात तेव्हां कृष्णजी स्वतः त्या देहास सोडून बाहेर जातात कीं काय, किंवा गंगायमुनांच्या पाण्याप्रमाणें दोघांच्या जाणीवेचे मिळालेले प्रवाह त्यांच्या देहातून एकदम बाहेर पडतात. कृष्णजींच्या तोंडांतून जे शब्द ऐकावयास येतात ते कृष्णजींचे स्वतःचे असतात कीं मैत्रेय बोधिसत्वांचे असतात असल्या प्रश्नांच्या भानगडींत तुम्हीं मुळींच पडूं नका असा त्यांचा सर्वांस इषारा आहे. मी कितीही सांगितलें तरी लोक हें ऐकणार नाहींत हें मला माहीत आहे असेंही त्यांनीं त्याबरोबरच म्हटलेलें आहे. या भानगडींचा तुम्ही नसता वादविवाद कराल, कृष्णजींच्या प्रेतावर हे कृष्णजी कीं मैत्रेय, या प्रश्नाचें रणकंदन तुम्हीं माजवाल, व दोन हजार वर्षांनीं त्याचें संशोधन करण्यासाठीं एक नसती सोसायटीही स्थापाल असें त्यांनीं म्हटलेलें आहे ! पण त्यांचा उपदेश असा आहे कीं ज्या अर्थीं माझ्या अंतर्यामींच्या गोष्टी तुम्हांस दिसत नाहींत त्या अर्थीं तुम्हांस या प्रश्नांचा धड निर्णय करतां येणार नाहीं, व त्या निर्णयास महत्त्वही नाहीं. ज्यांच्या मनांस भानगडी आवडत असतील त्यांचेकडे या प्रश्नांचे वादविवाद करण्याचें शहाण्यांनीं सोंपवून द्यावें

व माझ्या अंतर्यामीं काय चमत्कार चालू आहेत त्याची चवकशी करण्यांत काही महत्त्व नाहीं, मी जें काय सांगतों तें समजून घेणे ही एकच गोष्ट खरोखरी महत्त्वाची आहे हे लक्षांत आणून त्यांनीं आपला आत्मविकासाचा मार्ग सुधारावा असें त्यांनीं सांगितलेले आहे. एकदा कृष्णजींस एकानें प्रश्न विचारला होता कीं "जें तुम्ही बोलतां तें तुम्ही स्वतः बोलत आहां कीं दुसरें कोणी बोलत आहे?" त्यावर कृष्णजींनीं उत्तर दिले, "खरोखरी मला तें माहीत नाहीं व कोण बोलत आहे या गोष्टीस बिलकूल महत्त्व नाहीं." ज्यास आगगाडीनें जावयाचें असेल त्यास आगगाडी स्टेशनावरून केव्हां सुटते हे समजणें महत्त्वाचें आहे व त्यासाठीं टाइमटेबल त्यास उपयोगी पडेल हें खरे आहे. पण रेल्वे टाइमटेबल हातीं पडल्यावर योग्य वेळीं गाडींत न बसतां हें टाइमटेबल कोणत्या छापखान्यांत कसल्या यंत्रावर छापण्यांत आलें आहे याचे संशोधन करण्यांत जो आपला वेळ घालवील त्यानें मोठी घोडचूक केली असें आपण म्हणूं. मी दाखवितो त्या मार्गावरून जातांना सर्व अवान्तर व अनवश्यक गोष्टीस रजा दिली पाहिजे, त्यातच गुरफटून बसणे म्हणजे स्वतःची दिशाभूल करून घेणें होय, असा कृष्णजींचा उपदेश आहे.

कृष्णजींचे ग्रंथ वरवर वाचल्यास "ही शिकवण अगदींच साधी आहे, तींत विशेष असें काय आहे?" असें माणसास वाटण्याचा संभव असतो. पण साधेपणाचे अनेक पर्याय असतात हे कोणीही विसरूं नये. लहान बालकाचें रिकामें मन व ज्ञानी साधूचें सुसंस्कृत मन हीं दोन्हीं साधींच असतात. दरिद्री असल्यामुळें ज्यास दिमाख दाखविण्याची ऐपत नाहीं तो मनुष्य साधा पोषाख करील. गर्भश्रीमंत असूनही पोषाखाचा दिमाख खोटा व व्यर्थ आहे असें मानणारा माणूसही साधा पोषाख करील. पण हे दोन्ही प्रकार अगदीं वेगळे आहेत. कृष्णजींच्या विचारांचा साधेपणा हा चैतन्यानें मुसमुसणारा साधेपणा आहे. विजेचा डायनामो दुरून पाहिला तर तो शान्त दिसतो. त्याचा आवाज होत नाहीं. त्याचें चाक इतकें वेगानें फिरते कीं तें फिरतेसें वाटतही नाहीं. पण त्या डायनामोच्या अंतरंगांत विजेचा प्रचंड प्रवाह उत्पन्न होत असतो व ती वीज अगदीं शान्तपणानें सर्व देशभर निरनिराळीं कार्यें घडवून आणते. कृष्णजींची शिकवण अगदीं साधी आहे, त्यांत उथळ पाण्याची खळाळी नाहीं, माणसास मार्ग-भ्रष्ट करणाऱ्या, त्यास भलत्याठिकाणीं अडक-

वून ठेवणाऱ्या भानगडी व गुंतागुंती नाहींत. सामान्य माणसाच्या मनास भानगडींची इतकी संवय झालेली असते, त्यांतच ते इतके रमलेले असतात कीं साधेपणा पाहिला म्हणजे त्यांस कसेंसेंच वाटतें. "तुमची शिकवण अगदीं साधी व सरळ आहे, म्हणून ती लोकांस पटत नाहीं; त्यांत तुम्ही कांहीं भानगडी आणून घाला म्हणजे सर्व जनता म्हणेल की तुमचें म्हणणें आम्हांस पटतें" असें कांहीं मंडळींनीं किंचित् विनोदानें खुद्द कृष्णजींस सांगितलें होतें. तेव्हां आमच्या वाचकांनीं कृष्णजींचे विचार वरवर पाहून "हे साधेच विचार आहेत" असें म्हणून त्याकडे दुर्लक्ष केलें तर चालणार नाहीं. त्यांचा साधेपणा हा त्यांच्या खोलपणानें उत्पन्न झालेला साधेपणा आहे हे लक्षात आणून सर्वांनीं खोलपणाने त्याचे विचार पाहिले पाहिजेत व स्वतःच्या अंतर्यामीं साधेपणा आणिला पाहिजे. तरच त्यास कृष्णजींचा खरा उपयोग होईल.

हे सर्व मुद्दे नीट ध्यानांत धरून कृष्णजींच्या पुस्तकांचें पुनः पुनः सारखें अध्ययन केल्यास व तदनुसार वर्तन करण्याची खटपट केल्यास त्यापासून अतिशय फायदा होईल अशी आमची कल्पना आहे. कृष्णजींच्या शिकवणींत नवीन काय आहे असाही प्रश्न कांहीं माणसांच्या मनांत येण्याचा संभव आहे. त्या प्रश्नासही वाचकांनीं दूर सारावें असें आम्हांस वाटतें. एखादा ज्ञानी मनुष्य 'मनुष्याला पुनर्जन्म आहे' असें म्हणूं लागला तर तुझ्या सांगण्यांत नवीन काय आहे? असे सांगून त्याचें तोंड बंद करणें शहाणपणाचें होणार नाहीं. आध्यात्मशास्त्रांत अनादिकालापासून इतके ज्ञाते होऊन गेलेले आहेत कीं त्यांच्या शिकवणीच्या उलट कांहीं जेव्हां कोणी सांगेल तेव्हाच तें नवीन होईल अशी वस्तुस्थिति आहे. ईश्वर नाहीं, परलोक नाहीं, पुनर्जन्म नाहीं असें कोणी म्हटलें तरच त्या गोष्टी लोकास नवीन वाटतील. उपनिषद् रूपी गाईचें दोहन करून भगवद्गीतारूपी अमृत ज्यानीं काढिलें त्या भगवान् श्रीकृष्णांनीं उपनिषदांत मुळींच नसलेल्या अशा कोणत्या गोष्टी गीतेंत सांगितल्या आहेत? असा जर आपणास कोणी प्रश्न केला तर आपण त्यास काय उत्तर देऊं बरें? महाराष्ट्रांत जे साधुसंत होऊन गेले त्यांनीं भगवद्गीता, उपनिषदें वगैरेंत नसलेलें व अगदीं नवीन असें कांहींच सांगितलेलें नाहीं. तुमच्या बोलण्यांत नवीन काय आहे? असा प्रश्न ज्ञानेश्वरांनीं निवृत्तिनाथांना केला असता तर ज्ञानेश्वरांस अपरोक्षानुभूति प्राप्त झाली असती काय? जो ज्ञानी मनुष्य आहे,

ज्यानें स्वतः अनुभव घेतला आहे, जो मानवी विकासाच्या उत्तुंग शिखरावर स्वतः चढून गेलेला आहे त्याच्या बोलण्यांत व लिहिण्यांत नवीन सिद्धान्त न आले तरी त्याच्यांत अलौकिक अशी शक्ति असते. त्याच्या अंतरंगांत पेटलेली ज्योति असल्यामुळें इतरांस आपली ज्योति त्याच्यापासून पेटवितां येते आणि हा अनुभव प्रत्येकास नवीनच असतो. कृष्णजींच्या वाणींत, त्यांच्या पुस्तकांत ही ज्योति पेटविण्याची शक्ति आहे असा अनेकास अनुभव आलेला आहे, व ज्यांस स्वतःची ज्योति पेटविण्याची इच्छा असेल त्यांनीं अवान्तर गोष्टी बाजूस सारून त्या दिशेनें प्रयत्न केला पाहिजे हें उघड आहे.

---

# आनंदाचें साम्राज्य

भाषान्तरकार

श्री. देवीदास भास्कर लेले, बी. ए.,
प्रिन्सिपल, पेटिट हायस्कूल, संगमनेर

# दोन शब्द

("आनंदाचें साम्राज्य" या पुस्तकाच्या इंग्रजी आवृत्तींत मि. कृष्णमूर्ति व डॉ. बेझंट यांनीं प्रस्तावनेवजा पुढील मजकूर लिहिला आहे.)

पुढील पानांस प्रस्तावनेवजा दोन शब्द मी लिहावे अशी मला विनंति करण्यांत आली आहे. वास्तविक प्रस्तावनेची मला जरूरी दिसत नाहीं. पण हीं जीं पृष्ठे प्रसिद्ध केलीं जात आहेत त्यांविषयीं येथें किंचित खुलासा करीत आहे.

हॉलंड देशांत ऑमेन गांवाजवळील एर्ड नामक किल्ल्यांत माझ्या कित्येक मित्रांस मी जीं छोटीं व्याख्यानें दिलीं तीं या पुस्तकांत आलीं आहेत. तो किल्ला अठराव्या शतकाच्या प्रारंभींच्या पद्धतीनुसार बांधलेला असून त्या काळचा तो एक उत्तम नमुना आहे असें लोक समजतात. निदान मला माहीत असलेल्या उत्कृष्ट स्थळांपैकीं तें एक स्थळ आहे यांत संशय नाहीं. त्या किल्ल्यांतील सर्व वस्तु त्या काळच्या असून आजही त्या उत्तम स्थितींत आहेत. तेथें भिंतींवर एक तऱ्हेच्या जुन्या सुंदर झालेरी सोडलेल्या असल्यामुळें प्राचीनकाळची शोभा व रुबाब हीं तेथें प्रकट झालेलीं दिसतात. दोन-तीनशें वर्षांचे प्राचीन व मोठाले वृक्ष किल्ल्यासभोंवार मुबलक आहेत. त्यांचीं उंच व गगनचुंबित शिखरें मेघ-मंडळांत गेलेलीं दिसतात. आणि त्या वृक्षांमधून सळसळणाऱ्या वायुलहरी कानांस मजेच्या गुजगोष्टी सांगत असतात.

हे स्थळ मोठ्या शोभेचें व आनंदाचें असें आहे. अर्थात् तेथलें माझें बोलणें त्या शाश्वत विषयाकडे सहजच वळत असे.

जे. कृष्णमूर्ति.

येथे आणखी असें सांगावेसें वाटतें कीं वर वर्णन केलेली परिस्थिति जगद्गुरूंच्या सामर्थ्यास प्रगट होण्यास अनुकूल अशी होती. कृष्णजींच्या सभोंवार उत्साही अशा शिष्यांचा एक लहानसा मेळा असे. त्या शिष्यांची कृष्णजींच्या

स्फूर्तीवर श्रद्धा असून जगद्‌गुरूंचें अत्यानंदानें स्वागत करावें अशी त्यांची वृत्ति असे. या सुंदर पुस्तकांतील ज्ञानगांभीर्य, डोळ्यांत भरणारा त्यांतील नवीन-पणा, त्यांतील भाषेची बहार हीं वाचकांच्या लक्षांत येतीलच. सूज्ञ वाचक पुस्तकाची खरी किंमत जाणतील; तदितरांनीं रुचेल तसें करावें.

**ॲनी बेझंट.**

---

आनंदाचें साम्राज्य हें पुस्तक मि. जे. कृष्णमूर्ति ऊर्फ कृष्णजी यांच्या The Kingdom of Happiness या पुस्तकाचें मराठी भाषान्तर आहे. मराठी भाषान्तर आमचे मित्र रा. रा. देवीदास भास्कर लेले, प्रिन्सिपल, पेटिट हायस्कूल, संगमनेर, यांनीं आम्हांस करून दिलेलें आहे. त्याबद्दल आम्हीं त्यांचे आभारी आहों. रा. लेले यांनीं कांहीं वर्षांमागें 'मुमुक्षुमार्ग' म्हणून एक उत्कृष्ट पुस्तक भाषान्तर करून आम्हांस दिलें होतें. तें आमच्या वाचकांनीं वाचलें असेलच. भाषान्तराच्या कामीं रा. लेले यांचेसारखे मार्मिक लेखक आम्हास मदत करीत आहेत म्हणूनच असल्या पुस्तकांच्या प्रकाशनाची जबाबदारी आम्हांस घेणें शक्य झालें आहे, हे आमच्या वाचकांनीं विसरूं नये. कृष्णजींच्या इतर पुस्तकांचींही इतकींच सुंदर रूपान्तरें ते आम्हास करून देतील व तीं मराठी वाचकांसमोर मांडण्याची संधि आम्हांस त्यांचेमुळें मिळेल अशी आम्ही आशा करीत आहों।

या पुस्तकांतील व्याख्यानें १९२७ सालच्या अगोदर झालेलीं आहेत. अर्थात् या पुस्तकाच्या उपोद्‌घातांत जी कृष्णजींच्या चरित्राची माहिती आम्हीं दिलेली आहे, त्यांत जगद्‌गुरु व कृष्णजी यांची जाणीव परस्परांशीं संपूर्ण-पणें मिळाल्याचा जो आम्ही उल्लेख केला आहे त्या गोष्टीच्या जरा अगो-दरचीं हीं व्याख्यानें आहेत.

या पुस्तकांत The Kingdom of Happiness हे शब्द वारंवार आलेले आहेत. त्यांचें मराठी भाषान्तर 'आनंदाचें साम्राज्य' असें केलेलें आहे. कांहीं ठिकाणीं 'सुखाचें साम्राज्य' असे शब्दही घातलेले आहेत. तेही या अर्थाचेच द्योतक आहेत हें सूज्ञ वाचक संदर्भावरून जाणतीलच.

**राजाराम सखाराम भागवत.**

---

# आनंदाचें साम्राज्य

## आत्मवाणी

माझा हेतु आहे की, साधल्यास तुमच्यापुढें कांहीं कल्पना मांडाव्या, आणि तुम्हीं त्यांचें चांगलें मनन व निदिध्यास करावा; म्हणजे त्या-योगानें अध्यात्म जीवन अथवा परमार्थ साधन म्हणजे काय, याविषयीं तुमचे विचार सुजाण व स्वच्छ होतील. मला वाटतें, तुम्हा सर्वांना हें पटेल कीं, आत्मजीवनानें जगायचें म्हणजे नवी सृष्टि केलीच पाहिजे, आणि नवी सृष्टि करायची म्हणजे धडपड, प्रयत्न व असंतोष हे आलेच. त्यांना योग्य वळण दिलें तरच इष्ट-सिद्धि इष्ट-फल मिळेल. योग्य वळण द्यायला स्वतःची दृष्टि सिद्ध केली पाहिजे, स्वतःच्या गूढ सु प्रवृत्ति व स्वतःच्या कर्तृत्व-शक्ति जागृत केल्या पाहिजेत. हे सर्व यथायोग्य होण्यासाठीं तुम्हा प्रत्येकाचे अंतःकरणात, ती अंतस्थ गुरूची वाणी‡ किंवा ते महत्‌भय, ते महत्‌भूत उठवावें, अशी माझी इच्छा

---

‡ मुळात That voice, that tyrant असे ग्रंथकाराचे शब्द असून टीपेत ग्रंथकारानें खुलासा केला आहे कीं, " ही वाणी म्हणजे आत्म्याची जी सारखी ओढ असते ती. सांगितलेलें ऐकेपर्यंत ती माणसाला स्वस्थ बसूं देत नाहीं." इंग्रजी शब्द जो Tyrant त्याचें येथें भाषांतर करणें सोपें नाहीं. हिंदुधर्मग्रंथांत परमात्म्याला महद्‌भूत, महद्भय, अशीं नावें काहीं स्थळीं दिलेलीं आढळतात. महद्भयं वज्रमिवोद्यतम् असें कठोपनिषदांत व एकोविष्णुर्महद्‌भूतम् असें विष्णुसहस्रनामात आहे. या शब्दयोजनेनुसार Tyrant याचें मराठी भाषांतर 'महद्भय', 'महद्‌भूत' असें येथें आम्हीं केलें आहे. ही आंतली वाणी, ही आतली ओढ बंद पडत नाहीं, तिचें ऐकेपर्यंत तिचा जुलूम सारखा चालू असतो असा Tyrant या शब्दांत अभिप्राय गर्भित आहे. महद्भय, महद्‌भूत या शब्दाऐवजीं कांहीं व्यक्तींस 'अंतर्यामींचा सुलतान' हे शब्द अधिक बरे वाटण्याचा संभव आहे. —भाषांतरकार.

आहे; कारण, नवी सृष्टि करण्याचे कामी खरे मार्गदर्शक तेच एक आहे, दुसरें नाहीं. तुम्हांला बहुतेकाना दुसऱ्याचा कित्ता गिरविण्याची मोठी आवड. ते काम फार सोपे. बहुतेकांना दुसऱ्याचे अनुकरण—अनुसरण करण्याची हौस! आपल्या औट-हाताच्या मळ्याची आपण मशागत करण्याचे, म्हणजे स्वतःच्या गुणांचा, कर्तृत्वाचा विकास करण्याचे कष्ट कोण करतो ? त्यापेक्षां आंधळ्यांच्या मालिकेत चालणे बहुतेकांना सुखाचे वाटते; परतु माझे मत—आणि मला वाटतें तुम्हांसही हे मान्य होईल की,—अंध अनुकरण म्हणजे अतरस्थ वाणीचा कंठरोध होय. प्रत्येक मानवाचा परम गुरु एकच. त्याला आत्मवाणी म्हणा किंवा अंतर्यामींचा गुरु म्हणा, किंवा महत्‌भूत म्हणा, ह्याची सेवा—शुश्रूषा करून, ह्याचे साधन-आराधन करीत राहून, जीवनांत ह्याला परमोच्च स्वरूप देत देत मनुष्य निजधामाशीं—आपल्या स्वतःच्या ध्येयाशीं—येऊन पोहोचत असतो.

ह्या वाणीची उपासना करतां करतां ते महत्‌भूतच आपल्या जीवनात सर्व सत्ताधीश बनले पाहिजे; सर्व लहानथोर गोष्टींत एक त्याची आज्ञा प्रमाण झाली पाहिजे. त्यासाठी आधी आपले ध्येय, आपला परमार्थ शोधून निश्चित केला पाहिजे; आणि मग त्याच्या प्राप्त्यर्थ अखंड उद्योग केला पाहिजे. आतां हे ध्येय कोणते ? माझे मी ठरविले आहे ते हे की मला परात्पर सत्य पाहिजे; मला अशी स्थिति प्राप्त व्हायला हवी आहे की, जीत मला स्वानुभवानें कळेल की, मी जिंकले, मी पल्ला गांठला, मी स्वतःच सद्रूप, ब्रह्मरूप झालो; जगांतल्या क्षुद्र धडपडी, क्षुद्र झंझटे, क्षुद्र विघ्ने—त्यांचाही त्यांचेपरी उपयोग आहेच—तथापि त्यांनीं इतःपर माझे ठाण ढळणे नाही, की त्यांच्या किटाळाचें पटल माझ्या सत्यदर्शनास आड येणें शक्य नाहीं. आणि सद्वस्तु मिळाली म्हणजे आनंद व शांति काय वेगळी आहे ? ती परमशांति, तो समस्त वासना-संकल्प-विकल्पांचा नितांत उपशमही त्यांत आपोआप आलाच. माझे ध्येय हे असें आहे. यांत पहिले अवश्य कर्तव्य हे कीं, आत्म्याची वाणी समर्थ बनवावयाची, अशी की तिनें वेळेवेळेवर अधिकारयुक्त आज्ञा द्यावी. त्या अंतर्गुरूला समर्थ करून उंच पदी बसविले पाहिजे. म्हणजे काय ? तर असे कीं, सामान्य व्यवहारांत आपला आपण विचार करावा; आपलें काम आपण

अंगावर घेऊन करावें; आणि अंतर्वाणीची सिद्धि साधायची म्हणजे हेंच कीं, तिच्या आज्ञेप्रमाणे सर्व आचरण करावयाचें.

केवळ अनुकरण, कित्ता गिरविणें आणि खरी रमणीयता किंवा सौंदर्य याचें एकमेकांशीं गोत्रच जुळत नाहीं. कला म्हणजे सृष्टीच्या बहिरंगाची छाया किंवा नक्कल उठविणें नव्हे; तर त्या परम वस्तूची प्रतिमा किंवा प्रतीक निर्माण करणें होय. अर्थात् ती प्रतिमा जितकी उदात्त, तितकी कला श्रेष्ठ किंवा खरी. तेव्हां अशा प्रतिमा निर्माण करणारा जातीचा कलावंत आपण प्रत्येकानें बनलें पाहिजे, आणि सद्रूपाचें प्रत्यक्ष दर्शन घेऊन त्या स्वयंस्फूर्तीनें कलेची सृष्टि घडली पाहिजे. आतां तुम्ही पहा, खऱ्या थोर कलावंताचे अंगीं, खऱ्या थोर उपदेशकाचे अंगीं, भेदभाव म्हणजे आपणापुरतें कुंपण घालून बसण्याचा अवगुण नसतो. आपण सर्वांठायीं, सर्व आपल्याठायीं, अशी त्यांची व्यापक भावना असते. तसेंच, आपणांलाही अव्यंग, सर्वांगपूर्ण सृष्टि करणें आहे, तर स्वतः विविध, सर्वांगपूर्ण बनलें पाहिजे. समजा, एक केवळ गुलाबाचा बाग आहे, मग ते गुलाब कितीही सुंदर असोत. त्यांचें तें एकच एक रूप कंटाळा आणणारच. तुम्ही गुलाब अत्युत्कृष्ट आणा, वेगवेगळ्या रंगारूपांचे आणा, पण जेथें सर्वत्र एक गुलाबच गुलाब आहेत, तेथें त्या सौंदर्यांत व्यंग रहाणारच. लोकांसारखें व्हावें, अशी एक प्रवृत्ति आपणां प्रत्येकांत असते. आपणाला वाटतें, दुसऱ्या कोणाचातरी आपण छाप घ्यावा आणि सगळ्यांनीं त्या एका छापाचे गणपति बनून जावें. ही वृत्ति आत्मवाणीच्या विकासाला घातक आहे. मात्र हेंही विसरूं नका कीं, आनंदाच्या साम्राज्यांत सर्वांचा संगम किंबहुना ऐक्य पुढें होणारच आहे.

आपल्या सर्व राष्ट्रीय उद्योगांत, सर्व देवधर्मांत, भेदभावाचा धागा ओवलेला असतो. आपण वेगळे, जग वेगळें अशी आपली वागणूक असते. त्यानें दृष्टि संकुचित होते. अशी एकलकोंडी वृत्ति व संकुचित दृष्टि धरण्यानें आपल्या हातून नवी सृष्टि होणें तर दूरच, संहार मात्र होईल. असो. माझी अशी इच्छा आहे कीं, जमल्यास तुम्हा प्रत्येकाचे अंतःकरणांत ती वाणी उमटवावी, म्हणजे तुमच्या वाटेंत, तुम्ही स्वतः आंखलेल्या जीवनक्रमांत तुम्हांला ती मार्गदर्शक होईल; आणि त्या वाणीची त्या अंतःस्फूर्तीची आज्ञा जोवर तुम्ही अनुसराल तोंवर तुम्ही चुकणें नाहीं. तुम्ही चुकतां ते

दुसऱ्याची आज्ञा, दुसऱ्याच्या कल्पना व दुसऱ्याची दृष्टि अनुसरायला गेल्यानें. मी तरी तुमच्यासाठी काय करूं शकेन ? इतकेंच कीं, परमसत्य, परमशांति, प्रेम, दया, यांचे माझे ध्येय मी तुम्हांला बोटाने दाखवू शकेन; परंतु त्याची प्राप्ति तुम्हांला व्हायची ती तुमच्या स्वकष्टानेच होणार. मी तुम्हाला सत्य-सिद्धान्त सांगूं शकेन, परंतु तुम्ही आपली स्वतःची अंतर्वाणी ऐकाल, तिची आज्ञा पाळाल, आपल्या अंतर्ज्ञानाचा, आपल्या विचाराचा विकास कराल, तरच निजगीत पावाल, आणि मग तेथें आपला सगळ्याचा संगम होईल.

हाच माझ्या मतें जीवनातला मुख्यार्थ. दुसरा कोणीही असो, त्याच्या शब्दाला माझा अंतरात्मा जर होकार देत नाही, तर तो शब्द पाळणें मला नको. सत्याला पडद्यात ठेवायचें आणि त्याच्याआड दडायचें, हें मला नको. मला अशा श्रद्धेचें ओझें नको कीं, ज्यापुढें माझा आत्मा स्वेच्छेनें नमत नाहीं, जिच्यापायीं माझी मन-बुद्धिआदि सर्वभावे सहज आत्मसमर्पण करीत नाहीं. तद्वत् तुम्हीही येरा गबाळाच्या कळपांत शिरूं नका. तुम्ही ती अंतर्वाणी श्रवण करा, त्या अंतस्थ गुरूची जोपासना करा, आणि जीवनाचे नवे मार्ग शोधून काढा. स्वतःचा निश्चित मार्ग नाही, आली वावटळ, उडाला पाचोळा फुटेल वाट तिकडे; असें करूं नका.

हे ध्येय साधायला, मी मागे सांगितलेंच आहे, तुम्ही त्या अंतःप्रज्ञेचा विकास केला पाहिजे. भावना व मन यांचा उत्तम मेळ साधला पाहिजे. तरच, अंतस्थ गुरूची म्हणा, किंवा आत्म्याची म्हणा, ती वाणी चित्ताकाशांतून उमटूं शकेल. अंतःप्रज्ञा म्हणजे आत्म्याचे सूक्ष्म बोल. अंतःप्रज्ञा हेंच जीवनमार्गदर्शक आप्त-वाक्य. परंतु अंतःप्रज्ञा ही सर्वांचा जो एक आत्मा त्याची वाणी होय; कोणाही एकट्या-दुकट्या जीवाची नव्हे. आपल्या प्रबळ वासना, आपले कुशाग्र विचार, हे शुद्ध व उन्नत करून जितका आपण अंतर्यामी त्यांचा मेळ बसवूं, तितकी ती अंतर्वाणी स्वच्छ उमटेल. तुमच्या भावना प्रबळ तर असल्याच पाहिजेत. प्रेम काय, सुखाची भावना काय, दयेची भावना काय, कोणतीही भावना तीव्रच पाहिजे. भावना-शून्य मनुष्य, म्हणजे त्याचा उपयोगही शून्यच; परंतु माणसाच्या भावना तीव्र असल्या- मग त्या वाईट कां असेनात--त्या सुधारून चांगल्या उत्तम करून घेतां येतील; पण जो केवळ भावनारहित, केवळ पाषाण असा मनुष्य,

याच्या हातून मात्र नवी सृष्टि किंवा संहार, किंवा संघटना, कांहीं एक होणें नाहीं. महान् संहारकर्तासुद्धा महान् पुरुष असावा लागतो. तो क्षुद्र कधीं नसतो. कांहींतरी अद्भुत तेज त्याचे अंगीं असलेंच पाहिजे. तोच न्याय महान् प्रेम उपकार करणाऱ्यांचा. ती विभूति महानच असते; सामान्य किंवा क्षुद्र कदापि नसते. तात्पर्य, तुमच्या भावना जितक्या विविध व तीव्र असतील, तितके उत्तम; पण त्याबरोबरच लक्षांत ठेवा, त्या तुम्ही आपल्या कह्यांत ठेवल्या पाहिजेत; कारण ती रानहरळी आहे. मर्यादेत ठेविली तर सुंदर; नाहीं तर बागेची शोभा विशोभित करील. तुमच्या भावना जर दुर्बल, झुरू मरू असतील, तर त्याना रोज चांगलें खत घालीत जा; म्हणजे चांगल्या फोफावतील. भावना–उर्मी नसाव्या, नष्ट कराव्या, ही समजूत वेडेपणाची आणि आत्मजीवनास विषतुल्य आहे. तुमच्या भावना जितक्या उचंबळत्या असतील तितके चांगले मात्र त्याना आटोक्यात ठेविले पाहिजे. नाहीं तर दुःख ठेवलेलेंच आहे. त्याना मोकाट सोडा, की अंतर्गुरूचा हात सुटला आणि परमार्थाचा राजमार्ग सुटला म्हणून समजा. मग ती तुमची रानतट्टें कोणत्या आडवाटेनें, कोठवर फरफट काढतील कोण जाणे! सारांश, भावना प्रचंड असाव्यात, पण त्या लीलेनें हातात खेळत्या ठेवाव्यात.

'बिचारा कोणाच्या वाटेस जात नाहीं!' असे नकारगुणी, बसे होऊं नका; उठा. साहसी पुरुषार्थ करायला बाहेर पडा. मी हें निक्षून सांगतो याचें कारण, आपल्यांत एका सांच्यांतली चित्रे बनण्याची वृत्ति आढळते. आपल्याला वाटतें, सगळ्यांचे एकाच ठेवणीचे विचार असावे, सगळ्यांनीं एकाचेचभोंवतीं घोळ घालावा. 'मी ह्या किंवा त्या चळवळींत नाहीं' म्हणजे माझी प्रगति खुंटली, असें आपल्याला भय पडतें; पण प्रगति म्हणजे काय? नुसता शब्द गौण आहे. मुख्य गोष्ट म्हणजे स्वसुखप्राप्ति; स्वसुखापुढे जगांतलीं क्षुद्र सुखें, मी तर सर्व कःपदार्थ लेखतों. तुम्ही स्वतः स्वसुखानें सुखी व्हा, तुमचें ध्येय तुमच्या डोळयांपुढें निरभ्र, स्वच्छ व निरंतर झळकतें राहूं द्या, म्हणजे झालें कार्य. मग तुमचा धर्म कोणता, तुमच्या डोक्यावर मुकुट कोणता व तुरा कोणता हा काय प्रश्न आहे? क्षणभर भगवान् बुद्ध आणि त्याचा शिष्यसंघ यांचें चित्र मनश्चक्षूपुढे आणा. ते शिष्य त्या काळचे अलौकिक थोर पुरुष होते. सर्वांचा गुरु एक, ध्येय

एक. कोणतें? तर स्वतः भगवान् बुद्ध. तथापि त्या प्रत्येकाचे अंतरी प्रतिभेची दिव्य ज्योत तेवत होती. ते सामान्य मनुष्य नव्हते; कारण त्या वेळचे अपवादभूत व असामान्य असे जे भगवान् बुद्ध त्यांचे ते अनुयायी होते. बुद्ध म्हणजे मानववृक्षाचें सर्वांत उच्च गेलेलें फूल! आपण सर्वजण त्याच्यासारखे बनलें पाहिजे.

---

[ २ ]

# आवड व उत्साह



आणखी एक गोष्ट मला तुमचे मनांत ठसवायची आहे. तुम्ही जीवनाची आवड धरली पाहिजे. त्याचें मोठें महत्त्व आहे. आवडीवांचून साऱ्या जिण्यांत कांहींएक होणे नाहीं. तुम्हाला आवड, अगदी उत्कट आवड असली पाहिजे. मला सभोंवतींच्या सर्व वस्तू आवडतात; कारण सर्व मला बोध देतात. सर्वांचेठायीं मला चिद्रूप दिसते. सर्वत्र सत्, चित्, सुख, शम-शांति शोधायची; ह्यावेगळा सगळ्या जीवनांत मला उद्योगच नाहीं.

जीवनाची खरी आवड, खरी गोडी लागायला, मनाचे विचार आणि भावना सर्व दिवसभर सजाग व सक्रिय राहिल्या पाहिजेत; निद्रित राहून चालणार नाही. माझ्या हृदयांतील आवडीचे बीज नेऊन तुमच्या हृदयांत पेरतां येईल तर काय बहार होईल! मग तुमचे तुम्हाला त्याचे रोप व झाड बनवतां येईल. तुमचेठायीं ही आवड, ही शोधाची आतुरता, सिद्धीची लालसा, परमपद गांठण्यासाठीं इतर सर्व गोष्टी एकीकडे सारण्याचा हा साक्षेप, अंगी बाणल्याविना, त्यागाचा, यज्ञाचा पहिला पाठही तुम्हाला शिकतां येणार नाहीं. ही आवड तुम्ही खरे नागर,$ सुधारलेले, सभ्य

---

$ मुळांत Civilized शब्द आहे. यांत धातु Civis नगर हा आहे. नागर शब्दाचा प्रायः वरील अर्थी प्रयोग ज्ञानेश्वरी अध्याय १ ओवी ७ इत्यादि ठिकाणीं पहा

बनलेले असाल तर मात्र उत्पन्न होईल. जगलीमाणूस म्हणजे मानवजीवनाच्या पहिल्या इयत्तेंतला मुलगा; त्याला सारेंच नवें. तो नुक्ताच कर्मसंचय करूं लागलेला; आतांच कोठें कर्माचीं धुळाक्षरें काढून दुःखाच्या छड्या खाऊं लागलेला. त्या जंगल्याला जीवनांत आवड केवळ एक. संग्रह करावा, उपभोग घ्यावा, सर्व प्रकारच्या देहवासना पुरवाव्या. एवढी संकुचित व क्षुद्र त्याची आवड; परंतु तोच नागर, संस्कारसंपन्न मनुष्य घ्या. पूर्वीच्या अनेक जन्मांच्या अनुभवानें, संस्कारानें दिलेला, बाह्यज्ञान, अंतर्ज्ञान व विवेक-बुद्धि यांचा सांठा त्या नागराचे पदरी असतो. अनुभवजन्य विवेकानें गौण वस्तूंचा त्याग करीत करीत तो येथवर आला आहे. असें करूनच त्याचे ठायीं आवड, सद्वस्तूच्या शोधाची आवड, उत्पन्न होत असते.

तुम्हांआम्हाला ही आवड तितकीच जिव्हाळ्याची व स्फूर्तिदायक अशी लागली पाहिजे, जितकी नुकतेच विषय भोगूं लागलेल्या अडाण्याला विषयाची चट गुदगुल्या करणारी असते, तितकी पाहिजे. त्याचा सगळा जीव नित्याच्या देहधर्मांत भोवतालच्या स्थूल गोष्टींतच गुंतलेला असतो; परंतु ती इयत्ता पुरी करून तुम्ही वर गेलां आहां. तुम्ही निराळा मार्ग चोखाळीत आहां; तुमच्या आकांक्षा निराळ्या आहेत. तो नवनवे कर्मपाश बांधून घेत आहे, तर तुम्ही एकेका पाशांतून मुक्त व्हावयास पाहिजे. तेव्हां आपला निर्धार सबल बनवून वासना कामनांना तुम्ही वरचें वळण लावलें पाहिजे; तरच त्या महद्भूताच्या वाणीस अनुसरतां येईल. तोच तुमचा अक्षय मार्गदर्शक; आणि त्याची वाणी उत्साहाच्चेच द्वारें ऐकूं येते. म्हणून उदंड उत्साह धरा, म्हणजे ज्याची वाणी ऐकण्यास आपण सर्वजण उत्कंठित आहों, तो तुमचा अंतरस्थ स्वामी तुमच्या जीवनाचा सूत्रधार होईल.

आतां ती आवड कशी आणावी बरें ? तर दक्षपणें लक्ष लावलें पाहिजे, विवेकाचा धडा घेतला पाहिजे; कल्पनेची कला आणि प्रत्यक्ष दुःख न अनुभवतां दुःखानुभवाचें फल देणारी सहानुभूतीची विद्या संपादली पाहिजे. याचें एक उदाहरण देतों. एके दिवशीं माझा भाऊ व मी, मनोमय सृष्टींत सहल करायला निघालों. जातां जातां मीं वरचेवर पहावें तों भावाचेपेक्षां माझी सावली काळी ! असे कां ? याचा मनाशीं कांहीं वेळ विचार केला तेव्हां उमजलें कीं, माझी वृत्ति भावाचे व स्वतःचेठायीं सम

नाहीं, आपले ठिकाणी अधिक गढली आहे. आपण दोन कांचांमधून पहावें, एक मलीन व दुसरी निर्मळ; आणि मलीन कांच म्हणजे तें आपलें मन आढळून यावें, तसें हें झालें. तेव्हां दोन्ही सावल्या सारख्या होईपर्यंत मला चैन पडेना. मग कांहीं वेळ प्रयत्न केल्यावर जेव्हां माझें मन भावाच्या मनाशीं पूर्ण समरस झालें तेव्हां दोन्ही सावल्या सारख्या झाल्या. त्यानंतर पुनः मनोमय सृष्टीनेच मी बागेत पडल्या पडल्या एका गवताच्या अंकुराकडे पहात होतो. तुम्हांला ठाऊक आहेच कीं, तृणांकुर प्रथम उगवतो तेव्हां एका वेष्टनांत अगदीं घट्ट गुंडाळलेला असतो आणि नंतर हळूहळू त्यांतून दोन तीन पानें वेगळीं फुटतात. पहातां पहातां मी त्या अंकुराशीं एकजीव होऊन गेलों. पुढें फुटणारीं पानें यावेळीं माझ्यांत एकरूप होतीं. नंतर मी आपल्या उभारल्या डोक्यानें माती बाजूस सारूं लागलों, माझ्या शिरांतून रस बरबर उसळूं लागला. पुढें तीन वेगळीं पानें फुटलीं आणि प्रत्येक पान म्हणजे मीच झालों. मग देहभानावर आल्यावर, मी आपणाशीं म्हटलें, जीवनांत मला दुसरें कांहीं अधिक प्रिय नाहीं. एक ही भेदभाव लोपणाची सिद्धी मिळाली म्हणजे झालें; कारण तिच्या योगानें मला अहंभाव विसरून सर्व जगाशीं तादात्म्य पावतां येतें; वनस्पति, पशुपक्षी, मनुष्य, प्रत्येक कोटीशीं तदाकार बनतां येतें व तितका मी त्या परात्पर सत्याचे सन्निध जाऊन पोंचतो. बाधा काय ती अहंकार, संकुचित आत्मभावना व तिनें निर्मिलेल्या भेदबुद्धीपासून होते.

मी सांगितलेंच आहे कीं, संकल्पशक्ति व आवड प्राप्त व्हायला मन जागरूक ठेवलें पाहिजे, दुसऱ्यांवर बारीक लक्ष ठेवलें पाहिजे, एकमेकांचे गुण घेतले पाहिजेत. पहिल्यापहिल्यानें चाचपडत, ठाव घेत घेत पुढें सरलें पाहिजे. तें कोठवर ? तर पक्की गोडी लागेपर्यंत. एकदा, प्रथम मंद व अनिश्चित असणारा उत्साह प्रचंड व निश्चित झाला, आणि प्रतिभेची ज्योत स्थिर, उज्ज्वल, चेतली म्हणजे झालें. माझ्या मतें प्रतिभावंत मनुष्य† तो की, ज्यानें आपली दृष्टि ध्येयाकडे दिली आहे, ज्याचा उत्साह सदा सजीव आहे, जो त्या गतीची वाट स्थिर पावलांनी चालत आहे, जो आपलें ध्येय डोळ्यांपुढें स्वच्छ, निष्पटल, झळकतें राखण्यासाठीं सदैव धडपडतो; जो

† मूळांत Genius हा शब्द आहे.—भा.

कुटुंबांच्या व जगाच्या क्षुद्र काळज्या व मायाजाळ यांत बुडून जात नाहीं, तर त्यांना एकीकडे सारून आपले ध्येय निर्मळ व निष्कलंक समोर अचल ठेवण्यासाठीं सदोदित झटतो. परंतु तोच सामान्य$ 'शेहेरकर' पहा. तो जगाच्या आवरणात दडपून जातो, त्याला ध्येय दिसत नाहीं, तो परिस्थितीचें खेळणें बनतो, जीवनावर त्याची कांहीं सत्ता चालत नाहीं.

ध्येयप्राप्तीसाठीं उद्योग करायचा, तर जगाची दगदग मनाआड करायला शिकलेंच पाहिजे. ध्येयप्रीतीचें वाफेनें तुम्हाला सारखें पुढे रेटलें पाहिजे. आणि तुमच्या मेंदूला व हृदयाला चैतन्य पुरविलें पाहिजे. नवी सृष्टि कर्तव्य असेल, जगाला–नुसतें दहा पाचाला नव्हे, समस्त जगाला–सहाय्य कर्तव्य असेल तर ध्येयदर्शन साधलेंच पाहिजे. त्या दर्शनानें संपूर्ण जीवन व्यापलें पाहिजे; तें दर्शन म्हणजे शरीर, व तुम्ही अवयव असें बनलें पाहिजे. तो तुमच्या जीवाचा जीव असा सद्वस्तूचा अपरोक्ष अनुभव आला, तरच तुम्ही लोकांना तें दाखवूं शकाल. हें तुमचें कर्तव्य, ह्याची आकांक्षा तुमचेठायीं जागविणें आहे. कशासाठीं? तुम्हीं आपल्या गणापुरते देवबाप्पा बनून बसण्यासाठीं नव्हे; तर, हें जें जीवनातलें दर्शन तें इतर सर्वांना दाखवून देण्यासाठीं.

जगद्गुरु हे खरेच जगद्गुरु आहेत. ते सर्वांच्यासाठीं आहेत, ते जगन्मित्र आहेत. निजज्ञान आणि प्रेम थोड्या थोडक्यांना देऊन यांचा संतोष होणार नाहीं; त्यांचा अवतार प्रत्येकासाठीं आहे. जीवनाचें सुख व सौंदर्य यांची जाणीव सर्वांच्या हृदयात जागी करावी, हा त्यांचा हेतु आहे. यास्तव ज्यांना ही वृत्ति उमजली, ज्यांच्यापाशीं देण्यासारखें कांहीं आहे, ज्यांनीं कष्ट केलेले आहेत, ज्यांनीं प्रतिभेचा दिवा आपल्या हृदयात पाजळला आहे, अशीं माणसें आमच्यात जितकीं अधिक निघतील तितकें ज्ञानाचें, अनुसरणाचें व सेवेचें आमचें सामर्थ्य अधिक वाढेल.

पूर्वीं श्रीबुद्ध व त्यांचा शिष्यसंघ यांची गोष्ट निघाली तेव्हा मी सांगितलेंच कीं ते शिष्य सामान्य नव्हते, अलौकिक होते. गिरिशिखरावरच्या अरण्यातील प्रचंड देवदारुवृक्षाप्रमाणें उंचस्थानीं छाया देण्याचें महत्कार्य ते करून गेले. आपल्या त्या परात्पर सद्गुरूला त्यांनीं जाणलें,

$ हा गांवढळ शब्द गावढळ उच्चारात लिहिला आहे. त्याचा व मागील 'नागर' शब्दाचा व अर्थाचा विरोध ध्यानांत घेणें अवश्य आहे.—भा.

त्यानें सुगंधित केलेल्या वायुलहरी सेवन केल्या, त्याच्या सृष्टींतच वास केला; यामुळें त्या अक्षय आनंदसौंदर्याचा अंश त्यांना जगास देतां आला. तसे पर्वतावरचे देवदारुवृक्ष आपणाला बनायचें आहे. सपाटीवरचीं झुडपें बनायचें नाहीं;—कारण तीं अगोदरच हजारों आहेत.—परंतु आणखी, आपणाला झुडुपपणाही कायम ठेवायचा आहे; कारण बागेतली हरळी किंवा झुडुप यांच्या जीवाची जाणीव असेल तरच तुम्ही महावृक्ष होऊं शकाल.

मीं जें म्हटलें कीं, जीवनाची आवड धरली पाहिजे, त्याचा भावार्थ हा असा आहे. दिवसाचा प्रत्येक क्षण आपण सचेतनपणें खर्चिला पाहिजे. काल मी बायबल वाचीत होतों, तेव्हां त्यांत पुढील वचन आढळलें—' वत्सा, तूं जर देवाचे सेवेसाठीं आला असशील, तर मोहोन्मुख हो, म्हणजे मोह पुढें येतांच वश होणारा हो; सात्विक मोहाला लुब्ध होईल अशा तऱ्हेचें तुमचें तन, मन, सर्व कांहीं जागतें असलें पाहिजे; म्हणजे तुम्हाला दानाचा, सेवेचा स्फुरणानंद चाखायला मिळेल. तुम्ही संस्कारवंत, नागर बनले पाहिजे तें याचसाठी. खरा महापुरुष आहे, भूदेव आहे, आणि संस्कारहीन, कळाहीन आहे, असें ध्यान कल्पनेनेंही रंगविणें अशक्य आहे. येथें महापुरुष म्हणजे अर्थात् शरीरानें नव्हे, तर मनानें व हृदयानें असा माझा अभिप्राय आहे.

तुमच्यावर जर खरा संस्कार झाला असेल, तुमच्यांत आवड व उत्साह हीं उत्पन्न झालीं असतील, तरच तुम्हाला ती वाणी, तिचे ईश्वरी अधिकारयुक्त स्वर, वर्ण, ऐकूं येतील. आपल्या विचारांना व भावनांना सुसंस्कार करा, असा जो माझा कटाक्ष असतो, त्याचें वर्म हेंच. आतां शरीराचें सुखस्वास्थ्य, नीटनेटकेपणा, किंबहुना सौंदर्य, यांकडेहि लक्ष दिले पाहिजेच; परंतु ह्यांपेक्षां अंतःसंस्काराचें महत्त्व फार आहे. तुम्ही आपलें शरीर वस्त्रालंकारांनीं हवें तसें सजवा, पण जोंवर तुमचें मन व हृदय असंस्कृत, जंगली आहे, तोंवर ती वाणी तुमचे कानीं पडणें नाहीं. माझा अभिप्राय असा नाहीं, कीं तुम्ही सुबक, व्यवस्थित, किंवा खरोखरी सुंदर पोषाक करूं नये; माझें म्हणणें इतकेंच कीं पोषाकापेक्षां मनाच्या व हृदयाच्या सुसंस्काराची थोरवी सहस्रपट आहे. अहाहा ! ह्या आर्यवृत्तीपेक्षां अधिक संतोषदायक,

आनंद-आल्हाददायक जगांत कांहीं एक नाहीं. ह्या आर्यवृत्तीचे प्रातीची आवड तिची उत्कट उत्कंठा, तिचा चटका तुमच्या मनाला मला लावतां येईल का ? तुम्ही कोठेंही असा; शाळेंत असा, व्यासपीठावर असा किंवा इतर कोणत्याही व्यवसायांत का असा ना. तुमचेठायीं ही वृत्ति जागृत असली, ती वाणी ऐकण्यासाठीं तुमचा कान सदा टवकारलेला असला म्हणजे झाले. तुम्ही कोणत्या जातीचे, कोणत्या वर्गाचे, कोणत्या स्वभावाचे, कोणत्या धर्माचे आहां, असल्या गोष्टींचा कांहीं हिशेब नाहीं. हे भेदाभेद म्हणजे एकंदरींत, दोन घटका टिकणाऱ्या जगाच्या रहाटीतल्या खुणा, किंवा नांवाच्या चिठ्या आहेत. मी स्वतंत्र, सुखी, सरल आहें, अशी जोंपर्यंत माझी मला जाणीव आहे, तोंपर्यंत दुसऱ्या कोणी येऊन, मी कोण, काय, याची चिठ्ठी माझे कपाळावर लावण्याची गरज काय ? मला दुसऱ्याचे शिक्कामोर्तबाची जरूरी नाहीं. तुमच्यापैकीं जे अजून डळमळित आहेत, जगांतील क्षुद्र सुखामागें धांवत आहेत, त्यांना मात्र दुसऱ्याच्या आशीर्वादाची व आज्ञापत्राची आवश्यकता आहे; आणि ते आपल्या करणीनें एक नवी सोंवळी जात निर्माण करीत आहेत. जोंपर्यंत दृष्टि स्वच्छ ठेवून तुम्ही चालत आहां, जोपर्यंत तुम्ही जगज्जीवनाची ती वाणी ऐकत आहां आणि त्याची आज्ञा पाळीत आहां, तोंपर्यंत जग कांहीं म्हणो, त्या म्हणण्याची किंमत काय ? तुम्ही परात्पराची आज्ञा पाळतां, तेव्हां तुम्ही करतां तोच धर्म, तेंच योग्य. जें तुम्हांला अदृश्य आहे, तें स्वतःचे डोळ्यांनीं पहाण्याची तुमची इच्छा जागृत करावी, याविषयीं माझी तळमळ अधिक अधिक वाढत आहे. कां कीं, तुमच्या डोळ्यांवरचें पटल दूर झालें, तुम्हांला प्रत्यक्ष आत्मदर्शन घडलें, स्वानुभव आला, म्हणजे तुम्ही जगांत जाऊन, जगाच्या डोळ्यांवरचे पडदे टरकावून टाकाल. जनांलाहि क्षुद्र सुख, क्षुद्र विचार, क्षुद्र सिद्धान्त देण्यांत राम नाहीं. तुमच्यांतला प्रत्येकजण असा प्रेषित, असा आदर्श बनला पाहिजे. दुसऱ्यानें सांगितल्यांत संतोष न मानतां, मीं स्वतःचे कानानें ऐकेन, स्वतःच्या डोळ्यांनीं पाहीन असा तुमच्या जीवाचा कृतसंकल्प होण्याची थोरवी किंवा आवश्यकता किती आहे, याची तुम्हांला कल्पना नाहीं. प्रथम ही श्रेष्ठ आकांक्षा उत्पन्न व्हायला हवी, मग ती पूर्ण करायला हवी, म्हणजे त्यानें तुमचीं मनें फुलतील, मनें मोठीं होतील. प्रत्येक मनुष्य एकेक केंद्र असतो,

आणि प्रत्येकाचेभोंवतीं ज्याचें त्याचें स्वतःबद्दलच्या विचाराचें संकुचित मंडल असतें. म्हणून प्रत्येकानें मी अमुकएक आहें ही संकुचित आत्मभावना होतां होईल तों विसरावी आणि आपण सर्व एक आहों ही व्यापक सर्वात्मभावना धरावी. माझें एक सांवळें शरीर आणि काळे केस आहेत खरें; तथापि, तुमचें अंगभूत मी, माझें अंगभूत तुम्ही, असें झालें पाहिजे. प्रत्येकानें निज पद, निजदृष्टी, तर कायम राखायचीच; तथापि सर्वांशीं अभेदभावानें समरसही होऊन जायचें, हीच खऱ्या आत्मजीवनाची रीत आहे.

---

[ २ ]

# देहाभिमान



आणखी एक गोष्ट लक्षांत धरली पाहिजे कीं, परमसत्याच्या, परमानंदाच्या प्राप्तीचें साधन करीत असतांना, आपल्या एकट्या देहाचें सार्थक करायचें, आपल्या जीवासाठीं सुखोपभोग मिळवावयाचे, असा स्वार्थी हेतु धरतां कामा नये; तर जगत्सेवा, जगाला सहाय्य करण्याचा हेतु धरावा. तुम्ही अशी कल्पना करूं नये, कीं 'सेवा, सहाय्य करणे हा अल्प, संकुचित बुद्धीच्या लहान व कनिष्ठ माणसांचा वांटा; तसें करण्यांत आपण केवळ यंत्र, सदा दुसऱ्याच्या तंत्रानें चालणारीं बाहुलीं बनतों.' परमसत्याची प्राप्ती होते तेव्हां त्याला जोडलेलाच परमानंद असतो; आणि ही जोड लाभली म्हणजे मनुष्याचा स्वभावच असा बनतो कीं सेवासहाय्य केल्याबांचून त्याच्यानें रहावत नाहीं.

मला त्या ध्येयाचा साक्षात्कार झालेला आहे; आणि आतां ती माझ्यांतली मूर्ति कोणाला भंगतां येणार नाहीं, कीं हिरावून नेतां येणार नाहीं; कारण तो साक्षात्कार माझे जीवाचा जीव, देहाचा देह, अस्तित्वाचें अस्तित्व असा

आहे आणि त्याचें स्वरूप अविकारी आहे. माझ्यामध्ये जितके बदल होत जातील तितके हें अक्षय होईल. तें तुम्हांलाही दिसेल, तुम्हाला ग्रहण, धारण करतां येईल तुमचे अंगभूत होईल. पण केव्हां? तर जेव्हां तुमचा देहाभिमान † हरपेल, संकुचित दृष्टि लोपेल आणि व्यापक कालातीत सत्याशी तुम्ही एकरूप व्हाल तेव्हां मात्र होईल. स्वतःचा स्व-भाव अर्थात् राहील, राहिलाच पाहिजे—प्रत्येकाला पाहिजे. परंतु देहाभिमानाचे काम नाहीं. जसजसा तुमचा आत्म-विकास अधिक होईल, जितके सद्वस्तूच्या जवळ जाल तसतसे स्वभावांतील गुण-विशेष मोठे होतील, तसतसा एखाद्या फुलत्या फुलाप्रमाणें तुमचा जीव होत जाईल. परंतु तेच तुम्ही जसजसे सद्वस्तूपासून दूर जाल, तसतसा देहाभिमान बळावत जाईल. परमार्थसाधन अधिक घडेल तसतसे तुमचे स्वभावांतील गुणविशेष विकास पावून स्वतःच्या विशिष्ट प्रवृत्ति जगांत दिव्य तेजानें झळकतील.

आता हा देहाभिमान जिंकावा कसा? तर त्याला पहिला उपाय हा की, दृढ प्रयत्नाने क्षुद्र स्वसंतोषवृत्ति मोडून काढावी. ‘झालें—केलें—इतकं पुरे झालं’ असं म्हणण्याची मनाला चीड आली पाहिजे. जनात जरा नांव झाले, आत्मज्ञान म्हणून लौकिक झाला, की लागलीच ‘कृतकृत्य झालो’ म्हणून प्रौढी मिरविण्याची चट; आणि ही खोड बळावली म्हणजे मोक्ष-मार्गाची चाल खुंटली. सुखदुःखातीत, उदासीन वृत्ति बाणल्यावांचून सद्वस्तूच्या सन्निध जातांच येत नाहीं. देहाभिमान उरला, अल्पसंतोष उद्भवला, आपल्या क्षुद्रपणांत संतोष वाटूं लागला कीं क्लेशही मागोमाग आलेच; पण जोंवर सत्याचा सूर्य समोर स्वच्छ तळपत आहे, मायेनें त्याचेआड पटल उत्पन्न करतांच तें फाडलें जात आहे, तोंवर क्षुद्र स्वसंतोष डोकें वर करणार नाहीं. एवढ्याशा कामांत जय येऊं द्या, कीं मनुष्याचे मुखावर कशी दिग्वि-

† या प्रकरणाचा इंग्रजींतील मथळा Personality आहे. मराठींत देहाभिमान असा शब्द योजला आहे. कित्येकांस स्वत्वाभिमान हा शब्द अधिक बरा वाटेल. देहाभिमान व स्वत्वाभिमान यांत जी संकुचित वृत्ति असते ती टाकिली पाहिजे, पण उत्क्रान्तिमार्गावर प्रत्येकाच्या गुणांचा जो विशेष प्रकारचा विकास होत असतो त्याच्या आड येतां कामा नये असे सांगण्याचा येथील आशय आहे हें वाचकांनीं विसरूं नये.

जयश्री नाचूं लागते, तें तुम्हांला ठाऊक आहे. ही शारीरिक प्रसन्नता हळू-हळू मनांत उतरते, आणि मग झालें, तें मन थिल्लरोदक बनतें. तुम्हांला परम-पद गांठणें असेल, सद्वस्तु हवी असेल, तर क्षुद्र दैवतें, क्षुद्र सिद्धांत यांचे नादीं लागून चालणार नाहीं. तुम्ही महादेवालयांत जाऊन सत्याला प्रसन्न करा; मग जन्मांत लघु देवापुढे धूप जाळायला नको. तुम्ही थबकत आहां, लघुदेवतांचे आराधनेंत आयुष्य वायां दवडीत आहां. तुमचें खरें काम म्हटलें तर, जगन्नायकच उत्क्रांतिनियमाचेद्वारें 'आगे बढो' असा हुकुम करीत आहे, तीप्रमाणें कूच करणें हें आहे. ह्या एक देवाचें अखंड अनुष्ठान तुम्ही करायला पाहिजे; आणि जगद्गुरूवर जर तुमची खरी श्रद्धा बसली असेल तर, सर्व विधिविधाने, मत, सिद्धांत यांच्या **पलीकडे** तुमचें अधिष्ठान असले पाहिजे, आणि ह्या सर्व आवरणांचा भेद करून सद्वस्तूचें स्वच्छ अखंड दर्शन तुम्हाला घडलें पाहिजे.

---

[ ४ ]

# हृदय-मंदिर

सत्य आणि आनंद व त्यांचे प्राप्तीचा मार्ग याविषयीं आपण संवाद करीत आलों आहों. आतां तुमचे मनांत मला हें बिंबवायचें आहे, कीं तें सत्य स्वभावतः जरी अमूर्त, निराकार आहे, तथापि माझ्यापुरतें तें, माझे प्रेमी—माझे सद्गुरु, यांचेठायीं साकार, मूर्तिमंत झालेलें आहे.

तुम्ही एखाद्या देवळांत गेलां आणि तेथें केवळ खांब, भिंती इत्यादि नुसत्या बाहेरच्या कवचाकडे पाहिलेंत, तर तुम्हाला तें देऊळ अगदीं निर्जीव, नीरस भासेल. कारण, देवालयांत कलाकौशल्याचें सौंदर्य व अलंकार उपकरणांचा लखलखाट हें सर्व असलें तरी, मुख्य वस्तु म्हणजे भक्तिभावानें निर्मिलेली भगवन्मूर्तीच होय. तद्वत् आपलें प्रत्येकाचें हृदय हें मंदिर आहे, त्यांत त्या भुवनसुंदराची प्रतिमा किंवा मूर्ति आपण स्वतः निर्माण केली पाहिजे, आणि

तिचा देव्हारा प्रेमळ भावानें सजविला पाहिजे; परंतु आपल्यांतले बहुत जण देऊळ रिकामेंच ठेवतात; अशानें नवी सृष्टि आपले हातून कशी घडावी ?

प्रेमानें, भक्तीनें, भावानें ध्यान भजन केलें म्हणजे देवळांत देवाची प्राण-प्रतिष्ठा होते आणि देव जागृत रहातो. माझें देऊळ म्हणजे माझें हृदय. तसेंच तुम्हीही, जो प्रेम--सत्य--सौंदर्याचा गाभा आहे, त्याची मूर्ति आपले हृदयांत स्वतःच्या हाताने, मनाने, भावनेनें घडून बसवा, आणि तिची प्राणप्रतिष्ठा करा. म्हणजे मग तुमचें हृदय नीरस, शुष्क वेदांताचा पोकळ ढोल बनून रहाणार नाहीं; निरंतर चैतन्यानें उल्हासित आणि प्रेमरसानें उचंबळतें राहील. सत्य हें असें आहे. तुम्ही पक्कें समजा, कीं ह्या मंदिरांत जर प्राणाचें स्फुरण, चैतन्याचा प्रकाश, व प्रेमाचा रसोल्लास नसेल, तर तें निर्जीव, उदास, स्मशान बनेल; परंतु तेंच तुम्ही तेथे श्रीगुरुमूर्तीची प्राणप्रतिष्ठा करा, आणि पहा; तुम्हीच तदाकार होऊन जाल. तुमचा देह हा त्या देवालयाचा प्राकार आणि आंत गाभाऱ्यांत ती आत्मज्योती तेवत आहे, हे 'पवित्राणांपवित्रम्' स्थान; तेथें जगाच्या धडपडी, दंगेधोपे वावटळीचा उपसर्ग नाहीं; हवे तेव्हां ह्या निरामय स्थानीं येऊन स्वच्छंद शिवपूजा करीत बसावें.

परंतु प्रथम मंदिर शृंगारलें पाहिजे. आधीं हे देह देवालय निकोप, सुदृढ, व खरोखरी सुंदर बनविले पाहिजे. सुखांत--दुःखांत, सर्व अवस्थांत, दिवसाच्या प्रत्येक घटकेला व क्षणाला, देहाची प्रत्येक स्थिति, गति, अंग-विक्षेप संस्कारवंत व शोभिवंत बनला पाहिजे; प्रत्येकांत मंदिरांतील अक्षय सौंदर्याची प्रतिमा झळकली पाहिजे. एवढ्याकरितां शरीर अत्यंत स्वच्छ, सुंदर व तेजस्वी राखलें पाहिजे, म्हणजे त्याचेद्वारे गाभाऱ्यांतील अनंत लावण्याची कांति जगाला दिसेल.

मला वाटतें अजून ही गोष्ट तुमच्या मनांत चांगलीशी ठसली नाहीं, कीं मनाच्या व भावनेच्या सत्त्वशुद्धीबरोबर देह ही सुसंस्कृत होत जातो. सत्त्व-शुद्धी व संस्कार यांविना देह तामसी व कुरूप होतो, आणि त्याचे स्थिति-गतींत आंतील आत्मदेवाची छबी प्रकट होत नाहीं. पहिली गोष्ट ही ध्यानांत धरा कीं, परमात्म्याची मूर्ति जर गाभाऱ्यांत बसवायची असेल तर त्याच्या-योग्य घर, प्रथम त्याला शोभण्यासारखें सुंदर मंदिर पाहिजे आणि अशा

रीतीनें शरीर सुंदर, मनोविचार सुंदर व मनोभावना सुंदर झाल्या, म्हणजे गंभीर आत्मप्रसन्नता किंवा आनंदवृत्ति प्राप्त होईल.

आपलें बहुधा असे होते की, गंभीरपणाचा उदय झाला, कीं आनंदाचा अस्त होतो; पण आनंद–उल्हासाविरहित जो गंभीरपणा, तो बहुधा कृत्रिम असतो; तो वर्ज्य केला पाहिजे. माझ्या हृदयांत गुरुदेव वास करताहेत, माझ्या हृदयाचा गाभाच ते आहेत. ह्या जाणिवेची गंभीरता तुम्हीच संपादन कराल, तर तिचें बाह्यरूप, उदास तोंड व कलाहीन क्रिया असें कधीं होणार नाहीं; तर त्या गांभीर्याचे सोन्यावर आनंदाचीच जिल्हई चढत जाईल. त्यांचे दर्शन जेव्हां जेव्हां तुम्ही घ्याल, तेव्हां तेव्हां तें तुम्हीं गांभीर्याचे झरोक्यांतून न घेतां, आनंदाचे झरोक्यांतून घेतलें पाहिजे. तुमची वृत्ति खरोखरी आनंदमय, प्रकाशमय, उल्हासमय असेल, तेव्हांच तुमचा गाभाऱ्यांत प्रवेश होईल. देवभक्ताचें तोंड सुतक्यासारखें असावें या भावनेचें आभाळ मनामुखावर आलेलें असतांना गाभाऱ्यांत प्रवेशच होणरा नाहीं; परंतु वृत्ति स्फुरली, आनंद–उल्हासानें उचंबळूं लागली, म्हणजे समजावें कीं हृदयस्थ मूर्तीत तो आनंदमय संचरला आणि आपलाही गाभाऱ्यांत प्रवेश झाला.

काल मी एकटाच फिरायला गेलों होतों. क्षणभर माझी उल्हासवृत्ति मेघाच्छादित झाली होती. ती पूर्ववत् करावयाची होती. विचार-भावनेच्या एका इष्ट शिखरावर आरुढ व्हायचें होते. मी उड्डाणावर उड्डाण मारी, पण केवळ माझे धडपडीनें तें साधेना.

जे माझे गुरु, माझे इष्टदेव, माझे प्रेमी, जो माझ्या सुखाचा झरा– त्यांपाशी जाऊन मला बसावयाचें होतें. पण चमत्कार पहा; जोंपर्यंत मी कुढत कष्टत राहिलो, तोंपर्यंत कांहीं केल्या ती स्थिती हातीं लागली नाहीं; परंतु तोंच सहज स्वाभाविक वृत्तीवर आलो व अंतःकरणांत सुखाचा स्रोत उसळून आला–त्यासरशीं ( मागें एकदां हिंदुस्थानांत असतांना अनुभव आल्या-प्रमाणे ) एका क्षणांत ते माझे गुरुदेव, आकाश-पाताळ, तृणवृक्ष, बाह्यअभ्यंतर ओतप्रोत व्यापून बसले आहेत, असा मला साक्षात्कार झाला. माझें सुनें देऊळ भरलें, हृदयाचें पवित्रांत पवित्र देवघर परिपूर्ण झालें. गुरुदेव तेच मी, मी तोच गुरुदेव, असा अपरोक्ष अनुभव आला. माझें सत्य तें हेंच होय.

जोंवर निर्गुण सत्य तुम्हांला सगुण भक्तिप्रेमाचा रस व आनंद देत नाहीं, नवसृष्टी अंतरंगांतच नव्हे तर बाहेर सभोंवार करण्याची जोंवर त्या निर्गुण सत्यापासून स्फूर्ति मिळत नाहीं, तोंवर त्यास किंमत नाही. पक्षी जसे स्वयंस्फूर्तीनें, केवळ स्वेच्छेनें गातात, जिवाभावानें गातात, तद्वत ते सत्य स्वेच्छेने येऊन त्यानें हृदयमंदिर संपूर्ण व्यापले पाहिजे; परंतु त्याला साहित्य आपण दिलें पाहिजे. उत्कृष्ट परिस्थिति व मूर्तीजोगी शिला हीं आपण पुरविलीं पाहिजेत. चित्तप्रसाद, उत्कट आनंद, गंभीर उल्हास यांची शिला पाहिजे. तुम्ही गंभीर वृत्ति धरा. पण ती विचित्र आंबट-तोंडी गंभीर-वृत्ति असतां कामा नये. गंभीरपणांत आनंद असला पाहिजे. असा गंभीर-पणा पाहिजे कीं जो लीला करण्याची, आर्य बनण्याची, आनंदित होण्याची तुम्हांमध्यें चळवळ उत्पन्न करील; अशी स्फूर्तिदायक मूर्ति हृदयांत घडवून बसवा आणि देह तिला साजेसें मंदिर बनवा.

मी प्रत्येक दिवशीं पहातों आणि प्रत्येक दिवशीं सत्याची छबी मला काहीं अपूर्वच दिसते. पर्वत चढतांना कशी गंमत होते ? आपण माथ्यावर म्हणून चढून पहावें, तों समोर एक डोंगराची रांग उभी ! ती खालच्या सपाटीवरून दिसलेली नसते. बरें, त्या रांगेचे माथ्यावर चढून, 'आतां तरी सर्व देखावा दिसेल' असें म्हणावें. पण छे; तेथेंहि आणखी एक रांग दृष्टी-पुढें उभीच ! तसाच चमत्कार सत्यदर्शनाचाहि असतो. स्वतःमध्ये सारखा बदल व्हावयास पाहिजे, नेहमीं नवनवे दृष्टिकोन व क्षेत्रें सन्मुख येतात व आलीं पाहिजेत. ती परमतृष्णा लागली, आपलें अंतर्याम त्या गुरूंच्या प्रतिभेने, सामर्थ्याने, त्यांच्या आर्यतेजाने, भरून घेण्याची शक्ति अंगी आली, म्हणजे तुम्ही स्वतःच आर्य बनून जाल, तुमच्यावर त्यांची छाया पडेल—त्यांच्या स्वतंत्र कल्पकतेचे प्रतिबिंब तुमच्या कृतींत चमकूं लागेल. त्यांच्या-पाशीं सगळ्या नवीन कल्पकतेचा, सर्व सौंदर्याचा, नवसृष्टि-कौशल्याचा मूळ झरा आहे. त्याचा नळ आपले हृदयात घेतल्यावाचून—त्यांचें प्रेरक ज्ञान व सामर्थ्य-प्रसाद सपादल्यावाचून, आपल्याच बुद्धीने, नवसृष्टिकर्ते होण्याचा अट्टाहास केवळ व्यर्थ आहे. म्हणून सभोंवार हिरवीगार शेतें पसरलीं आहेत, वर निरभ्र अनंत आकाश आहे, आणि सर्वत्र परमशांति नांदत आहे, अशी परिस्थिति आहे, तोंच तुम्ही आपले हृदयमंदिरांत ती मूर्ति घडून स्थापन करा.

२

माझा असा संकल्प आहे कीं, तुमचे हृदयमंदिराचीं कपाटें फोडावीं आणि तो सूर्यप्रकाश आंत घ्यावा. जीर्णोद्धार करण्यांत, अमंगळ सगळें भस्म करून सुंदर नवसृष्टि करण्यांत, तो एक तुमचा सहाय्यक आहे, सत्याचे प्राप्तीचा, आणि हृदयमंदिरांत परमात्म्याची मूर्ति स्थापण्याचा, तोच एक उपाय आहे. तो गुरु प्रत्येकाचे द्वारापाशी येतो; बारंबार येतो. परंतु आंत येऊन रहातो केव्हां ? तर त्याला आपल्या हृदयासनावर बसवून ठेवण्याचें सामर्थ्य जर तुमच्या अंगीं असेल, त्याचा सहवास साधन करण्याइतका, पूर्वी भोगलेल्या अनेक दुःखांचें व सुखानंदाचे फळ वाया न दवडण्याइतका, जर शहाणपणा तुम्हांमध्ये असेल, तर मात्र तो आंत येऊन राहील.

इतर सर्व गोष्टी विसरून, त्या महादेवाचे देवालयांत जाऊन, त्याची भक्ति-पूजा करीत रहाण्याची आवड जर तुम्हाला लागली, तर केवढें सुख, केवढा आनंद लाभेल, काय सांगावें !

कालचीच गोष्ट. क्षणभर मला भास झाला की माझें निधान हरपलें ! आणि काय ? तत्क्षणी मला हालवेना कीं श्वास घेववेना ! मंदिराचीं दारें खिडक्या एकजात बंद ! केवळ अंधतमात मी बुडालों ! मग तीं उघडण्या-साठीं धडपडलों व त्या गुरूला शोधलें. जेव्हा पुनः ते पाय हातीं लागले, ते खरो-खरी हृदयांत असलेले अनुभवास आले, तेव्हा पुनः शांति, प्रकाश, आनंद ह्यांचें रामराज्य झालें. मेघांचें काहूर माजतें, पर्जन्याचा लोट कोसळतो, वादळ अकाडतांडव करतें; आणि नंतर पुनः सूर्यप्रकाशाची सुवर्णशलाका बाहेर येते, तिला भेटतांच सृष्टि कशी आनंदानें प्रफुल्ल होते ! तसा प्रकार काल माझा झाला.

एकदां ह्या सौंदर्याचें प्रत्यक्ष दर्शन घ्या, निजहृदयांतील सत्याच्या प्रचीतीचें तें अक्षय सुख अनुभवून पहा, म्हणजे अवघें विश्व हे तुमच्या मंदिराचा परमपावन गाभारा आहे असें दिसेल. मग त्या वातावरणानें तुमचें जीवन चालूं लागेल, तेथील नेत्रांनीं तुम्ही पाहूं लागाल, आणि त्यायोगें प्रत्येक लहानशी वस्तू, प्रत्येक लहानशी क्रिया, प्रत्येक लहानशी कल्पनाही आपापलें स्थान पावून शोभूं लागेल. खरा संस्कार, खरा संयम, खरा आलोक* हे तुमचे स्वाभाविक

---

* Enlightenment; बंगालींत असाच अर्थ आहे; ज्ञान.

अलंकार बनतील, आपला प्रतिभेचा दिवा पेटविण्याचा,¶ खऱ्या सुखानें सुखी होण्याचा एक हाच मार्ग आहे. जर ही उल्हासयुक्त गंभीरता साधली, आत्मिक बौद्धिक, मानसिक स्वास्थ्य निर्दोष लाभले, तरच ते आत्मैश्वर्य दृष्टीस पडेल; आणि प्रत्येकाला तें तेज, ते पावित्र्य, ती आर्यवृत्ति व माहात्म्य प्राप्त होईल कीं जें त्रिभुवनात कोणालाही विचलित करतां येणार नाही. चराचर विश्वात त्याचे दिव्य तेज उच्छ्वासित होत आहे व त्यापुढे एकन् एक कुत्सित, अनार्य वस्तु भस्म होत आहे. त्या आदिकारणापाशीं जा. तेथे न जाण्यात केवढी हानि आहे याची तुम्हाला कल्पना नाहीं. आदिकारणापाशीं जाल तरच आदि व अत याचे रहस्य समजेल; आणि त्याहून मोठी गोष्ट ही कीं, तुम्ही स्वतःच परमगुरुशीं जाल, त्याशीं एकरूप व्हाल, आणि तुम्ही इतर हजारो माणसांना ज्ञानाचा झरा व्हाल.

तेव्हां हृदयमंदिर आणि त्यांतील मूर्ति याचा विचार तुम्ही निरंतर ध्यानांत ठेवावा. त्यापासून तुम्ही घरी, दारी, मार्गी, खेळत किंवा काम करीत, कोठेही आणि कसेही असा, तुमचें मन नेहमी शांत, समाधानयुक्त राहील. कारण, तो गुरु सदा सन्निध राहील, बाहेर कलह कोलाहल असला तर असेना; त्याचें आंतील देवाला काय ? जोपर्यंत तुमची शांति अचल आहे, जोपर्यंत तुम्ही स्वतः त्या महादेवाची पूजा करीत आहां, आणि दुसऱ्याकडूनही करवीत आहां, लोकांना आत्मसुखाने सुखी करीत आहा, तोपर्यंत कशाचें काही भय नाही. पूजेचे कोणतेही बाह्यविधि किंवा ईश्वरावर भाष्ये लिहिणारे कोणतेही उपाध्ये—आचार्य इत्यादिकांकडे तुम्हाला मुळी बघण्याचेंच कारण नाही. ती ईश्वरी विभूति तुमचेपाशी आहे तोंवर तुम्ही आनंदात असणारच. तुम्ही मूळ झऱ्याचे पाणी प्याल्यावर तुमच्यात प्रतिभा चमकलीच पाहिजे. तुम्ही नवी सृष्टि करणार व जनास सुखी करणार ! आणि तोच नरजन्मातला पुरुषार्थ ! त्याचसाठी तर आपला जन्म !

---

¶ To acquire the spark of genius.

[ ५ ]

# सरिता-सागर



वर निळें निळें अनंत आकाश, खालीं अगणित छाया; अशा पर्वणीचे दिवशीं बोलण्यासारखा विषय एक मात्र आहे तो—सुखाचें साम्राज्य हा होय. बाहेर असे मनोहर सृष्टिसौंदर्य बिस्तारलेले असतांना, विचार हाच सुचला पाहिजे की असेंच आणखी अंतरंग-सौंदर्य, अथवा स्वानंद-साम्राज्य, आपणाला कसें प्राप्त होईल ? तर त्याचे प्राप्तीचें साधन एकच—तुमचा आत्मा परमात्म्यांत लीन, एकरूप करून टाकावा. आपणा सर्वांचा असा पक्का विश्वास आहे—कित्येकांना तर स्वानुभवही आहे—कीं असा एक समय येईल,—होय, खचित येईल, की आजवर आपण ज्या वाणीची आज्ञा ऐकत आलो ती आपल्यामागें असा अंकुश, असा नेट लावील कीं, ‘सर्व सोडा आणि माझ्यामागें या !’ प्रत्येकाला असा प्रसंग येणार आहे. ही आज्ञा, हा आदेश निरनिराळ्या माणसांना निरनिराळ्या रूपाने परिस्थित्यनुरूप येईल; परंतु तो येणार हें खचित. तेव्हां तो आला, म्हणजे आपण कोणत्या वृत्तीने, कोणत्या मनोभावनेनें त्याला उत्तर देणार ? सर्व सोडून त्याचेमागें आम्ही कसे जाणार ? त्याचा किती मान ठेवणार ? सर्व सोडायचें म्हणजे काय काय सोडायचें ?

ते मी आपणाशीं ठरविलें आहे, ते असें—

मला वाटते, बाह्य गोष्टी, म्हणजे सुखस्वास्थ्य, धनमान इष्टमित्र, यांचा त्याग करणें तारतम्याने सोपें जाईल; परंतु एक त्याग अत्यंत कठीण पण अत्यंत महत्त्वाचा, अत्यंत योग्यतेचा, अत्यंत पवित्र व पावन असा आहे, आत्मसमर्पण—म्हणजे आपलें पृथक् अस्तित्व **त्यांच्या** स्वरूपांत लय करून त्याच्याशीं केवळ एकरूप होऊन जावयाचें. हें एकरूप होणें म्हणजे काय ? तर तुमच्या विशिष्ट आवडी नावडी, मतें, पूर्वग्रह इत्यादिक सर्वांवर साफ बोळा फिरवायचा. हें कठिणांत कठीण आहे. तथापि हें तुम्हाला केलें पाहिजे. तुम्ही कोणी—कांहीं आहां, हे पुरे विसरून केवळ तदाकार झालें पाहिजे.

एक सामान्य अनुभव आहे. तो कधीं तुमचे ध्यानीं आला आहे का ? आपण एखाद्या टेकडीजवळ उभे असावे; टेकडीचेआड गगनचुंबित, हिमाच्छादित पर्वतशिखरांचा अफाट देखावा कोसचे कोस पसरलेला असावा; तथापि आपणास भास होतो कीं, फक्त एक टेकडी ही आपणासमोर आहे. थेट तोच प्रकार अध्यात्ममार्गांत आपला होतो. आम्ही लहानसान गोष्टी सोडतों आणि म्हणतों, 'केला त्याग !' पण क्षुद्र वस्तूंचें महत्त्वच नसतें. त्या सोडण्याचेंही कारण नाहीं. हें टेकडीपुढे उभें रहाणे झाले. खरें कर्तव्य म्हणजे टेकडी चढून जाऊन, पलीकडे प्रचंड शिखरश्रेणीवर दृष्टि टाकणे हें होय. 'माझा मार्ग, माझी भावना, माझी उपासना मला बरी, मी आपला तिलाच चिकटून रहातों' असे म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ते तारे पहा. किती सुंदर ! कसे लुकलुकतात, कसे चमचमतात ! पण कोठवर ? तर चंद्र उगवेपर्यंत. एकदां त्या निशाधिपतीची स्वारी, आपल्या सकल शांत ऐश्वर्यांत बाहेर पडूं द्या, कीं एका क्षणांत तीं लघुतेजे त्या गगनव्यापी चंद्रिकेंत लुप्त होतात. तोच प्रकार **त्यांच्या**पुढें—आमच्या त्या **महाराजां**पुढें तुमचा आमचा झाला पाहिजे. याचा अर्थ असा नाहीं कीं 'तुमचे व्यक्तिगत स्वत्व नष्ट करा.' तर सांगण्याचा भावार्थ हाच कीं 'तुम्ही **त्यांच्या**सारखे व्हा;' आणि त्याचा उपाय हा कीं 'जगांतील प्रत्येक गोष्टीकडे **त्यांचे** दृष्टीने पहायला शिका.'

मेघ, आकाश, यांकडे चित्रकार कसा वेगळ्या दृष्टीनें पहातो ? त्या वस्तू त्याला कांहीं निराळाच संदेश देतात. तो आपणाशीं म्हणतो—'ह्यांच्या दर्शनानें माझ्या अंतःकरणाला जो अनुभव आला, त्याचा वांटा लोकांस देणे आहे; त्याला प्रतीक म्हणून यांचे कसे चित्र काढावे बरें ? त्यांच्या नुसत्या बाह्यरूपाची केवळ प्रतिकृति (नक्कल) काढून काम भागणार नाहीं.' त्या चित्रकाराचें आपण अनुकरण केलें पाहिजे. आपणांस बांधणाऱ्या बंधनाचा भेद करून आंत त्या तत्त्वापाशीं गेलें पाहिजे; तेथें सर्वांचें तत्त्व तो परमात्मा, त्याशीं एकरूप झाले पाहिजे; आणि त्या भूमिकेवरून आपल्या स्वतःकडे व जगाकडे पाहिलें पाहिजे. आपल्या एकट्याच्या आवडीच्या खेळण्यांनीं घरकूल सजवून, सदा त्यांत डोकें खुपसून बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं. वर सांगितलेल्या उच्च भूमिकेवरून आपलें शरीर, मन, विचार, भावना यांचें सूत्र चालविलें पाहिजे, तरच **त्यांचे**मागें जातां येईल.

खरोखरी तो शुभमुहूर्त येऊन ठेपला, आणि ज्यापरतें अन्य प्रमाण नाहीं, ज्याचा अधिकार अगदीं शेवटचा, त्याची, त्या वाणीची आज्ञा सुटली, म्हणजे तुमचेपैकीं कितीजण ती उमजतील, व कितीजण अनुसरतील, याची मला शंका वाटते. आणि जे सामान्यतः आज्ञा पाळतील, त्यांतही जशी सरिता सागरांत, बिंदू सिंधूत, तसे त्यांच्यांत एकरूप होऊन जाणारे लाल किती निघतील कोण जाणे? तुमचें विशिष्ट स्वत्वाचें क्षेत्र फार संकुचित! तुमचा इष्टदेव वेगळा, आवडी वेगळ्या, विचार वेगळे, बोलणें चालणं सगळें वेगळे आणि संकुचित! आतां गुरूस अनुसरायचें, म्हणजे गुरूचे नांवावर विकेल, तें ते डोळे मिटून पदरीं बांधायचें, असा अर्थ नाहीं. तर गुरूस अनुसरणें म्हणजे, मन व हृदय अगदीं स्वच्छ, सर्व दिशांस उघडे ठेवणें, पूर्वग्रह व कुतर्क यांपासून अलिप्त राखणें, आणि परमात्मरूपीं तल्लीन होण्यार वृत्ति सदा प्रवण ठेवणे, हं होय. सद्गुरूस अनुसरणें यांतील वर्म हेंच; आणि ह्यानेंच मात्र तुम्हांला नवसृष्टी करतां येईल. परमात्म्याचेठायी निजधार करूं शकाल, त्या डोळे फिरवणाऱ्या उंचीवर ठाणें मांडूं शकाल, तर प्रति भावंत होऊं शकाल. जसें होण्याची कामना खरोखरी सर्वांचे हृदयांत बस असते, तसे तुम्ही वस्तुतः व्हाल, म्हणजे सुखी व्हाल. सुख कशा मिळेल? तर स्वतःचा विभक्त आत्मा विसरा, त्याचा नाश करा, म्हण विश्वात्म्यांत, परमात्म्यांत त्याला लीन करा, म्हणजे सुख मिळेल. परंतु म अमक्या प्रकारचा आहे, अमक्या मंडळींतला आहें, अमक्या वृत्तीचा, अमक गुणधर्मांचा आहें, इत्यादि शब्दजालांत गुरफटून भेदभाव वाढवाल, त सद्वस्तूपासून दूर दूर भटकाल. हीं सगळीं केवळ विशिष्ट परिस्थितीचीं चिन्हे ओळखीपुरत्या खुणा आहेत, हें जर विसराल, तर त्यानें तुमचा प्रश्न सुटण नाहीं. प्रश्न सुटण्याची किल्ली एकच—स्वतःचा आत्मा विसरावा आणि प मात्मभाव धरावा.

परमात्म्याला अनुसरा. परमात्मा अचल व नित्य आहे. चंचल क्षणभंगुर वस्तूंचेमागें लागूं नका. तुम्हाला हें समजलें पाहिजे क स्वतःच्या जीवाच्या उन्नतीसाठीं या लोकीं योग्य त्या सोयी व साधनें मा सानें करून दिलीं पाहिजेत. तरच जीवनाच्या मुख्यार्थाचे यथार्थ द घडेल. शरीरशिक्षणाच्या गोष्टी आपण नेहमीं बोलतों, पण अंतरंगाच

शिक्षणाला विसरतों. आंत जीवाला उन्नतीची व पूर्णत्वप्राप्तीची उत्कंठा असते. ती ध्यानांत ठेविली, तर ती आस पुरविण्यासाठीं, खालच्या भूमिकेवर केव्हां व कसें, नमतें घ्यावें हें तुम्हांस ( कनिष्ठ मनाला ) समजेल.

त्या सुखाचे राज्यांत येऊन रहाण्याची संवय तुम्ही सर्वांनीं पक्की लावून घ्यावी. त्यांत एकदां प्रवेश झाला, म्हणजे ते सारखें कोसावर कोस वाढत कसें जातें, याची तुम्हांला कल्पना नाहीं. शारीरिक, मानसिक, यच्चयावत् गोष्टींपेक्षां खरें सुख, आत्मसुख अत्यंत श्रेष्ठ आहे, हें तुम्हांला नीट समजलेसें मला वाटत नाहीं. खरी स्पृहणीय, प्राप्त करण्यास योग्य अशी स्थिति तीच एक आहे; जिंकून हस्तगत करण्यास योग्य असें तेंच एक राज्य आहे. आणि माझे मनाची हौस एवढीच आहे, कीं तुम्हांला त्या राज्यांत घेऊन जावें, तुमचें तुम्हांला तेथचें सौंदर्यविभव पाहूं द्यावें; कारण एकदां तुम्ही स्वतः तें पाहिलेंत म्हणजे तुम्हांला तें सोडणार नाहीं, आणि अशाश्वत, नाशवंत वस्तूची आसक्ति पुनः जडणार नाहीं. मी निश्चयानें सांगतों कीं, जसजसा काळ लोटेल तस तशी ही गोष्ट तुमचे हृदयांत अधिक पक्की ठसेल कीं, स्वतः जीवांत सांठविण्यास योग्य, व दुसऱ्यास देण्यास योग्य असें हेंच एक सत्य आहे.

तसेंच, तुम्हांला संस्काराचीही आवश्यकता आहे–ग्रंथावलोकनाचा संस्कार, इहलोकच्या सामान्य गोष्टींचा संस्कार, विवेकाचा, सुखाचा, गंभीर उल्हास-वृत्तीचा इत्यादि सर्व सुसंस्कार पक्के अंगीं मुरले, किंबहुना देहस्वभावच बनले, म्हणजे तुम्ही सद्गुरूचे सच्चे चेले व्हाल. संस्कार व सत्त्वशुद्धि यांवांचून, संस्कार व सत्त्वशुद्धि यांचें विलासस्थान जे गुरुदेव, त्यांचे अंगभूत तुम्ही होणार नाहीं; तुम्हांला त्यांचे शेजारीं राहून सुज्ञतेनें व उत्साहानें सहकार्य करतां येणार नाही. समजा, एक कलाकुशल पुरुष आहे; तो तन्मय होऊन नवसृष्टी रचीत आहे. पडत झडत धडपडत आहे, तथापि नव प्रतिमा निर्मीत आहे. आणि दुसरा एकजण आहे, तो आपला लहानगा देव व लहानगा देव्हारा हेंच परब्रह्म मानून संतुष्ट आहे, स्वस्थ आहे. तर त्यांमध्यें तो पहिला सद्गुरूंचे अधिक जवळ आहे असें समजा.

तुम्ही तसे कलाकुशल पुरुष बना, सद्गुरूंचे सहकार्यकर्ते व्हा, आणि तुमच्या आत्म्याला जो खरा अनुभव येईल, तो जगाला द्या. एरवीं साधकाला एकटेंच पडल्यासारखें भासतें, मन उदास, निरुत्साह होतें; अशीं कितीतरी

विघ्नें येतात, आणि सुखाची माती व उत्साहाचा प्राणघात करतात. पण तीं सर्व विघ्नें, आत्मस्थिति बाणतांच कशीं नाहींशीं होतात, याची तुम्हाला कल्पना नाहीं. जीवनांत मुख्य सुखाचें साम्राज्य. त्यांत एकदां घर करून रहा, युगानुयुग टिकणाऱ्या त्या चैतन्यांत मिळून जा. म्हणजे मग, एकटे आहां की दुकटे, सुख होतें कीं दुःख, जय की अपजय, ह्या गोष्टींचें स्मरणच होणार नाही. एकटें खितपावें लागेल, एकमेकांचें प्रेम, मैत्रीहि अंतरेल, असें तुम्हां सर्वांना मोठें भय पडतें. त्या वस्तू गोड आहेत, त्यांचा वेळेवर उपयोग आहे, मोल आहे; परंतु एकदा परमात्म्याची सगत जोडली, म्हणजे त्याचेवांचून उणेपणा वाटत नाही. मग एखादें झाड किंवा पाखरूं, गवताची काडी किंवा छाया हीं क्षणिक देहसुखापेक्षां कितीतरी श्रेष्ठ असें आत्मसुख देऊं शकतात; कारण, सर्व त्या चित्सागराचेच तरंग आहेत. एवढ्यासाठीं तुम्ही परमात्म्याशी अभेदभावाचें पद गांठलें पाहिजे, आणि लहानथोर सर्व गोष्टी त्या दृष्टीनें पहाण्यास शिकलें पाहिजे.

---

[ ६ ]

# अनुभवाचें मोल



ती वाणी आणि तें महद्भूत, ¶ ज्याचें वचन तुम्हीं ऐकलें पाहिजे, ज्या एकाविना दुसऱ्या कोणाची आज्ञा मानणें तुम्हांस जरूर नाही, त्याविषयीं आपला संवाद पुढे चालवू या. तुमचा आत्मविकास होऊं लागला म्हणजे तुम्हांला कोडीं येऊन पडणार, संकटें अडविणार, आणि त्यांतून पुढली वाट तुमची तम्हांला काढावी लागणार ! तुम्ही महावृक्ष बनलें पाहिजे. असंख्य वादळें येतात जातात, त्यांचें मूळ उपटूं शकत नाहींत;

---

¶ मागील पृ. १ वरील टीप पहा.

लोकांस छाया देण्याचें व्रत अखंड चालवीत तो महावृक्ष आनंदांत डुलत असतो. भू-नभांतली कसलीही बाबटळ त्याला ढळवीत नाहीं; तो पर्वतासारखा अचल रहातो. तो समुद्रांत, लाटांच्या सतत कल्लोळांत, जसा डोंगर तसा, सहस्रावधि पक्ष्यांना आश्रय देत, अढळ उभा असतो. कारण त्याचें मूळ खोल व दृढ असतें. थेट तसें तुम्हाला बनलें पाहिजे.

एकच वचन प्रमाण, एकच आज्ञा पालनीय ! ती त्या अंतस्थ वाणीची कीं जिच्यांत कधी अंतर होणें नाहीं, कीं जिला जग ढळवूं शकत नाही. ह्या अनुष्ठानानें हळू हळू तुमची सौंदर्याभिरुचि विकसित होईल. तुमचाच जीव तें सौंदर्य निर्माण करील, आणि उत्तरोत्तर तें अधिकाधिक आत्मानंद देईल. खऱ्या सुसंस्कृत, नागर, अध्यात्मप्रवण मनुष्याला तेंच एक प्रमाण मान्य होतें. दुसऱ्याचा शास्त्राधार, किंवा दुसऱ्यानें मारलेला शिक्का, यानें त्याचें समाधान होणें नाहीं. जें अंतर्गी पटेल, त्यालाच मान सहज तुकावेल.

येथवर आपण ती वाणी, तें क्षमा न करणारें महद्भूत, तो सुलतान जागृत कसा करावा, ह्यासंबंधीं दोन तीन कल्पनांची चर्चा केली. आतां तुमचेपुढें आणखी एक कल्पना मांडतों. ती वाणी समजायला अगोदर तुमचे अंतःकरणांत असंतोष, अराजक, क्रांति यांचें तुफान येऊन गेलें पाहिजे. या वात्याचक्राच्या केंद्राचा जोर इतका वाढला कीं, क्षुद्र अर्थ चटसारे बाहेर फेकून परमार्थाचें सामर्थ्य मात्र उरलें पाहिजे. ‘ अंतर्यामीं बावटळीचा प्रलय साहून तुम्ही गगनांतील रासमंडळांत नाचणाऱ्या तारकाला जन्म दिला पाहिजे.’ संतोष प्रसवणाऱ्या असंतोषाला उत्तेजन दिलें पाहिजे; त्याला गुदमरून मारून टाकणें चांगलें नाहीं. तुमची उत्कंठा जितकी तीव्र होईल, कां व कसें हें जितक्या अधिक तळमळीनें विचारूं लागाल, तितका तुमच्या अंतरंगांतील भोंवरा अधिक जोरानें फिरेल, अधिक गोष्टींचा तो उच्छेद करील आणि तितकी तुमची सत्यतृष्णा व सत्यनिष्ठा अधिक समर्थ होईल. तुमच्या विचारांत, भावनांत, जंगी भोंवरा—नाचऱ्या चोंचल्यांचा नव्हे, रडव्या मनोविकारांचा नव्हे—उसळून सोडला पाहिजे—त्याच्या गरक्याचे सपाट्यानें, मंथनानें, अगणित क्षुद्र पदार्थ दूर फेकले जातील आणि मध्यभागीं एक निर्धार जोरास चढेल. तो जंगी भोंवरा जोरजोरानें फिरेल, अधिकाधिक बळ

उत्पन्न करील, व त्यांतूनच खऱ्या प्रतिभेचा, तुमच्या निजसृष्टितारकाचा उदय होईल.

हा दिव्य असंतोष तुमच्या हृदयांत कसा जन्मावा! दुसऱ्याचें शहाणपण ऐकून कांहीं तें होणें नाहीं. दुसरे फार तर पायांच्या करून देतील, पण त्यांवर चुना विटा चढवून, स्वतः चढून, बांधकाम करणें तें तुमचे तुम्हीच केलें पाहिजे. त्यासाठीं अनुभवाचे शाळेंत गेलें पाहिजे. म्हणूनच जी केवळ निष्पाप म्हणजे अज्ञानाची स्थिती ती आध्यात्मप्रवण होऊं शकत नाहीं. जो मनुष्य सुखाचें शिखर, दुःखाची दरी, भक्तीचा वा क्रोधाचा उमाळा, असे अत्युत्कट अनुभव घेत जातो, त्याचेठायीं आध्यात्मस्थिती येऊं शकते. कारण, ह्या सर्व प्रसंगांतून त्याचा शोध, त्याचें आत्मान्वेषण चालूच असतें.

आध्यात्मस्थिति पाहिजे असेल, सुखांत रहावयाचें असेल, जर जनाची सेवा करावयाची असेल, तर (उदात्त) "मोहाला बळी पडण्यास तत्पर" असें मन झालें पाहिजे. ‡

अनुभव अगदीं आवश्यक आहे. बालासारखा निष्पाप, पण बालासारखाच बालिश, अशा मनुष्याचा काय उपयोग? त्याची वृत्ति क्षुद्र, संकुचित, मत्सरी होण्याचा संभव फार. अशा वृत्तीचा मोड केला पाहिजे; कारण तिनें मोठे व खरे अनुभव येणें अशक्य. ज्याला कांहीं अनुभवच नाहीं, जो कधीं पोळलेला नाहीं, ज्यानें हृदयांतील तुफान पाहिलें नाहीं, मानसिक क्लेश भोगले नाहींत, अशाचा निष्पापपणा म्हणजे बालकाचा निष्पापपणा. बालक काय? नुसतें लाडके लाडके बोबडे बोल बोलेल! परंतु जो दुःखांतून तावून निघाला आहे, ज्यानें अनुभवज्ञान संपादलें आहे, ज्यानें आपला दुर्ग किंवा मंदिर बांधलें आहे, अशा प्रौढ पुरुषासारखे तुम्ही झालें पाहिजे, असे खरे पुरुष तुम्ही बनलें पाहिजे. जीवनाची स्फूर्ति स्वतः तुमची तुम्ही अनुभवली पाहिजे, उसनी आणलेली उपयोगी नाहीं. परंतु असेंही समजूं नका कीं 'अनुभव घ्या' याचा अर्थ 'मूर्खपणाचे अनुभव घ्या, मूर्ख भावनेला स्वैर नाचूं द्या.' त्याला सामान्य सुखदुःखें, हर्षखेद पुरे

‡ याचा अर्थ नीट समजण्यासाठीं प्रकरण २ पृष्ठ १० मनन करून वाचावें.
—भाषांतरकार.

होतील; तेवढ्या सामग्रीनें तुम्हांस स्वतःची सृष्टि बांधतां येईल. त्या अनु-भव-सरितांच्या ओघाबरोबर जाऊन सुखाचेद्वारें तुम्ही महासिंधूस मिळून, त्याचे पोटीं बिंदु होऊन रहावें, व स्वतःचे अनुभव, स्वतःचें स्वत्व तेथें विरघळून टाकावें. त्याला तुमचेपाशीं, अनुभवाच्या नावा-शिडें व वल्हवण्याची विद्या पाहिजे, तसेंच मागील सर्व अनुभवाचा संचयही असला पाहिजे. नवीन अनुभव, अर्थात् योग्य प्रकारचे अनुभव--घ्यावयाचे म्हणतांच अंग थरारलें, फुरफुरलें पाहिजे, म्हणजे अंतःकरणांत आतांच सांगितलेला हा दिव्य असंतोष पाहिजे, प्रलयमंथन चाललें पाहिजे, म्हणजे त्यांतून स्फुरत् तारका उदय पावेल.

बहुधा मनुष्यें आपल्या चूलबोळक्यांतच गढलेलीं, अल्पसंतुष्ट असतात, आणि स्वतःच्या जगांत बाहुलाबाहुलीचें राज्य बनवीत असतात. त्याचे उलट, तुम्हांला जर कांहीं 'और' कर्तव्य आहे, तर तुम्ही आपला खरा, श्रेष्ठ 'स्व' शोधून काढा, किंवा निर्माण करा; आपली आपण वाट सुधारा; आणि स्वसुख किंवा सद्वस्तु हा जो तुमचा स्वतःचा परमार्थ, त्यावर अचल दृष्टि ठेवा. तळीं, नद्या, समुद्र इत्यादि अनेक जलाशयांतून जसा एखादा धीवर अनेक रंगा-रूपाचे मासे धरतो; एकच लहान किंवा मोठ्या माशानें संतुष्ट होत नाहीं. तद्वत्, जीवनाच्या सर्व प्रकारच्या जलाशयांतून आणि सर्व समुद्रांतून, सर्व प्रकारच्या रंगरूप आकृतीच्या ईशविभूतीचा अनुभवसंग्रह तुम्ही केला पाहिजे. त्या देववाणीची हांक अनुभवाचेद्वारें, विचाराचेद्वारें, भावनांचे-द्वारें येते; ती तुम्ही स्वतः ऐकली पाहिजे. तुम्हांला मूर्ती नकोत, विधि नकोत, आणि कांहीं नको; एक ती दिव्य साहसाची आकांक्षा धरा म्हणजे झालें. देवाची कला नाहीं कोठें? नील नभांत उड-णाऱ्या पक्ष्यांत आहे; त्याच्या पंखावरील उन्हाच्या लकेरींत आहे; त्या एकटेंच उभें असलेल्या झाडांत आहे; हीं शांत हिरवीं कुरणें, ही ओढ्याची नागमोड, हें फूल, ह्या सगळ्या--सगळ्यांत ईश्वर वसत आहे. ह्या सर्व सद्वस्तूच्याच मूर्ति आहेत! हीं सर्व आध्यात्माचींच खरीं रूपें आहेत! अशा नित्य व्यवहारांतील लहान सहान गोष्टींत सद्वस्तु ओळखायला शिका, त्यांच्या सौंदर्यांत तल्लीन व्हायला शिका; आणि त्यायोगानेंच तुम्हाला ते अक्षय सत्य प्राप्त होईल; तें स्वसुखाचें साम्राज्य हस्तगत होईल! हें तुम्ही स्वतः मिळविलें म्हणजे

तुम्हांस दुसऱ्यांना देतां येईल. जो 'आपण कोरडा पाषाण, लोकां सांगे ब्रह्मज्ञान' तो केवळ ढोंगी; पण ज्याने, एकबिंदु का होईना, पण खरें अमृत चाखलें आहे, तो निश्चयानें, ज्ञानाने, अधिकारानें बोलेल. तसे तुम्ही बोलाल, विश्वात्मभाव म्हणजे काय चीज आहे, मानवजातीशीं समभाव म्हणजे काय, सर्व दुःखी प्राण्यांचे दुःखाने दुःखी, सर्वांचे सुखानें सुखी होणें म्हणजे काय, इत्यादिकांचें अनुभवज्ञान असले म्हणजे, तुम्ही अधिकारानें बोलूं शकाल; जीवनाविषयीं नवे विचार, नवे संकल्प, तुम्ही स्वतः निर्माण कराल आणि दुसऱ्याकरवीं निर्माण करवाल. त्यायोगानें तुमच्या चरित्राला नवें वळण लागेल; तुमच्या जीवनांत नवा आनद, नवी स्फूर्ति संचरेल. त्यानंतर बाह्य विधि व संस्कार यांचें तुम्हाला कांहीं महत्त्व रहाणार नाहीं; कां कीं सर्वांचे आदिकारणापाशींच तुमचा वास होईल. अंतःकरणांत तो असंतोष, तो प्रलय, ती उत्कट आकांक्षा उठेल, तरच तुमची गति तेथें होईल. आणखी, परमात्म्याचे एकदां दर्शन झाल्याने काम भागत नाहीं; एकामागून दुसरें झालें, नंतर तिसरें, असा क्रम जन्मजन्मांतरी चालतो. कोठें तरी, केव्हां तरी अकस्मात आरंभ, कोठें तरी केव्हां तरी अचानक शेवट; असा उत्क्रांतीचा क्रम नाहीं. एका जन्मानें तो संपत नाहीं. तो अनंत उन्नतीचा मार्ग आहे; आणि त्याची ज्याला गोडी लागली, तो वाटेंतील क्षुद्र देवतांच्या देवळांत रेंगाळत नाहीं, व मानीव मोठेपणासाठीं शुष्क शिष्टाचाराच्या अवडंबरांत गुरफटत नाहीं. तसे करील तर हा प्रवास म्हणजे एक क्लेशमय व दीर्घ शिक्षा होईल; परंतु, जर साधकाला, त्यानें अनेक सुखदुःखें भोगून, स्वतः निर्माण केलेलें मंदिर आणि त्यांत स्वतः निर्मिलेली मूर्ति, दूर पण स्वच्छ दिसत राहील तर त्याचा सर्व प्रवास त्या सुखाच्या राज्यांतून होईल.

तुम्हाला कांहीं तरी बनलेंच पाहिजे. एक प्रतिभावंत नवसृष्टिकर्ते तरी बना, किंवा संहारकर्ते तरी बना. नाहीं तर, तिसरी गति म्हणजे प्रवाहांत पडलेलें गवत बना, आणि जा वहात, या तीरापासून त्या तीराकडे थपडा खात. पण छे! तुम्ही स्वतः जीवनप्रवाह झाले पाहिजे, त्याची शक्ति बनलें पाहिजे; कारण आत्मसमर्पण भक्तीनें तुमचें जीवन त्यांच्या जीवनाशीं मिळून गेलें आहे. ज्याच्या प्राप्तीसाठीं तुम्ही आतुर झालां होतां, ज्याची मूर्ति करून तुम्ही हृदयांत मांडली, आणि ज्याची आराधना केली,

तोच **गुरु,** तोच सौंदर्याचा गाभा, तेंच परम सत्य, आणि तेंच आतां तुमचें निजांग बनले आहे. कारण सायास–कष्ट सोशीत, त्याला शोधीत, तुम्ही त्याचे दर्शनासाठी आलां, आणि दर्शन घेतलें. जीवनाची अशी कल्पना घेतली तरच जगण्याला स्फूर्ति मिळते, प्रत्येक विचारांत, भावनेत नवप्रेरणा मिळते, प्रतिश्वास हर्ष रोमांच देतो! तेच, क्षुद्र समाधानी, अल्प-संतुष्ट व्हा, कीं ती आत्मजीवनाची स्फूर्ति, तो आत्मिक साहसाचा हर्ष, रोमांच, हे अंतरलेच! त्यानें तुम्ही जनाचे सहायक न होतां, गतानुगतिक व्हाल; नवसृष्टिकर्ते न होतां सृष्टीच्या घरांतले केराचे ढीग व्हाल.

इतक्या मोठ्या मापाने तुम्ही पुरे भरलां पाहिजे; इतकी संस्कृति, सत्त्व-शुद्धि साधली पाहिजे; व अखंड स्वानंदराज्यांत तुम्ही राहिले पाहिजे. ह्या गोष्टींचें महत्त्व कधीं तुमचे जिवाला जाणवेल का? होय. खचित जाणवेल. कारण, स्फूर्तीचा व आनंदाचा कळस झाला म्हणजे प्रत्येकाला क्षणभर तरी ते जाणवतेच. तेव्हां आनंदाच्या राज्यात तुम्ही एकदा स्थायिक घर करा. मग ते केंद्र करून तुम्हाला हव्या तेवढ्या दूरचे व साहसाचे प्रवास किंवा नवे प्रयोग, नव्या घटना करतां येतील; तसे दुसऱ्याना साधणार नाही. कारण तुम्हाला हवें तेव्हां चटकन जाऊन बसायला पक्के आश्रयस्थान आहे. त्यामुळें तुमच्या अंगांत नवचैतन्याचें भरतें येईल, आणि स्वतःचे महात्म्य वाढविण्याची गोष्ट सोडा, पण जनाला सहाय्य करण्याला, अनवश्यक अडगळीचा संहार करण्याला आणि अक्षय संपत्ति निर्माण करण्याला स्फुरण चढेल. अज्ञानाचे राक्षसी पुतळे बनूं नका. राक्षसासारखे काम करणारे नवसृष्टिकर्ते बना. पहा. आपण सारखे धुंडाळीत आहों, शोधीत आहों; पण सर्व प्रश्नांचे समाधान, सर्व शोधाची इष्ट वस्तु सदैव प्रत्येक दगडाधोंड्याखाली, प्रत्येक स्थिरचरांत, सजीवांत निर्जीवांत, अखंड वास करीत आहे. तुमचे अंतरंगीं जर खरा दिवा पाजळला असेल, तर तुम्ही जगांत जाऊन त्या स्वानंद-साम्राज्याचे प्रेषित–दूत व्हा. मी जाऊन मूळ झऱ्याचे पाणी प्यालो आहे; आणि तुम्हाला तेथें घेऊन जाण्याची माझी इच्छा आहे. त्या राज्यांतील छाया (शांति) व आनंद सेवून तुम्ही तृप्त झालां म्हणजे तुम्हीहि दुसऱ्यांना तेथें नेण्यास लागाल.

---

# [ ७ ]

# थोरांचा सहवास



मला आणखी एकदां तुमचे मनांत ठसवावेसें वाटतें कीं, आनंदाचे राज्याची उत्कट आवड धरणें अत्यंत महत्त्वाचें आहे. तुम्ही त्या राज्याचे नागरिक झालां कीं नाहीं हें कोणालाही, तुमचे भाषणाचे रीतींत, तुमचे शब्दांत दिसून येतें. तुम्ही आम्ही सतत त्या राज्यांत रहात आहोंत कीं नाहीं हे पहाण्यासाठीं मी पाळत ठेवीत असतों. आपली वृत्ति, आपलें आचरण, आपल्या अंतरंगीं उसळणाऱ्या वासना ह्यांवरून, आपण राज्यांत आहों कीं बाहेर भटकतों आहों, किती आंत आहों वा किती बाहेर गेलों आहों, हें आपणास सहज समजतें.

तुम्ही जर त्या राज्यांत बसति करण्याचा कसून प्रयत्न चालवीत असाल, तर स्वतःचे विशिष्ट गुण, व दुःखकष्ट विसरून जाल, आणि जगाचे दुःखकष्टाचा भार माथीं घ्याल. त्या राज्यांत घर केलें म्हणजे नित्य व्यवहाराविषयीं निष्काळजी राहून चालत नाहीं; तुमचे आचारविचारावर, लहानथोर जें कांहीं कराल त्यावर, त्या राज्याचा शिक्का मारावा लागतो, व अशारीतीनें तें राज्य तुमच्या कृतींत प्रतिबिंबित होतें.

तुम्ही लक्षांत घ्या की, ज्याना त्या राज्याचें ओझरतें दर्शन झालें आहे, तेसुद्धां कसे वेगळे दिसतात—अति भावना नाहीं, अति तर्कबुद्धि नाहीं, सदा समतोल व आनंदी वृत्ति ! त्याची वृत्ति, व त्यांचे आसमंतात असणारे सर्व वातावरण आपणास सांगते, की त्या राज्यांत वास करणे म्हणजे काय ते ह्या भाग्यवंताने जाणले. परंतु आपली अशी वृत्ति जर केवळ एकांतात किंवा ध्यानाचे वेळेपुरती कधीमधींच बनत असली, तर ती केवढी खेदाची गोष्ट ! त्या राज्यांत बसति केल्याची खूण हीच कीं, मनुष्याचें तनमन त्या सुखानें स्फुरत राहिलें पाहिजे, आणि त्या सुखाची तृप्ति तुमच्या सर्व भावनांत, नित्याच्या कामकाजांत, प्रकट झाली पाहिजे. घटकाभर सुंदर फुलपाखरूं होऊन उडतो, आणि मग सर्व दिवसभर खाजरा सुरवंट होऊन पडून रहातो,

तो पुनः दुसरे दिवशीं त्या वेळीं फुलपाखरूं होणार! असें उपयोगी नाहीं. सध्यां तुमचें बहुतेकांचे असे होत आहे. खरोखरी तुमची दृष्टि कशी आहे ते, सगळे तुमचें अंतरंग, तुमच्या एका शब्दानेही उघडें पडतें. फुकाची धडपड व खंडीभर श्रम व्यर्थ न करतां, तुम्ही खरे गंभीर आनंदमय व्हावे, याचें मला अतिशय अगत्य वाटतें. तुम्ही असा भ्रम धरूं नका, की कांहीं कृपेतलीं माणसे मात्र त्या राज्यात घ्यायचीं आहेत, व बाकीचीं बाहेरच रहाणार. तुम्ही हा विश्वास धरा की, ज्या कोणाचे विचार व भावना उन्नत आहेत, आणि जो उत्कंठेनें झटत आहे तो तो त्या राज्यांत रहात आहेच.

प्रथम हा आपला एरंडे येथील आश्रम, नंतर सर्व जग यांचें आपण आनंदाचें साम्राज्य बनविलें पाहिजे. तुम्ही येथें रहात आहां, तेव्हा तुम्ही आपल्या गुणांनीं, बुद्धीने, कार्यकौशल्याने, हर्षखेदाने, सुखदुःखाने, सर्वभावाने सहाय्य केले पाहिजे; आणि या कार्यास मालमसाला पुरवला पाहिजे. आणि हे एकट्या दुकट्यानें करतां कामा नये, सगळ्यांनीं मिळून सहाय्य केले पाहिजे. त्याचसाठीं तुम्ही थोर झालें पाहिजे, व सतत त्या राज्यांत राहून तेथील वायूच सेविला पाहिजे. वृत्ति संकुचित करणारीं डोळ्यांवरचीं ढाकणें आणि मनाचे बांध सर्व फोडून टाकले पाहिजेत. हें काम मनाला किती गुदगुल्या करणारें, किती स्फूर्तिदायक आहे तुम्हांला माहीत नाहीं. त्या आनंदापुढे कसलाही सिनेमा किंवा जगातला कसलाही खेळ केवळ तुच्छ आहे.

क्षणभर कल्पना करा, कीं आपण सर्वजण देव आहों; मग आपणास जगद्‌गुरूंच्या सभोंवतीं मंडळ करून बसतां येईल. समजा, भगवान् बुद्ध व त्यांचे शिष्य यांसारखे आपण आहो. मग आपले मनांत कोणते विचार येतील, केवढी महाकार्याची स्फूर्ति येईल. भगवान् बुद्ध हे सिद्धांतले सिद्ध, सर्व मानवांत श्रेष्ठ होते, आणि त्यांचे शिष्य सर्व त्या काळचे थोर प्रतिभावत पुरुष होते. कल्पना करा, त्या नररत्नांनीं अथवा नरदेवांनी भूमीवर कशी दिव्य परिस्थिति, कसें अद्भुत वातावरण निर्माण केले असेल! हें एका कोटीचें चित्र झालें. आतां दुसऱ्या कोटीचें म्हणजे जगांतील अधर्मावतारांचें, त्यांचे पापीगण व पापमय चरित्र, यांचेंहि चित्र डोळ्यांपुढें आणा. ते अर्थात् देवांचे सुकृत उच्छेदून जगाच्या संहाराचे राक्षसी यत्न

करीत असणार. हीं दोन टोकें झालीं; पण ह्या दोहोंच्या मध्यंतरींच कोठे तरी आपल्यासारखा जगांतील बहुजनसमाज असतो. आपल्याजवळ एखादें मूल्यवान सुवर्णपात्र किंवा रत्न असले, तर ते सुरक्षित ठेवण्यासाठ आपण तिजोरीची पेटी पहातो. मग जगद्गुरु जेव्हा आपल्या मंडळीमध् येतील—आणि ते खरोखरी येत असतात—आणि जेव्हां आम्हामध्यें येऊन रहातील—आणि निःसंशय ते येऊन रहातात, तेव्हां त्या मूल्यवान रत्नाला सांभाळण्याजोगीं थोर माणसे आम्ही बनायला पाहिजे, व ती परमसिद्ध मिळविण्यासाठीं भगीरथ प्रयत्न केले पाहिजेत; मग आपल्य मंडळींचें संमेलन भरले म्हणजे केवढा आनंदोत्सव होईल ! ज्यांचा स्वभा धीरोदात्त, ज्यांची प्रतिभा दिव्य, व तिला साजेशी समतोल, अव्यंग, उत्त ज्यांचीं शरीरें, अशा थोर कलाकुशलांच्या, थोर नवसृष्टिकर्त्यांच्या समागमां आपण असूं. ज्यांचे विचार थोर आहेत, निर्जीव कवचासारखे नसून जे स्वत मूर्तिमंत उदात्त तत्त्वेच होत, अशाचा सहवास लाभणें, याहून अधिक अद्भुत जगांत कांहींएक नाहीं.

पण ज्याने सुख चाखले नाहीं, दुःख सोसलें नाहीं, अनेक अनुभव घेतलेले नाहींत, अशा मनुष्याला थोरांची संगती लाधली तरी, त्यांच्या (किंबहुना थो पाप्यांच्याहि) समागमाचें रहस्य आकलन करतां येणार नाहीं. अशा प्राण्याल दुसऱ्या कोणास सहाय्य करतां येणार नाहीं. कधीं स्वतःला अक्षय सुख उप भोगता येणार नाहीं; मग ते दुसऱ्यास देण्याची गोष्ट कशाला ? अश व्यक्तीला सौंदर्य व सुसंस्कार आणि अशिष्टपणा यांमधील अंतर समजणा नाहीं, व त्यामुळे त्याचे मतास कांहीं महत्त्व नाही. तो सृष्टिकर्ता नाह संहारकर्ताहि नाहीं. तो केवळ येरागबाळांच्या कळपांतला, प्राकृतजनांचे छंद व लहरी ह्यांच्या ओघाबरोबर वहावणारा प्राणी असतो.

तुम्हाला ह्या सामान्य गबाळ जगांत रहायचें नाही ना ? मग ध्यानां धरा कीं, तुमच्या प्रत्येक विचाराला व भावनेला महत्त्व आहे. तुम्हाल निर्दोष—उत्कृष्ट शरीर, सुसंस्कृत विचार, व समुन्नत भावना असे साहित्य सिद्ध केले पाहिजे. तुमचे देह, विचार, भावना, सर्व उत्कृष्ट नसतील, त तुमचेमुळे तो संतांचा महत्समागम किंवा तें महासंगीत विशोभित, बेसूर होईल. तुम्ही कदाचित् पंडितांचे 'प्रज्ञावाद'ही बोलाल, तथापि तुमचे

रंगरूप, तुमचा स्वभाव, चालचर्या हीं आंतील संस्कारहीनतेचें बिंग तेव्हांच बाहेर फोडतील.

तसेंच, तुमचें आरोग्य व स्वच्छता हींही परिपूर्ण, उत्कृष्ट असलीं पाहिजेत. ह्या गोष्टींचें काय महत्त्व आहे, हें दिसतेंच आहे, तुम्हीं त्यांची अत्यंत काळजी, जशी एखाद्या बहुमूल्य रत्नाची घ्याल तशी, कां घ्यावी हें तुमचें तुम्हालाही दिसण्यासारखें आहे. तोच न्याय तुमचे विचार–भावना यांसही लागू आहे. कुत्सित विचार, कुत्सित भावना, ह्या तुम्ही आपल्या मित्रांना, शेजाऱ्यांना उघडून न का दाखवाना, त्यांचा दुर्गंध तुमच्या दृष्टींत, तुमच्या वाणींत, तुमच्या एकंदर वृत्तींत तुमचा गौप्यस्फोट करणारच करणार! मला लोकांची मुखचर्या, बोलणेंचालणे इत्यादि गोष्टी न्याहाळून पहाण्याची संवय आहे, किंवा तसें पहाण्याचें अगत्य वाटतें; आणि तसें पहातांना बहुधा मनुष्य कोणत्या प्रतीचा आहे ते ओळखतें. मी जाणून आहे कीं बाह्य चिन्हे भ्रामकही असतात; त्यांवरून नेहमींच सत्यनिश्चय करतां येत नाहीं, तथापि बहुतकरून बहिरंग हे अतरंगाची प्रतिमा असते; म्हणून तुम्हीं आपलें शरीर, विचार–भावना, अत्यंत शुद्ध व उत्कृष्ट बनवा; तरच तुमचा त्या राज्यांत प्रवेश होईल व तुम्हांला तेथें सदैव बसति करतां येईल.

आणखी हें ध्यानांत धरा; कारण कळल्यावांचून कोणाचे ठोस हो देऊं नका, कोणाचे सांच्यांतली मूर्ति बनूं नका. जिवंतपणाच्या खळबळीनें भरलेला तो समुद्र पहा. तो कोणतीहि कठीण आकृति धरून बसूं शकेल अशी कल्पना तरी करवते का ? तो सर्व आकाराचा विध्वंसकर्ता, त्याला कोण धरून ठेवील ? कोण बांधील ? मग आम्हाला सांच्यांतली मूर्ति होणें कां आवडते ? तर ते फार सोपे, अनायासाचें, सुखाचे म्हणून. परंतु जे साकाराचे दास नाहींत, जे त्या स्वानंदांत, अमर्याद सुखराज्यांत रहाणारे, त्यांना एकच एक महत्त्वाची व सुंदर वस्तु म्हटली तर तें एक अपार अनंत होय. हे उमजाल तरच महात्म्यांच्या सहवासाची चव समजूं शकेल. तुमचें दृष्टिक्षेत्र असें बनलें पाहिजे कीं त्याला कुंपण किंवा मर्यादा घालणें शक्य नाहीं. ‘मी स्वानंदाच्या राज्यांत, थोरांच्या संगतींत रहात आहें’ अशी भावना अखंड धरतां येईल, तर मग तुमचे तुम्हाला समजेल कीं तिच्या योगानें कशी स्वमुखाची मस्ती, स्वानंदाचा (पण समतोल) उन्माद

कसा अंगीं संचरतो! महाप्रतिभावान् मनुष्याचे, किंवा स्वानंदसाम्राज्याची मूर्ति जे सद्गुरू त्याचे संगतीं रहाण्याची योग्यता तुमचेपैकीं किती जणांच्या अंगीं आहे? खरोखर अशीं माणसे थोडीं, फारच थोडीं! मग तुम्हीच पहा, अशा विभूतीला किती दुःख, किती वेदना होत असतील! कां कीं, सर्व जगानें त्यांचे संगतीं रहावे, त्यांचे सहकार्य करावें, त्यांचें स्वसुख सेवावे, तें एकीकडेच राहून दोनतीनच सहचर मात्र त्यांना मिळणार.

तसेच प्रीतीविषयीं दोन शब्द सांगितले पाहिजेत. कारण खरी प्रीति, खरी समतोल प्रीति मनुष्याला केवढी शक्ति, कसलें सामर्थ्य देते, त्याची तुम्हास कल्पना नाहीं. 'समतोल' असे मी बुध्या म्हणतों. कां तर ज्यांच्या हृदयांत उत्कट, प्रचंड प्रीतीची भावना असते ते बहुधा असंयमी, बेतोल, दुर्बल असे असतात. ही भावना म्हणजे पाण्याचा सांठा आहे. त्यांतून पाटाला पाणी बिनमाप सोडले तर तें तीर उल्लंघून व्यर्थ जाते; त्याचा टिकाऊ सुपरिणाम तरी होत नाहीं. एवढ्यासाठी प्रीतीला तोल हवा, खरी समतोल प्रीति पाहिजे. हलक्या मनाच्या लिबलिबीत भावना, भळभळ वाहून संपणारा उमाळा उपयोगी नाहीं, तर ज्यांत भेदभाव हरपतो असे दिव्य, शाश्वत प्रेम, यालाच खरी प्रीति हें नांव आम्ही देतो. तुम्हांला प्रत्येकाला हिचा थोडा तरी अनुभव असेल. हृदयतळांत उगम होऊन ही जी वर उसळून येते, ती सारखी पसरत विस्तारत पुढे जाते; थोड्याच वेळांत थोड्या मोजक्या माणसांपुरते तिचे पात्र न रहातां आसपासचीं सर्व मनुष्यें ती आपले पोटांत घेते. अशी प्रीति, सर्व दुःखांचें मूळ जी अहंभावना—भेदभावना, तिचा विसर पाडते किंवा लय करते. ज्यांचे हृदयांत ह्या अनंत प्रेमाचा उदय झाला नाहीं ते व्यक्तिगत गोष्टींत गुरफटतात; हलक्या कानांची बडबड, टीका, कुटाळक्या, भोंवडेपणा, इत्यादि अनेक क्षुद्र कामें, जीं खरे थोर पुरुष, खरे भूदेव स्वप्नांतहि कदापि करणार नाहींत, त्यांत त्यांचा जन्म जातो. एकेकट्या मनुष्याच्या हृदयांत असणारा व्यक्ति-आत्मा विसरून, ज्या क्षणीं तुम्ही जगदात्म्याशीं एकरूप व्हाल त्या क्षणींच त्या राज्यांत तुमचा प्रवेश होईल आणि मग जगाला तेथें घेऊन जाण्याची तुम्हाला इच्छा होईल.

आजच्या घटकेला तुम्हां प्रत्येकाविषयीं असे म्हणतां येईल कीं, तुम्ही कार्यसिद्धी केलेली नाहीं, तर अद्यापि छोट्या प्रयत्नांत अडकून बसलां आहां.

तुमची तडफड, धडपड चालू आहे, परंतु पल्ला गांठलेला नाहीं. अद्याप तुम्हाला संकटाचें भय वाटतें, साहस होत नाहीं, महासागरांत उडी घेववत नाही, समुद्राच्या कांठाशीं उभ्या राहिलेल्या लहान मुलासारखी तुमची स्थिति आहे. ते कसें भीत भीत, हळूच पाय पाण्यांत सोडतें, पण समुद्राच्या गार पाण्याचा थंड स्पर्श जाणतांच झटकन् पाय मागे ओढते. तसे तुमचे होतें. पण तुम्ही घसरलां, पडलां, तरी चिंता नाहीं. 'उडी टाकूं कीं नको ?' अशा संशयांत सारा दिवस घालवूं नका. त्या वाणीची आज्ञा सुटतांच, अंकुश लागतांच, मारा लाटांत उडी, आणि निश्चित समजा कीं तुम्ही परतीर गांठणार. ती वाणी ऐकूं आली नाहीं, तो अंकुश अंगाला लागला नाहीं, तर ( अलंकारिक भाषेने ) सर्व दिवसभर तुम्हांस कष्टी वाटलें पाहिजे; क्षणभरही शांति, सुख, स्वस्थपणा वाटतां कामा नये. त्या आदिकारणाकडे, जगाच्या मूळ उगमाकडे एकसारखे चालत राहिले पाहिजे. एकदां तेथें पोहोचलांत, म्हणजे तुम्हीच सिद्ध, तुम्हीच परमहंस, तुम्हीच देव व्हाल.

श्री बुद्ध, श्री ख्राईस्ट इत्यादि सर्व महान् गुरु त्या मूळ उगमालाच जाऊन पोंचले आहेत. ते कलाकुशल लोकांमधले परमकलाकुशल झाले आहेत. त्यांनीं त्या जगत्कारणाचें माहात्म्य जाणलें, आणि स्वतःच तें आदिकारण, ती परमपदवी, तें ज्ञान-प्रेमस्वरूप झाले. तोच हेतु आपण धरला पाहिजे. आपणा सर्वांना बुद्ध वा ख्राईस्ट होतां येणार नाहीं. परंतु तशी वासना, आकांक्षा, मनोरथ, कामना प्रत्येकाला धरतां येईल. त्यांच्या राज्याच्या दिव्य ऐश्वर्याचें एकदां स्वतः दर्शन घ्या, म्हणजे मग, त्या अक्षय सौंदर्याची आपापली विशिष्ट प्रतिमा भूलोकीं कशी प्रत्येकानें निर्माण करावी तें तुमचे परिस्थित्यनुरूप तुम्हांस ठरवितां येईल. मग तुम्ही उत्कृष्ट लेखक, उत्कृष्ट कलावंत, उत्कृष्ट विज्ञानशास्त्रज्ञ व्हाल. मग तुमच्या जिव्हेवर सुज्ञांची सरस्वती बसेल. आध्यात्मवृत्तीची आनंदोर्मि यांतच, सुख तें यांतच आहे. अवघ्या जगांत धरण्यास योग्य अशी महत्त्वाकांक्षा तेवढीच एक. तुम्ही केवळ स्वतंत्र, अगदीं बंधनरहित, नुसते विचार-भावनांचे बंधनापासूनच नव्हे तर, स्थूल गोष्टींच्या बंधनापासूनही मुक्त झाले पाहिजे. अशा रीतीनें मनाची, भावनेची, शरीराची पूर्ण स्वाधीनता मिळविणे हाच परमानंदप्राप्तीचा उपाय होय. सुखाचे साम्राज्यांत घर करण्याचेंही साधन हेंच.

---

[ ८ ]

# सृष्टिकार-मन*



मन हा ईश्वराचा सत्त्वांश आहे. अर्थात् मनांत सृष्टी करण्याची आणि संहार करण्याची, अशा दोन्ही शक्ति आहेत. भावना–उर्मी, ही वाफ आहे; ती आपल्यास ध्येयाकडे रेटीत नेते पण तिला विवेकसूत्रांत धरून योग्य मार्गानें नेणे, हे मनाचें काम. आपलें आपण सत्य शोधून काढण्याची शक्ति त्या मनाचे अंगीं आहे; आणि तें त्यानें शोधून काढलें पाहिजे. तसेच स्वानंदसाम्राज्यांत म्हणजे आपले ठायींच स्वसुखांत रहायलाही त्याला शिकले पाहिजे. मनाला जात्याच अक्कल असल्याविना व त्या मनाला चांगले शिक्षण मिळाले असल्याविना तुम्हास तुमच्या ध्येयाच्या संनिध जातां येणार नाहीं. मनाचा आणखी एक गुण ध्यानांत घ्या. व्यापक गोष्टीला संकुचित तेंच करते. आकाराचे किंवा मूर्तींचे सांचे बनवावे, आणि मग ते भरून काढावे ही त्याची खोड किंवा स्वाभाविक हव्यास. साकार, सगुण याची अनिवार ओढ मनालाच. त्या प्रवृत्तीचा दुरुपयोग न होऊं देण्याची दक्षता, सावधानता तुम्ही ठेवली पाहिजे.

आपल्याला बहुधा असें वाटत असतें कीं मी करतो तेवढेच खरे; माझा पंथ तोच एक खरा पंथ; माझे देऊळ, माझे यज्ञकुंड, माझें मंत्रतंत्र, विधिविधान, किंवा कल्पितमूर्ति इ० एवढेच एक काय तें खरें ! ईश्वर बाहेर प्रकट होत असतो तो एक माझ्याच मार्गानें. आपल्या बोलण्या-वागण्याचा एकंदरींत भावार्थ असा असतो—‘ हें पहा, तुमचें सगळें खोटे किंवा चुकीचें आहे. मी करतों तसें करा, माझेमागें या, माझ्यासारखीं मते बनवा, म्हणजे तुमचें बोलणें–करणें सगळें खरें, बरोबर होईल.’ तुम्हा सर्वांचे मनांत हे असले विचार आहेत. पण ज्याला त्या राज्यांत प्रवेश कर्तव्य आहे

* मनो हि जगतां कर्तृ...मनःकृतं कृतं सर्वम् ( वासिष्ट ).

—भाषांतरकार.

त्याला ही वाटेंतली मोठीच धोंड आहे. कारण येथे असल्या संकुचित वृत्तीच्या एकरूपतेचें काम नाहीं; येथे जे जे कोणी परिश्रमानें उदारचरित्र आचरीत आहेत, ज्यांचे विचार व भावना किंवा समस्त स्वभाव खरोखरी उदार, सुंदर आहे, अशा सर्वांचें ऐक्य, एकभाव होऊं शकतो—नव्हे स्वयमेव असतो. ह्या एका भावाची ओळखच जगांत अत्यंत महत्त्वाची वस्तु आहे. तृषार्तांना देण्यास योग्य हेंच एक जीवन आहे. जगाच्या सर्व कूट—कोड्यांची गुरुकिल्ली हीच एक होय. 'काय ? तुम्ही स्वतंत्र मार्गानें जातां ? केवढी चूक !' 'तुम्ही माझी प्रतिभा, माझा गुरु, माझा इष्ट देव यांना भजणार नाहीं, तर फसाल,' असें स्पष्ट किंवा अस्पष्ट म्हणणारी असहिष्णुता खऱ्या आत्मोन्नतीला घातक आहे. वस्तुतः जेथे कोठें सदुत्साह आहे, दिव्य असंतोषाचा स्फुलिंग आहे, स्वसुखाची तृष्णा आहे, मायाजालांतून सुट-ण्याची आतुरता आहे, तेथें तेथें तुमचा धर्म-पंथ—वर्ण, जात अमुक आहे किंवा कोणतीच नाहीं याचें कांहीं एक महत्त्व नाही. कारण असला मनुष्य स्वानंदसाम्राज्याची सरळ वाट चालतच आहे. हा एक सिद्धांत तुम्ही अहर्निश ध्यानांत धरा.

तुमचें आचरण उदात्त असेल तरच तुमचा ह्या राज्यांत प्रवेश होईल; आणि संकुचित वृत्ति व दुसऱ्यास बाहेर ठेवण्याची भावना यांशीं झगडत रहाल तरच तुम्ही येथचे नागरिक व्हाल. एवढ्यासाठीं तुमचें मन निर्मल, स्वच्छ व सर्व—संग्राहक बनलें पाहिजे. असें असेल तर तुमच्या भावना तितक्या आनंदाच्या व उदात्त असतील. परंतु 'ह्या सगळ्यांना बाहेर घालवा, हे आमच्यांतले नाहींत, असे म्हणणारें क्षुद्र जर तुमचें मन असेल, —हा एक हीन देहाभिमानाचा, दर्पाचाच प्रकार आहे—तर तुमचा ह्या राज्यांत कदापि प्रवेश होणार नाहीं.

कोणी एक मनुष्य बिचारा दुःख भोगीत आहे, संकटांत पडला आहे, जिवाला समाधान नाहीं, तडफडत आहे, असे जर तुम्हाला कळलें, तर त्यास बिचाऱ्याला छाया किंवा समाधान देण्यासारखें तुमचेजवळ काय आहे ? तर शाश्वत शोधनाची जी शांति तुम्ही अनुभवली आहे, जें स्वसुख चाखलें आहे, तेंच देण्यासारखें होय. अहा, हें स्वसुख उचलून तुम्हास देतां येईल तर किती उत्तम होईल ! मग तुम्ही इतरांना हीच सद्वस्तु, हेंच परब्रह्म अशी

प्रचीति देऊं शकाल. ‘ ह्या स्वानंदसाम्राज्यांत कधीं तुम्हाला घेऊन जाईन ’ असें मला झालें आहे. कां कीं तुम्ही त्यांत जाऊन वसति केलीत म्हणजे मात्र तुम्ही बुभुक्षितांचें अन्नसंतर्पण करूं शकाल, दुःखितांना सुखवूं शकाल, आणि मर्महत हृदयांना अमृतसंजीवन देऊं शकाल.

तेथें गेल्यावर तुम्ही आपले आपणच सद्गुरु शोधून काढले पाहिजेत, आपला जीवनहेतू आपणच निर्मिला पाहिजे, आणि आपलीच आत्मवाणी ऐकली पाहिजे. हीच एक सुयोग्य महत्त्वाकांक्षा धरा. मग यथेष्ट जगांत वावरा, आणि आतां तुमचें पात्र अक्षय संपत्तीनें परिपूर्ण भरलें आहे, सुविचार-भावनांचें भांडार चिरसमृद्ध झालें आहे, त्यांतून मुक्तहस्त दान करीत चला; यत्किंचित कांकूं करूं नका; एक कपर्दिक मागें राखूं नका. तुमच्या आत्मविकासाबरोबरच हें श्रेष्ठ औदार्य वाढत गेले पाहिजे. परसुख साधनाविना स्वसुखाचें दुसरें साधन नाहीं, आणि परसुख त्या राज्यांत राहिल्याविण साधत नाहीं. त्या राज्यांत रहाल, त्या अकाल परमात्म्याची सूक्ष्मवाणी अंतःकरणी ऐकाल, तिची आज्ञा पाळाल, तर मात्र परसुखसाधन घडेल. हाच एक मार्ग आहे. जनाला हातीं धरून नेण्याचा, दुसऱ्यांना सुख देण्याचा, थोर होण्याच्या धडपडींत त्यांना हातभार लावण्याचा, त्यांची त्यांना आत्मदेवाची वाणी ऐकायला शिकविण्याचा, ह्या सगळ्यांचा मार्ग वर सांगितला तो एकच आहे, दुसरा नाहीं. आतां धडपड म्हटली म्हणजे क्लेश आलेच, पण हे सगळे क्लेश, सगळी तडफड सिद्धीच्या वाटेचे टप्पे होत, आणि सिद्धि म्हणजे स्वसुखाची प्राप्ति. खरी गिरिशिखरावरची हवा ती ही. हिच्या सेवनानें तुम्ही त्या अकाल मदानें मस्त होऊन जाल, आणि अगदी एकाकी ठाण मांडून उभें रहाण्याचें अपार सामर्थ्य तुमच्या अंगीं येईल.

डोंगरमाथ्यावरचें झाड अर्थात् सपाटीवरच्या झाडापेक्षां बळकट असलेंच पाहिजे; कारण सगळीकडच्या वारे वावटळींना टक्कर देऊन त्याला टिकायचें असतें. त्याच कारणासाठीं त्याचें मूळही खोल व भक्कम असतें. तें नभोमंडळाला अधिक जवळ असल्यामुळे अधिक भव्य व उन्नत असलेंच पाहिजे. सूर्यनारायणाचें प्रथम दर्शन त्याला घडतें. तें तारकांच्या सन्निध रहातें. तुम्ही कैवल्यपदविहारी झालां म्हणजे तुमची स्थिति थेट तशी झाली पाहिजे. तुम्ही देवांसमीप रहाणार, तुमचीं मुळें खोल गेलींच पाहिजेत. तुम्ही सूर्याचे

किरण सेवन करणार, तेव्हां वाढीस लागल्याची व्यथाही अधिक भोगण्यास सादर बनलें पाहिजे. एकदां त्या उन्नतपदीं आसन स्थिर झालें म्हणजे, जे जे अनित्य, अशाश्वत, जें जे मायेचें कार्य, त्याची तुच्छता, असारता तुम्हाला पटलीच पाहिजे. असला महावृक्ष, कीं जो निरंतर गिरीवरचा निर्मल वायु सेवीत आहे, दिवसेंदिवस अधिक बलिष्ठ बनत आहे, पर्वत ढळेल तेव्हांच तो ढळेल असा जो महावृक्ष, त्याच्या चिंतनाने माझ्या जिवांत जोर येतो.

जगद्गुरु येऊन ह्याच वृत्तीचें वारें आमच्या कानांत फुंकणार; त्यांची ओळख पटायला हेंच वारें अंगांत पाहिजे. हेंच काय तें खरें सुख; जिवा-भावाचा निश्चय करण्यास योग्य हीच एक वस्तु; श्री सद्गुरूंना हृदयसंपुटांत सांठविण्याचा हाच एक उपाय; त्यांना अनुसरण्याचा हाच एक मार्ग होय! आपण भेदभाव व परकेपणा काढून टाकला; आपण संप्रदाय-मतांचा संकुचितपणा सोडून दिला; आपण सत्याच्या झऱ्याचें पाणी प्यालों, तेथें राहून देवपदाला पोहोंचण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आलें; हें सर्व झालें म्हणजे जगाला तेथें नेऊन त्या शाश्वत सुखाचा स्वाद देण्याची इच्छा आपणांमध्यें बाणते. सुखांत असो, दुःखांत असो, सुज्ञ, विवेकी मनुष्याला हें हेंच एक सत्य स्वीकारणें शक्य आहे, आणि अपरिहार्यही आहे. तुम्हाला अपरोक्ष आत्मानुभव मात्र घडला पाहिजे, म्हणजे तुम्ही अक्षय टिकणाऱ्या अनंत वृक्षासारखे व्हाल-तो त्या राज्यांत मात्र उगवतो आणि जनाचा आश्रयदाता होत असतो. त्या उत्तुंग शिखरावर उड्डाण मारायचें म्हणजे तुम्हाला पंख फुटायला हवेत, प्रत्येक दिवशीं नवे पंख फुटायला हवेत; आणि ते, तुम्ही सदोदित भराऱ्या मारीत, वाढत, विस्तारत, झुंजत जाल, तरच फुटतील. ह्याचा अर्थ असा कीं प्रत्येक दिवशीं तुमच्यामध्यें रूपांतर होत गेलें पाहिजे. तुम्हाला स्वच्छंदविहारासाठीं पूर्ण स्वाधीनता पाहिजे. तुमच्या उड्डाणाला विघ्न-विघात, बाधाबंधन, अडीअडचणी करणाऱ्या एकन् एक गोष्टी व जगांतल्या मायेचे भास व पाश तुम्ही तोडले पाहिजेत. आत्मविकास, नवशक्ति, नवउल्लास यांची प्राप्ती व्हावी तर त्याला हाच एक उपाय. ते नवे पंख फुटले तरच शिखरावर उड्डाण साधेल. प्रेमाची मोहनी तुमचेवर नेहमी पडत राहिली पाहिजे. प्रत्येक जीव, प्रत्येक स्थिर व चर वस्तु यांचे दर्शनानें तुम्हाला प्रेमपान्हा फुटला पाहिजे. कारण प्रत्येक

मनुष्यानें त्या राज्यांत येऊन रहावें ही तुमची इच्छा; किंबहुना भोंवतालच्या प्रत्येक वस्तूला तेथें न्यावे अशी तुमची मनकामना. ह्या राज्याचा अशा रीतीने विस्तार करण्याचें सामर्थ्य तुम्हा प्रत्येकाचे अंगीं आलें म्हणजे झालें; मग बाह्य संस्कार-विधींना स्वतःचे कांहींच मूल्य नाहीं; तुम्ही लोकांना त्या राज्यांत आणलें, हेंच तुमच्या योग्यतेचें माप. एवढ्यासाठीं तर माझी इतकी तळमळ कीं, मला जें हें सुखनिधान लाधलें आहे, त्याचा कांहीं अंश किंवा तें सर्वही तुम्हाला द्यावे. एकदां मी हा रस चाखला, आतां हा पुनः केव्हांही चाखतां येईल. एकदां मी ह्या सुखाचा अनुभव घेतला, आतां हें नेहमीचे माझे झालें. परंतु ज्याने त्याचा स्वाद घेतला नाहीं, त्याला त्याच्या धवधवीतपणाची, माधुर्याची कल्पना नाहीं, त्याला जीविताच्या संपूर्णतेचा व ऐश्वर्याचा अनुभव कसा यावा ? पण एकदां का त्या मधाचा चटका लागला कीं मग अशाश्वत वस्तूत जीव गुंतणार नाहीं. म्हणून तर माझा एवढा हेतु कीं मी सेवितों तो रस तुम्हांस वांटावा आणि तुम्हाला निजजीवनाचा आयु, निजसुख द्यावे; तुम्हाला माझ्या त्या राज्यांत रहायला न्यावे.

हा हेतु सिद्धीस जाण्यास तुम्ही झोपेंतून जागे झाले पाहिजे, आपल्या हृदयमंदिराचीं सर्व दारें खिडक्या उघडल्या पाहिजेत, आणि त्या एक सद्वस्तूचे शोधार्थ बाहेर पडलें पाहिजे. आजारी माणसासारखी अस्वाभाविक व्यर्थ तडफड करीत तींतच बुडून जाऊं नका अथवा अंधारी बोळा–दालनांत आयुष्य घालवूं नका. सुप्रकाशाचीं स्थानें, सत्याचीं सदनें आणि स्वसुखाचें साम्राज्य हीं शोधून काढा, आणि प्रत्येकजण तेथें स्थायिक, निवासी व्हा.

त्या प्रचंड हर्षसमाधींत, त्या उदंड उल्लासांत, देहाहंकार बिरबा–तोच एक तुमचे गळ्यांत धोंडा आहे–म्हणजे मग तो 'शुचिप्रतिभेचा झरा' मिळेल, ते कमनीय सौंदर्य हस्तगत होईल, आणि हृदयी धरण्यास जे एकच योग्य, स्वाधीन करण्यास जें एकच योग्य, ज्याच्या प्राप्तीसाठीं सर्वस्वाचा स्वाहाकार करणेंही योग्य, तें एक सत्य उपलब्ध होईल. ती 'महत्त्वाकांक्षा' धराच, (मला महत्त्वाकांक्षा या शब्दापेक्षां दुसरा चांगला शब्द सुचत नाहीं.) त्या राज्यांत प्रवेश करण्याची उत्कट इच्छा धरा. मग तुम्ही कोणतेंही कार्य करा, त्यावर त्या अकाल परब्रह्माची मुद्रा उठणारच; आणि तुम्ही कोठेंही असा, तुम्ही त्या राज्याचे ध्वजधारीच होणार !

---

[ ९ ]

# जगांतील मंदिर

तुम्ही हें स्पष्ट समजून घ्या कीं आपल्या हृदयांत सत्याच्या प्रचीतीचा निश्चय करावयाचा हेच आपले सर्वांचे साध्य आहे—असा निश्चय ढळत नाहीं, त्याविषयीं शंका येत नाहीं. हें सत्य कोणी तुमचे डोक्यावर बांधून देऊं शकत नाहीं. त्याचा तुमचा तुम्ही आपले अंतरंगीं अनुभव घेतला पाहिजे; आणि तो अनुभव, तुम्ही ती अंतर्वाणी जागृत केली आणि तिची आज्ञा ऐकत गेलां तरच येईल. जें सत्य तुम्ही स्वतः पाहिलें, जें तुमचे जिवाला पटलें, त्यापासूनच तुमचे सर्व विचार, सर्व कल्पना, सर्व क्रिया यांचा उगम झाला पाहिजे. असें सत्य वांटतां येत नाहीं किंवा तें एकानें उचलून दुसऱ्याला देणें शक्य नाहीं. प्रत्येक सिद्ध पुरुषाने ही गोष्ट अगदीं निक्षून सांगितली आहे कीं, सत्याचे दर्शन ज्याचें त्यानेंच घेतलें पाहिजे, आणि त्यानंतर तदनुसार वर्तन केलें पाहिजे. त्यायोगानें तुम्ही सत्याचे उपदेशक, अक्षय सुखाचे वाटेवर खुणेचे खांब बनाल, इतकेच नव्हे तर, सत्याची केवळ मूर्ति बनाल.

हा सिद्धांत उमजण्याला त्याच्या आज्ञेप्रमाणें आचरण करूं लागा; त्याला अनुरूप अशाच वासना मनांत धरा. फूल कसें वर येते, कसें स्वभावसुंदर-रीतीनें उमलतें ! तद्वत् तुमच्या सहज परिस्थितींत थोर बनण्याची प्रेरणा तुम्हास आंतून मिळूं द्या. कळी असतांनाच आंत आपली इतिकर्तव्यता फूल जाणत असते कीं मी एके दिवशीं सूर्यप्रकाश पहाणार, आणि जगाला सुगंध देणार. तसे तुम्ही प्रत्येकजण स्वतःची वाढ करीत असतांना, हृदय-कलिका उमलतांक्षणींच प्रकट होणारें जें ते सत्य व भर्ग (तेज), त्याचे ध्यान-मनन करीत जा.

तुम्ही जर ती वाणी स्वतः ऐकाल, तर मात्र तुम्हास तो सूर्यप्रकाश, ती प्राणशक्ति, तो उल्लास, प्राप्त होईल. दुसऱ्याचें मत प्रमाण मानून किंवा पूर्व-

पीठिका आंधळेपणानें घेऊन चालणार नाहीं. तें सर्व एकीकडे सारलें पाहिजे. अथवा दुसऱ्या शब्दांनीं सांगायचें तर, तुमचे तुम्ही स्वतः शास्त्रकार बनले पाहिजे: तुम्ही स्वतःच्या मताप्रमाणें, अंतःप्रेरणेप्रमाणे वागायला पाहिजे. कारण ती प्रेरणा, तुमच्या ह्या जन्मींच्या व पूर्वजन्मींच्या अनुभवाचें फल होय. अखिल विश्वांत नियम एकच, निर्वाण एकच, सुखाचे साम्राज्य, आणि सद्वस्तु एकच आहे! आणि त्याचें पक्कें ज्ञान झालें म्हणजे आचरण आपोआप तदनुसार घडेल. तुमचा आत्मविकास जितका अधिक होत जाईल, जितका विवेक वाढेल, जितका दुःखाचा संस्कार अधिक होईल तितके तुम्ही त्या तत्त्वाच्या, त्या ऐक्याच्या, त्या सद्वस्तूच्या अधिक सन्निध पोहोंचाल. ती वाणी स्वतः ऐकेपर्यंत, ते सत्य स्वतः स्वाधीन करून घेईपर्यंत मात्र शंका-संशयाचे काहूर मनांत माजणार, तें अपरिहार्य आहे.

ते सत्य जाणण्याचा यत्न करीत असतांना आपण सुज्ञाची सदसद्विवेक-बुद्धि धरली पाहिजे, मूर्खांची धरतां कामा नये. सुज्ञाची बुद्धि जीवनाचे उत्तम अंगाचे दर्शनानें प्रकाशित झालेली असते; आणि मूर्खांच्या कल्पना अर्थात् मूर्ख, अधम असतात. अशा अधम, क्षुद्र कल्पनांच्या तडाक्यांतून सुटायचें असेल तर तुम्ही सत्य म्हणजे काय, सुखाचे साम्राज्य म्हणजे काय, तो नियम म्हणजे काय, ते संपूर्णपणें समजून घेतलें पाहिजे.

आकाशांतून पर्जन्य पडतो, आणि सर्व वृक्षवनस्पतींना, पत्रपुष्पांना, अभेदभावानें पुष्टि देतो. तसें तें तत्त्व चराचरांत अभेदभावानें वसतें. कुंभाराचे तेच हात, एकाच मातीला निरनिराळे आकार देऊन उपयोगाचीं व शोभेचीं निरनिराळीं पात्रे बनवितात; कांहींत आपण फुलें, तांदूळ, दहीं असे पदार्थ ठेवतो, दुसरीं कांहीं घाणीच्या कामीं लावतों. तथापि त्या सर्वांना बनवणारे हात तेच, माती तीच आणि ज्याच्या गरगर फिरण्यानें तीं उत्पन्न होतात तें चाकही सर्वांना एकच असतें. तद्वत् आपण सर्व-जण तत्त्वतः एक आहों, केवळ ह्या साकार जगांत भिन्न भिन्न बनलों आहों. त्या आकाराप्रमाणें आपल्या समजुतींत सत्यज्ञानांत भेद पडतो. तुमचे सुखाचे व दुःखाचे अनुभव जितके अधिक झाले असतील, तितके तुमचे अंतःकरण अधिक मोठें असणार आणि तुमचें स्थानही त्या तत्त्वाच्या अधिक ज़वळ असणार. एवढा काय तो एक नियम, एवढीच लक्ष्यांत धरावयाची

खूण; आणि तिच्या रोखानें तुम्ही त्या राज्याची वाट चाला. बाह्यात्कारी भिन्न भिन्न नामरूपांच्या समस्त वस्तूंमध्ये एक ते तत्त्व भरलेलें ओळखा आणि त्या ज्ञानाच्या प्रकाशांत जीवनमार्ग आक्रमण करा. अक्षयसुखाचे गांवीं जाण्याला तोच एक मार्ग आहे.

हें तत्त्व उमजायला काल तर लागतोच; पण तें समजायलाही इच्छाशक्तीला शिक्षण द्यावे लागते, आणि मनाला कामाला जुंपावें लागते. कारण मार्ग-दर्शक मनच होय. तें तुम्हाला सन्मार्गानें नेऊं शकेल, नाहीं तर कुमार्गानें नेऊं शकेल. देहाभिमान, दुराग्रह, भेदभाव वाढविणाऱ्या सर्व क्षुद्र गोष्टी—हे खड्डे, कांटेकुटे चुकविणें किंवा 'मी आपला वेगळा' ह्या भेदभावाच्या खड्डयांतील गाळांत, चिखलांत रुतवून ठेवणें, हीं दोन्ही मनाचे हातीं आहेत. तुमचें मन विवेकक्षम बनलेलें असेल, अनेक अनुभव व स्वार्थत्याग यांनीं सत्य असत्य, शाश्वत अशाश्वत, यांमध्ये विवेक करण्यास शिकलें असेल तर तें तुम्हाला त्या नियमाची मर्यादा पाळून त्या एकाकी मार्गानें सुखरूप घेऊन जाईल. मग तुम्ही त्या एका सुखासाठीं इतर सर्व वस्तूंचा त्याग करूं शकाल; आणि व्यर्थ प्रयोग करणेही सोडून द्याल. तुम्ही आत्मसमर्पण करण्यास शिकलें पाहिजे. आपल्या आवडी, आपले पूर्व-ग्रह, आपल्या संकुचित—स्वार्थी ममता इत्यादि सर्व संसारबंध तोडले पाहिजेत आणि मग त्या सुखाचे वाटेवर तुम्ही पाऊल ठेवले पाहिजे.

आतां तुम्ही तो मार्ग धरणार, तर माझे भरंवशावर बसून किंवा मी कोणत्या तरी संस्थेची चिठ्ठी तुम्हाला लावतो म्हणून धरूं नका. दुसऱ्या कोणाचेही हाताला हात लावूं नका. तुमची स्वतःची इच्छा आहे म्हणून, तें सत्य शोधून काढून प्राप्त करून घेण्याची तुम्हाला स्वतःची उत्कट आकांक्षा लागली आहे म्हणून, धराल तरच हा मार्ग धरा. पुष्पाचे विकासासारखा तुमचा विकास व्हावा. फूल कसें सहजसुंदर रीतीनें फुलतें. कां ? तर खुलावें, स्वानंदानें डुलावें हा त्याचा स्वभावच ! तुम्ही इच्छाशक्तीचा, निर्धार-शक्तीचा विनियोग कराल तर ते सत्य सांपडेल. आधी निर्धारशक्तीला शिक्षण द्या; दक्षपणें लक्ष्य ठेवून तिला विनय* लावा, चांगलें खाद्य देऊन

* विनय हा शब्द येथें शिक्षण, सुसंस्कार या अर्थानें योजलेला आहे. 'प्रजानाम् विनयाधानात्' ही रघुवंशांतील शब्दयोजना ध्यानांत आणावी.

पुष्ट करा. तुमची निर्धारशक्ति अशी सिद्ध व सज्ज बनेपर्यंत तुमचे उद्योग केवळ ज्वरचेष्टेसमान होतील, तुम्हाला जय येणार नाहीं, तुम्ही कृतकार्य होणार नाहीं, वाटेंत विघ्न निवारण न होतां तुम्ही नव्या विघ्नराशी करून ठेवाल; गिरिशिखर गांठून जयजयकार करणें दूरच, दरींत हांका मात्र मारीत बसाल.

जगांत आलेल्या प्रत्येक प्राण्याला हें ओळखावेंच लागतें कीं, जीवनांत एकच नियम, एकच उद्देश, एकच सत्य, आणि एकच सुखस्वराज्य आहे. तें कोणतें? तर, सर्वांभूतीं एकतत्त्व ऐक्य पहाणें. या नियमास धरून बर्तन असेल तर त्या सुखसाम्राज्यांत जातां येतें. ह्या विचारानें मला तरी विलक्षण स्फुरण व सामर्थ्य येतें. असें वाटतें, कोणत्याही अरिष्टाची कांहीं एक चिंता नाहीं. त्यानें जिवाला नितांत निःसंदेह निष्ठा प्राप्त होते; तीपासून अंतःकरणांत नितांत शांति नांदते. ती शांति कशानेंही ढळत नाहीं, कोणी ती हिरावूं शकत नाहीं, चालत्या घडीच्या दुःख क्लेशांनीं तिला क्षोभ होत नाही, कोणा व्यक्तीची प्रीति किंवा जनतेची भक्ती अंतरली तरी ती अंतरत नाहीं. कारण तें केवळ माझें आत्मकुसुम, ती माझी स्वतःची सृष्टि, माझें—माझ्या जिवाचें निधान, तें जगास चोरून नेतां येणें शक्य नाही. एकदां ही शांति लाधली कीं शक्तिही हातीं आलीच; तुम्ही म्हणाल ते करूं शकाल. मग तुम्ही गिरिशिखरावर सदा राहूं शकाल; संगती जग असलें तरी वाहवा, कोणी नसलें तरी वाहवा. कारण अनेक सुखदुःखें, नाना अनुभव तुम्ही घेतलेले आहांत. ही शांति, ही शक्ती अंगीं मुरली म्हणजे तुम्हीच सद्रूप-सत्यरूपी बनलां; मग तुम्ही कोठेंही असा, तुमचा वास अखंड त्या स्वानंद साम्राज्यांत असावयाचा.

विद्युत्गृहांत जाऊन तुम्ही कधीं तेथलीं प्रचंड चक्रें आणि प्रचंड डायनॉमोचीं यंत्रे पाहिलीं आहेत का? एकंदरींत तीं शांत व स्तब्ध भासतात. तथापि तीं प्रचंड शक्ति निर्माण करीत असतात हे तुम्हाला माहीत आहे. शक्तीनें मुसमुसणाऱ्या त्या यंत्रासारखे तुम्ही व्हा, भव्य व प्रशांत बना. त्याला उपाय एकच—मायाजाल तोडा आणि त्या एक सच्चिद्वस्तूशीं, त्या ऐक्याशीं अद्वैतभाव साधा.

असें कराल तरच उद्दिष्टाकडे सदा नजर राहील. त्याविण सुख नाहीं, आणि स्वतःचा विकासही नाही. जीवनांत कांहीं ध्येय, कांहीं

रस पाहिजे. एवढेंसे घरकुल, त्यांत सतरा भिंती; असें आम्हां बहुतेकांचें जिणें! आम्ही मूळ प्रकाशाकडे जात आहो कीं कवडाशावरच तृप्त होऊन बसलों आहो, हाही विचार नाहीं. पण जीवनांत कांहीं ध्येय, कांहीं पुरुषार्थ साध्य असला म्हणजे तो निश्चय देतो, इच्छाशक्ति सिद्ध करतो आणि अभीष्टगति गांठून देतो. तुम्ही एकदां आपला आंतला पाठिराखा शोधून काढा, म्हणजे तुम्हाला कोणी अडवूं शकणार नाहीं, बाधा करूं शकणार नाहीं, एकीकडे सारूं शकणार नाहीं. आणि तुम्ही, ती आपली इष्टगति, यज्ञभूमि किंवा देवालय गांठलें म्हणजे तेथे दुसरे जोडीदार भक्त असोत, नसोत, तुमच्या भजनांत रस व रंग कांहीं 'और'च भरेल! तुमचें पूजेचे वैभव व उत्साह कांहीं अवर्णनीय होईल.

वरील शक्ति एकदां तुम्ही संपादन करा म्हणजे, जीवन-रहस्याचा बोध होण्याला त्यांच्याच इतक्या महत्त्वाच्या इतर शक्तीही तुमचेठायीं स्वभावसिद्ध प्रकट होतील. धीर ( शांति ) येईल; त्यानें मनाची प्रसन्नता प्राप्त होते. संयम व समवृत्ति, हा गुण येईल. सत्याविषयींची तुमच्या मनास पडलेली समजूत बाहेर प्रकट करतांना हा गुण आवश्यक आहे. तिसरी गोष्ट म्हणजे स्वतःचे स्वातंत्र्य राखून सर्वांशीं सहकारिता करण्याचें सामर्थ्य. आपणापुरता प्रत्येकजण शारीरिक, मानसिक, व भावनाविषयक बाबतींत स्वतंत्र असावा. तथापि आपण सर्व एकाच गांवाला जाणारे प्रवासी; आपला पंथ एक, नियम एक, आज्ञा देणारी वाणीही एक; तेव्हां ह्या जाणिवेने नेहमीं आपण सहकार्यास तत्पर असावे. हे चराचरव्यापी एक चैतन्य, हा विश्वव्यापी एक नियम ओळखा, म्हणजे मग सर्वांशीं खऱ्या प्रेमाने, मित्रभावानें रहातां येईल.

परदुःख किंवा परसुख याची खरी जाणीव, खरी सहानुभूति मगच होऊं शकेल.

जे कोणी ह्या राज्यांत येऊं इच्छिणारे असतील, त्यांनीं नव्या जुन्या कोणत्याही बहिबाटी–परंपरांचे बंदे असतां कामा नये. त्यांना जीवनाचे ध्येय समजल्यामुळें त्यांनीं नवा जीवनक्रम धरला पाहिजे. जे कोणी येथें † येतील,

---

† येथें म्हणजे हालंडांत ऑमेनमधील एर्ड किल्ल्यांत; हीं प्रवचनें तेथें झालीं.

म्हणजे रहायला व कार्य करायला येतील; जे शिकायला येतील, आणि पूर्वी सोसले नसल्यास क्लेश सोसायला येतील; जे देवपदाचें सुख व आनंद शोधण्यासाठीं येतील; त्या सर्वांना त्या एका नियमाची प्रेरणा झाली पाहिजे, व त्या सर्वांनीं त्या सुखाच्या साम्राज्यांत प्रवेश केला पाहिजे. चालू घडीला ढग आलेले असोत, सूर्य दृष्टीआड झालेला असो, तरी आपल्या हृदयांत आशा, उत्साह व प्रेरणा, सदैव टवटवीत प्रफुल्लित राहिली पाहिजे. ह्या पीठापासून नवसृष्टिकारी सकल्पशक्तीचे प्रवाह जगभर पसरले पाहिजेत; जीवनाच्या नव्या कल्पना, आजच्या जगाच्या कोंड्यासांकड्यांच्या पुरातन किल्ल्या, विस्मृतींत गजत पडलेल्या किल्ल्या येथून जगाला मिळाल्या पाहिजेत; येथून शुद्ध सुगंधित प्राणवायूचे स्रोत बाहेर पडून जगाला त्यांनीं नवचैतन्योन्मत्त करून सोडलें पाहिजे.

तुम्ही सर्वांनीं त्या सुखराज्यांत प्रवेश केला पाहिजे, त्या एका मूळ झऱ्याचे पाणी प्यालें पाहिजे, त्या एका देवालयात एका देवाची पूजा केली पाहिजे. कारण आपणा सर्वांचे जे एक परमपूज्य उपास्य तेच सर्व जगताचे आदिकारण होय. ते तर्काचे पलीकडे, वादविवादाचे पलीकडे, व्यक्तीच्या महत्त्वाकांक्षा व खटाटोप यांचे पलीकले आहे. जोंवर तुम्ही हा एक नियम ओळखून चालत आहां, जोंवर धडपडत आहां व त्या धडपडींत धीरोदार भावना आहे, तोंवर जीवनाचें रहस्य दाखविणारा नवज्ञानदीप तुमचे अंतरंगीं तेवत राहील; आणि दुःखितांना देण्यासाठी तुमचेपाशीं नवसुख व नवशक्ति हीं सदैव रहातील. येथे तुम्ही येण्याचे कारण हेंच, नवसृष्टि करण्यास सामर्थ्य यावे, दुःखक्षतांच्या वेदना तुम्हांस निववितां याव्या, हेंच. वेदना निवाल्या, तुम्ही निवांत झालांत, तुम्हाला ती शांति मिळाली म्हणजे लगेच ती शांति दुसऱ्यास देण्यास तुम्ही समर्थ व्हाल.

हे स्थान नव्या चिठ्या कपाळावर लावायला येण्याचें नाहीं, क्षुद्र अहंकार तृप्त करण्याचें नाहीं. हे स्थान कशाचे आहे ? तो सनातन नियम पाळून प्रत्येकानें येथचें जीवन शक्य तितक्या नेटाचें, शक्य तितक्या साहसाचें, शक्य तितक्या चढाईचें करण्याचे हे स्थान आहे. या स्थळांमध्यें खोट्या ध्येयांचें वाळवंट तुम्ही निर्माण करतां कामा नये. तुम्ही येथें मिळमिळीत बनतां उपयोगी नाहीं. लहानगे देव्हारे त्यांत लहानगे देव, असा पूजेचा

पोरखेळ मांडण्याचें हें स्थान नव्हे. त्याचीं इतर ठिकाणें आहेत. ते येथे नको. ती वेडी पूजा, वेडी वृत्ति, वेडी भक्ति होय. येथल्या ह्या झऱ्याचें पाणी प्याल्यानंतर तुम्हांस दुसरीकडचें रुचणार नाहीं. ज्यानें येथें महादेवाची पूजा केली त्याला दुसरीकडे जाऊन इतर कोणत्याही गोष्टीच्या पूजेचें प्रयोजन काय ? सूर्यनारायणाचा सगळा प्रकाश मिळत आहे, अशा वेळीं पूजा करण्याचें सोडून एका पंतीच्या मिणमिण उजेडांत पूजा करण्याची कोणाला हौस आहे ! पण तेंच तर तुम्ही सारा दिवस करीत असतां—चिमुकलें देऊळ, त्यांत मांडला चिमुकला देव्हारा आणि गढले पूजेच्या खेळांत, पण येथे आम्हाला असें महा-देवालय उठवावयाचें आहे कीं त्यांत अखिल मानवजातीच्या उपासनेची सोय होईल.

प्रत्यहीं मला अधिकाधिक वाटत आहे कीं आतां ह्या गोष्टी तुमच्या तुम्हांस दिसल्या पाहिजेत. त्या तुमच्या स्वभावांत अंगभूत झाल्या पाहिजेत. माझ्याकडून मी उपदेश करीन, संवाद करीन, आरोळ्या मारीन, गाईन, त्या स्वसुखसाम्राज्याचा हर्षरोमांच अनुभवीन—कदाचित् तुमचे हृदयांत लहानसा स्फुलिंग टाकीन; पण तुमचे तुम्ही साधनसायास केले पाहिजेत. तुम्ही ती खरी व शाश्वत महदाकांक्षा धरा; ती अभिष्ट गति मी पावणार, स्वसुखाचे राज्यांत प्रवेश करणार असा जिवाचा धडा करा. तेथेंच खरें आनंददायक सौंदर्य आहे; तेथेंच प्राप्त करण्याजोगें सत्य आहे, सत्य जीवनानें जगण्याचा नियम तेथेंच आहे. तुम्हाला मनोविकासाचें स्वातंत्र्य, भावनानुभवाचें स्वातंत्र्य, आणि क्रियास्वातंत्र्य असलें पाहिजे. तुमचें शरीर दृढ होण्यासाठीं मी चांगलें खायचें प्यायचें, याचा काय उपयोग ? तसें होतें तर उद्यांच जगाचा उद्धार झाला असता. मी उद्यां जगांतील खाण्यापिण्याच्या उत्तमोत्तम पदार्थांनीं पोट भरून घेईन; पण त्याचा तुम्हास काय उपयोग ! तुमच्या आत्म्याची उन्नति व्हावी, तुमचें जीवन उदात्त व्हावें, तर तुम्हीच आपल्या आत्म्याला पोषक पदार्थ दिले पाहिजेत, त्याचें पोषण केलें पाहिजे, योग्य साधनें—योग्य परिस्थिती दिली पाहिजे, योग्य साहस करविलें पाहिजे. प्रत्येकानें ती अंतर्यामीची स्वतःची वाणी, आत्मसूर्यप्रकाशांतला निज-किरण, आधींच शोधून काढला नसल्यास, शोधून काढला पाहिजे. प्रत्येकाचे हृदयांत तें मंथन, ती आतुरता, ती महदाकांक्षा उठली पाहिजे.

तें निधान एकदां हातीं मात्र येऊं द्या, आणि मग मी प्रतिज्ञेनें सांगतों, कीं तुम्ही राजप्रासादांत रहा नाहीं तर, झोळीनिशीं उघडे बोडके दारोदार हिंडा, त्यानें तुमच्या निजस्थितींत अंतर होणें नाहीं. कारण तुम्हास अक्षय जीवनाची आंतली संजीवनी लाधली! आणि मगच तुम्ही जगाला निज-जीवन व निजसुख देऊं शकाल!

---

[ १० ]

## कोणतीं फुलें वहाणार?

आतांपर्यंतचा माझा उपदेश जर तुम्ही आवडीनें ऐकला असेल तर, मला वाटतें, हा सिद्धांत तुमचे मनापुढें उभा राहिला असेल, किंबहुना हृदयांत बिंबला असेल, कीं ह्या राज्यांत प्रवेश होण्याला साधकानें आपले सर्व पाश तोडले पाहिजेत, या मृत्युभूमीशी तींतल्या सुख-दुःखाशी व धालमेलीशीं स्वतःस बांधून टाकणारे. सर्व बंध तोडून टाकले पाहिजेत. त्यांतून सुटून मुक्त होणें म्हणजेच चित्प्रकाशानें प्रकाशित होणें, निर्वाणपद पावणें, त्या एका नियमाचे अंकित होणें, व स्वानंदसाम्राज्यांत प्रविष्ट होणें. ह्याचाच पर्याय कर्मबंधनांतून सुटका होणें होय. भूतकाळ हातचा गेला; त्यावर आतां सत्ता राहिली नाहीं. त्यांत चुका झाल्या असतील, ज्यांना पापें म्हणतात तीं घडलीं असतील, बिचार-दोष घडले असतील; आणि त्यांचें निश्चित फल जें दुःख—क्लेश यांच्या बेड्या कर्मांनें आमचे पायांत आज घातल्या आहेत, हें खरें. तथापि वर्तमान व भविष्यकाल हे तर तुमचे हातीं आहेत. तेव्हां वर्तमानाचा सदुपयोग करा व त्या योगानें भविष्यावर सत्ता मिळवा; आज सत्कर्म करून उद्यांची सुस्थिति स्वाधीन करून घ्या. आणि, देश-काल ही केवळ माया किंवा गारुड आहे, त्याचा निरास करा. तुम्ही खऱ्या ज्ञानाचे जिज्ञासु, तुम्ही त्या अक्षय सुखाचे, पंढरीचे बारकरी, किंबहुना ते सुखधामच निजांगें होऊं इच्छि-

णारे, तुम्ही हें समजायला पाहिजे कीं 'त्या पांडुरंगीं जेणें घडे अंतराय' असें कर्म आजही करूं नये, आणि उद्यांही करूं नये; नवीन कर्म निर्माण करून आपण व आपलें ध्येय यांमध्ये अडथळे उत्पन्न करूं नये. याचा अर्थ असा कीं सदैव सावधान रहावें; 'प्रत्यहं प्रत्यवेक्षेत नरश्चरितमात्मनः' प्रत्येक दिवशीं मनुष्यानें आपल्या स्वतःचें प्रत्यवेक्षण करीत जावें; वारंवार मनास जागवित जावें; आणि हें आत्मपरीक्षण गंभीर उल्लासवृत्तीनें करावें. असें कीं तेणेंकरून आपले विचार कोणतेही असले, क्रिया कोणत्याही असल्या, भावना कोणत्याही असल्या तरी त्या राज्यांत प्रवेशाला प्रतिबंध न करतील अशाच त्या असाव्यात. त्या राज्याची द्वारें कधीं बंद नसतात. वस्तुतः त्या राज्याला दारें, अडसर इत्यादि नाहींतच. मग द्वारें, द्वारपाल-आदि प्रतिबंध कोठले ? ते आपणच निर्माण केलेले असतात. माणसानें आपलें कर्म आकळावें कसे ? त्याला उपाय हाच की सावधानता, विवेक, आत्मनिरीक्षण. स्वतःच्या चरित्रांतील लहान थोर गोष्टी, स्वतःचे सारे विचार, रोजच्या क्रमांतील सुखें व आनंद याबाबत आत्मपरीक्षण करीत राहिलें पाहिजे.

परंतु ध्यानांत धरा कीं आत्मनिरीक्षण म्हणजे मनांत कुढत बसण्याचा रोग नव्हे; सदा आपल्याच विचारांत गर्क, दुसऱ्या कशाचा किंवा कोणाचा त्या परिघांत प्रवेश होणें नाहीं असा स्वभाव नव्हे. तर उलट ह्या गुणानें स्वभावसुधारणेला सहाय्य केलें पाहिजे,—जी आपली महत्त्वाकांक्षा किंवा अभीष्ट परमार्थ, त्याचे अनुरोधानें आपणास आपले अन्नप्राणमय, वासनामय, मनोमय कोशांची निर्दोष अभिवृद्धि करतां आली पाहिजे. पहा, द्राक्षावेलीची मूळ प्रवृत्ति एका इष्ट दिशेनें न वाढतां, सर्व दिशांनीं भरमसाट जाण्याची असते; पण माळी शहाणपणानें वेळेवर छाटून तिची योग्य रीतीनें वाढ करतो; तसें योग्य रीतीनें तुम्ही आपल्या मनाची व अंतःकरणाची जोपासना व अभिवृद्धि करावी.

मीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं आत्मपरीक्षणाला खिन्न वृत्ति किंवा कुढणारा स्वभाव असें निकृष्ट रूप येऊं नये. एखादा विद्यार्थी परीक्षेसाठीं जसा नेम-लेला अभ्यास नित्य नियमानें करीत असतो, तसें निर्विकार, तटस्थ वृत्तीनें

ह्या निरीक्षणयंत्राचा उपयोग करायला शिकलें पाहिजे. आत्मनिरीक्षण बांचून, गंभीरपणे आपली आपण उलटसुलट प्रश्नांनीं परीक्षा घेत गेल्य बांचून शीलघटना होणार नाहीं. आणि शीलावांचून, तर्कशुद्ध पद्धतीनें स णांचा संपूर्ण विकास केल्याबांचून, तुम्ही निबळ निर्जीव लांकडी ठोक व्हाल. सद्गुरूस अनुसरण्याला, नवसृष्टी करण्याला, उदात्त जीवनाला आवश्यक गुण ते कोणतेही तुमचे अंगीं येणार नाहींत.

प्रत्येकानें यज्ञांत आहुति देण्यासाठीं कांहीं तरी सद्गुणसमिधा आणल पाहिजेत. देवालयांत येतांना प्रत्येकानें देवाला वहाण्यासाठीं कांहीं तरी फु आपले परडींत आणलीं पाहिजेत; आणि तीं सर्व भव्य, सुंदर, मधुर गं युक्त व पूर्ण विकसलेलीं असलीं पाहिजेत. तुम्ही अशीं फुलें घेऊन देवळ या, म्हणजे सर्वांना आवडते, सर्वांना हवेसे व्हाल. पण रिकामी परडी घेऊ याल आणि म्हणाल—आमचेपाशीं विकासित दिव्यगुणांचीं पुष्पें नाहीं आम्ही नुसत्या बावळ्या भावानेंच पूजा करूं, तर त्याचा कांहीं उपयो नाहीं. तुमचेपाशीं देवाला अर्पण करण्यासारखें कांहीं तरी असलें पाहि त्याशिवाय 'मी माझें सर्वस्व देवाला दिलेले आहे' असें कोरडें म्हणणें व्य आहे. मी सर्वस्व देतों असें पुष्कळ माणसें म्हणतील. कारण देण्याला जव आहेच काय? हातीं कवडी नाहीं अशा माणसांनीं मी माझ्या संसारा त्याग केला आहे असें म्हणण्यासारखे हें होय. परंतु तोच एखादा अनुभवपू मनुष्य असला, ज्यानें जग उमजून, जिंकून, वश करून घेतलें आहे, अ असला आणि त्यानें आपल्या धनावर, वैभवावर उदक सोडलें, तर त्याच त्यागाला, त्याच्या संन्यासाला मोल आहे. कारण त्यानें क्लेश भोगले आहे अनुभव पूर्ण घेतले आहेत, म्हणून त्याचा त्याग आम्हांला मार्गदर्शक होतो एका गृहस्थांचा एक बाग आहे. पण त्यांत फुलेंच नाहींत; आणि सांगताहे 'सगळीं फुलें तुम्हाला भेट;' तर अशा देणगीचें मोल किती? वस्तुत अशा मनुष्याची बुद्धि व भक्ति दोन्ही असतात कनिष्ठ प्रतीचीं. त्यामु त्याच्या दानाला औचित्य व शोभा नसते. परंतु तोच समजा, बुद्धि, भक्ति वीर्य, कर्तृत्व, अशा संपदेनें संपन्न असा कोणीएक पुरुष आहे आणि स सर्वस्वाचा त्याग करून, स्वतःच्या ध्येयाचा अनुयायी, चेला होण्यास पु आला आहे; तर अशाचा सत्कार होईल.

आतां सर्वांचेपाशींच अलौकिक बुद्धि, अनन्यभक्ति, असामान्य योग्यता किंवा अलोट सामर्थ्य असले गुण असूं शकणार नाहींत; खरें आहे. परंतु निदान सुसंघटित शील, कांहीं तरी कर्तृत्व, कृतार्थता, एखादें तरी स्वतःचे बागेत वाढवलेलें, वारे बादळांतही जतन करून प्रफुल्ल राखलेलें फूल असें कांहीं तरी, फूल नाहीं फुलाची पाकळी, देवाला वहायला आणाल! असे कोणतेंही उपायन आणा. तें कितीही लहान असो, त्याला मोल आहे. त्यावरून हें सिद्ध होईल कीं तुम्ही मोलवान, भव्य, सुंदर, खरोखरी देवगुरूंना अर्पण्यास योग्य अशा वस्तूंचा त्याग, अशा वस्तु कृष्णार्पण करायला शिकलां, निदान शिकूं लागलां. आणि असें करतां करतां, मीं पूर्वीं सांगितल्या-प्रमाणें एक अशी वेळ येईल, इटकून येईल, की तेव्हां ती वाणी, तें आंतलें पहडूल अशी तुम्हांस आज्ञा सोडील कीं, सर्व सोडा आणि माझेमागे या. तुम्हांला तो मुहूर्त साधायची सिद्धता केली पाहिजे. तुम्ही आपले उद्यान; पण खुरपून, मशागत करून, उत्कृष्ट स्थितींत राखले पाहिजे. त्यांतील फुलें अगदीं खुडण्याजोगीं असली पाहिजेत. आणि नतर तुम्ही तीं आपली भक्ती व बुद्धी सद्गुरुचरणीं जेव्हां अर्पण कराल तेव्हां तीं सद्‌गुरूंच्या उपयोगी पडतील असा पूर्ण भरंवसा तुम्हाला धरतां येईल. कारण कीं तुम्ही परिश्रमानें त्यांचे संशोधन व संस्करण केले असल्यामुळें त्यांतले गुण तुम्हाला माहीत असतील. आणि तेव्हां मात्र तुम्ही त्या वस्तूंचे खरे धनी व्हाल. आणि अशा वस्तूंचा जेव्हां तुम्ही होम कराल—वस्तुतः त्यांतच तुम्हाला सुख व उल्लास वाटत असल्यामुळें त्याला होम म्हणणे बरोबर नाहीं—तेव्हां तुम्ही तीं फुले आणलीं म्हणजे, त्या देवालयांतला मुख्य पुजारी म्हणा—किंवा तुमची आत्मवाणी, अंतर्यामींचा राजा, शास्ता कांहीं म्हणा, तो तीं घेईल, त्याचा उपयोग करील, त्यांना अधिक सुंदर बनवील व त्यावर देवलोकचा वायु फुंकून त्यांना दिव्यत्व आणील.

म्हणून, जोंवर अद्यापि तुम्ही पक्के त्या मार्गाला लागलां नाहीं, चांचपडत, हिंडत आहां, तेव्हांपासूनही हें शीलघटनेचे काम सदैव चालू ठेवा; तें अत्यवश्यक आहे. त्यानें तुमचीं फळें पाडास लागतील, आणि जेव्हां तीं माळी तीं तोडायला येतील तेव्हां तीं पक्व आणि जगास पुष्टि व आनंद देण्यास सिद्ध असतील. ह्यासाठीं वारंवार आत्मपरीक्षण, सदैव जागरूकता

व दक्षता यांची फार अवश्यकता आहे. आपण झोंप घेतां कामा नये, पण स्वप्नें पहाण्याला मोकळीक आहे. तेव्हां जागेंच रहावें, पण शांत, एकान्त ध्यानाचीं स्वप्नें पहावीं. जितके तुम्ही दक्ष व जागरूक रहाल तितका तुम्हाला क्षुद्र गोष्टींच्या बंधनकारक कर्मांचा प्रतिकार करतां येईल. त्यांचाच दोर तुम्हांस ह्या जन्ममरणाच्या भवचक्राला, ह्या तापत्रयाला, ह्या अनादि अनिर्वचनीय सकलदुःखमूल मायेला जखडून ठेवतो. म्हणून हे अडथळे तोडून फेंकून द्या म्हणजे तुम्हाला त्या राज्यांत रहातां येईल आणि त्याला उपाय पूर्वोक्त एकच–सुशिक्षित सुसंस्कारवंत मनोविचार, सुपुष्ट सुविनीत भावना आणि पूर्णपणें वशीकृत देह, हें त्रिदल.

हें आत्मनिरीक्षण किंवा परीक्षण, म्हणजे आपल्या सद्बुद्धीपुढें आपल्या लहानथोर कायिक, वाचिक, मानसिक सर्व कर्मांचा ताळेबंद वाचणे, हें काम प्रत्येक दिवशीं केलें पाहिजे. तसेंच प्रत्येक दिवशीं चिंतन, मनन, ध्यान केलें पाहिजे, आणि त्याचे सहाय्यानें क्षुद्र दोष, उन्नतिप्रतिबंधक अवगुण दूर केले पाहिजेत. अशा ध्यानाभ्यासाने नवसृष्टि करण्याचें सामर्थ्य तुमचे अंगीं येईल. तसाच भावनांवर, हृदयोर्मींवर संस्कार केला पाहिजे. त्यांना शुद्ध, आणि बलिष्ठ पण ममत्वरहित, बनवल्या पाहिजेत. संकुचितपणा, स्वार्थीपणा, क्रोध, मत्सरआदि जे विकार आरंभीं क्षुद्र विक्षेपच असतात पण पुढें दांडगे प्रतिबंध बनतात, त्यांचा लेश–गंध त्यांत राहूं देतां कामा नये. विचारशक्ति व भावनाशक्ति यांची क्रिया, उत्कृष्ट यंत्राप्रमाणें, अगदीं लीलेनें चालू झाली पाहिजे. आणि अशा रीतीनें विचार व भावना संसिद्ध झाल्या म्हणजे शरीराचा संयम साधणे सोपें आहे. मग विदेहीपणा साधणें सोपें जातें; म्हणजे शरीराच्या वासना, तहानभुका, क्लेश यांपासून अहंवृत्ति वेगळी करून एखाद्या सुंदर वस्त्राप्रमाणें त्याचा उपयोग करणें हे अनायासाने साधतें. येथें मी स्वतःची एक गोष्ट सांगतों, याची क्षमा करा. मी हिंदुस्थानांत निलगिरीवर ऊटी येथें होतों. तेथें ह्या देहीं विदेहीपणा आणण्याचा प्रयोग मी करीत होतों, व तो प्रारंभीं चांगलासा साधत नव्हता. देहापासून अहं वेगळा करून देहव्यापार अवलोकन करण्याचा मी अभ्यास चालविला होता. असे दोनतीन दिवस गेले; कदाचित् एक आठवडाही गेला असेल; तेव्हां मला असा

अनुभव आला कीं खरोखरच कांहीं वेळ मी देह सोडून वेगळा राहिले आहें. देह बिछान्यावर निजला आहे आणि मी त्याचेकडे पहात आहें ! कसें तें विलक्षण वाटत होतें ! काय अद्भुत अनुभव तो ! आणि त्या दिवसापासून ही विदेहभावना, देहापासून मी वेगळा असल्याची जाणीव, माझेठायीं सदैव नांदत आहे. तेव्हांपासून मी आत्मा, व माझा देह यांमधलें अंतर, आणि ह्या दोघांचा स्वामिसेवक संबंध यांची जाणीव माझे मनांत सदोदित जागत आहे. त्यामुळे जरी देहाच्या वासना—म्हणजे केवळ देहाच्या चैनीसाठीं खावें, प्यावें, मजेनें हिंडावें असें वाटणें—देहाला होतातच, तथापि त्यांचेपायीं मी आपल्या म्हणजे आत्म्याच्या कर्तव्याला कधीं बाधा होऊं देत नाहीं. ह्याचसाठीं तुम्हीही आपल्या सर्व देहांना म्हणजे अन्नमय, वासनामय व मनोमय देहांना असे चांगलें शिक्षण किंवा वळण द्या, कीं त्यांचें प्रत्येकाचें पृथक्‌जीवन जरी असलें तरी त्यांनीं नेहमीं सहकार्यास सिद्ध व तत्पर असावें. उदाहरणार्थ, मनास असा अधिकार आला पाहिजे कीं त्यानें वासनांस आज्ञा द्यावी कीं अमुकच भावना येथें याव्या व त्या अमुक मर्यादेतच असाव्या आणि ती निमुटपणें पाळली जावी. भावनांचाही तसाच अधिकार स्थूल देहावर चालावा. अशानें आपण तीन वेगळीं वेगळीं सोंगें घेतों, त्यानें खेळाला अधिक रंग चढतो अधिक मौज होते. ह्या जाणिवेनें साहसी स्फूर्तींचा अनुभव येतो. आतां मी एक नव्हे तर तीन भूमिका करीत आहें, तिघांच्या तीन वेगळ्या आवडी, तीन वेगळ्या मौजा, तीन वेगळ्या दृष्टी व तीन कर्में अनुभवीत आहें याचा प्रत्यय मिळतो. आपलें लहानसें संकुचित जीवन एकंदर जगाच्या समष्टि-जीवनांत लीन करण्याचा, हा श्रीगणेशा होय. ह्यापासून पुढें त्या तीन देहांचाही अभिमान सुटून जगांतील असंख्यकोटि जीवशरीरांत आपण लीन होतों. ते सर्व लोक भिन्नभिन्न प्रकारांनीं व्यक्त होत आहेत, तथापि सर्व परमात्मगांवाचीच वाट चढत आहेत; त्याच एका ठिकाणीं जाण्यासाठीं चांचपडत, धडपडत आहेत. म्हणून प्रथम ह्या तीन प्राण्यांना योग्य विनय लावा व ह्या सगळ्या मेळ्याचा आनंद तुम्ही घ्या. म्हणजे तुमचे किती तरी कर्मबंध अनायासें तुटतील. मग तुम्हाला असें आढळून येईल कीं—आपण बंधमुक्त झालों, आतां आपल्याला मोकळेपणें स्वच्छंद विहार करतां येतो, वस्तुजात मागें टाकून त्या सुखाचे

राज्यांत जातां येतें व तेथें चिरकाल रहातां येतें. ह्यानें जीविताचें कांहीं अपूर्व अभिज्ञान, अपूर्व आनंद, कांहीं वेगळीच झुळूक यांचा लाभ होतो. तुम्हाला असा हव्यास लागतो कीं दुःखाचाही प्याला चाखावा, सर्वांचें सार ग्रहण करावें, सर्व शिकावे, सर्व निरीक्षावे, सर्व करावें आणि त्यापासून उद्भवणाऱ्या बंधनांत मात्र राहूं नये. तुम्ही आतां तटस्थवृत्तीचे निरीक्षक बनलां आहां. विवेक, सारासारविचार, तारतम्य, निर्णय या साधनांनीं सर्व गोष्टी तोलीत आहां. हा उद्योग सर्व दिवसभर, प्रत्येक क्षणोक्षणीं, केला पाहिजे. मात्र त्यांत अति गंभीरपणा नसावा; निर्मल, सात्विक हास्य-विनोदाला जन्मठेपेची शिक्षा देऊं नये; हे असे साधन जर साधलें तर तुम्हाला असें आढळेल कीं त्या राज्याच्या वेशी तुम्हाला सदा उघड्या आहेत. हवें तेव्हां आंत जावे, हवें तेव्हां बाहेर यावे, हवा तेथे यथेष्ट विहार करावा, किंवा स्वस्थ बसून ध्यान, भजन, पूजन करावे. जीवनांत खरा आनंद हा एकच. विवेकी मनुष्याला सेवनास सुख हे एवढेच. कारण, एकंदरींत बुद्धिमान मनुष्याचें ह्या जगापासून चिरकाल समाधान कधीं होणे नाहीं. त्याला कांहीं तरी पलीकडचें पाहिजे असतें, त्याचीं सुखस्वप्नें व दृष्टान्त हवे असतात, मोठी उत्कंठा पाहिजे असते. त्याशिवाय त्याचें समाधान होत नाहीं. आतां, अशी खरीं बुद्धिमान्, खरीं साहसप्रेमी, नवशोधप्रेमी माणसें आपल्या मडंळींत थोडीं असलीं तथापि हे प्रेम, व असल्या आकांक्षा आपणास उत्पन्न करतां येण्यासारख्या असतातच. हृदयांत सत्याचा व प्रकाशाचा प्रवेश होण्यास प्रतिबंधक अशीं जीं कपाटें व भिंती, त्या आपणांस फोडून टाकतां येतात. आणि तसें केलें म्हणजे तीं सुखस्वप्नें व उदात्त दृश्ये पहाण्यांत माणसाचे मन रंगतें, त्यास त्याचा आनंद वाटतो. तीं स्वप्नें म्हणजे मिथ्याभास नव्हेत, त्याच खरोखरी सत्य वस्तु आहेत; तेंच आपलें जीवाचे जीवन आहे, त्या जीवनानेंच आपण जिवंत राहूं शकतों. तेव्हां त्या दृश्यांची, त्या स्वप्नांची आम्हांला मोठी आवश्यकता आहे. आम्ही कितीही व्यावहारिक असलो, नगद मालाचे चहाते असलों, तरी आंतलें जीवन प्रत्येकास पाहिजे असतेंच. जगाचे दृष्टीस न पडणारें एखादें तरी दालन प्रत्येकाचे जीवितांत पाहिजेच. तेथें एक स्वतःचा चित्रफलक मांडला पाहिजे; त्यावर अनंत कालानें पूर्ण होणाऱ्या देवप्रतिमेची

रूपरेषा आपण काढीत असावें. त्यांत नित्य कांहीं शोध केला, कांहीं नवी रंगच्छटा भरली, एखादी नवसौंदर्याची लकेर निर्माण केली तरच जिवाला समाधान वाटेल. ह्याच्यायोगानें अल्पसंतोषाच्या भयंकर शिक्षेपासून सुटका होईल. एवढें एक सत्यनिधान जवळ असलें म्हणजे झालें; कोणालाही दुसऱ्या कशाची आवश्यकता नाहीं. असो. एकदां आपला प्रवेश झाला, एकदां प्रत्यक्ष दर्शन घडलें, एकदां तो स्वप्नसाक्षात्कार झाला म्हणजे त्या निज-राज्यांत आपणाला नेहमीं, हवे तेव्हां जाऊन रहातां येतें.

---

[ १० ]

# मंतरलेला बाग



मला असें झालें आहे, कीं केव्हां एकदां तुम्हांला त्या स्वानंद-साम्राज्यांत घेऊन जाईन, केव्हां तेथें सत्याचे सदनांत निवास, आणि तेथील परम-पावन वायूचें सेवन, आणि निजसुखाचे, निजानंदाचें भोजन केव्हां तुम्हाला करवीन! राहून राहून मला अशी उत्कट इच्छा होते कीं, आपलें मन व हृदय उघडावें, हातीं धरून तुम्हाला त्याच्या आंत न्यावें, सर्व वस्तु आहेत तशा दाखवाव्या, जगाच्या खऱ्या रूपाची तुम्हांस जाणीव द्यावी, आणि खऱ्या शाश्वत व नित्य पदार्थांमध्यें आपले संगतीं तुम्हांला राहवून घ्यावें. पहा. माझें कांहीं तुम्हाला असें सांगणें नाहीं, आज्ञा नाहीं, टोंचणी नाहीं, बलात्कार नाहीं कीं तुम्ही अज्ञातप्रदेशांत भ्रमत रहावें, आणि ज्याचें ज्ञान नाहीं, अनुभव नाहीं, स्मरण नाहीं अशा वस्तूंत रमावें. छे! माझा तसा मुळींच आग्रह नाहीं. तर मग माझ्या उपदेशाचें काय कारण? त्याचें कारण हेंच कीं तुम्हाला माहीत आहे असें एक अक्षय धाम आहे, असें सत्य आहे, से सत्पदार्थ आहेत; आणखी तुम्ही त्या राज्यांत जाऊन

आलां आहां, तेथें राहून आलां आहां, तेथील सुख, चैन लुटून आलां आहां; ह्या सर्व कारणांस्तव माझें तुमचेपाशीं म्हणणें आहे कीं त्या राज्यांत, त्या सत्य जगतांतच निरंतर रहा; तेथें विहार करा आणि नंतर ह्या असत्, अनित्य जगांत रहाण्यास या. कसे ? तर असे कीं तुम्ही या जगांत वागत असूनही, त्यासत् जगांत वास कराल. आम्ही बहुतेकजण त्या सत्याचे राज्यांत अशा भावानें जातों, कीं जणु कांही तें अगदीं अनोळखी, परकें जग आहे. परंतु वास्तविक पहातां, जें खरे अनोळखी, चंचल, क्षुद्र आणि कवडी-मोल आहे, ते हें इंद्रियगोचर जगच होय.

जर तुम्ही एकदां त्या राज्यांत प्रवेश केलात, जर तेथली प्रफुल्लता, स्वस्थता व शांति यांचा वायु सेविलात, तर नंतर कदापि तुम्ही तेथल्या त्या सत्य वस्तु, त्या खऱ्या महत्त्वाच्या व जिवाच्या जिव्हाळ्याच्या वस्तु, विसरणार नाहीं. नंतर संशय व दुःख यांचा वारा कधीं तुम्हांला लागणार नाहीं. तेव्हां मात्र तुम्हांला समजेल कीं आपण कोणाचेही अंध अनुयायी नाहीं, तर एकल्या अक्षय, कैवल्यधामाचे अनुयायी आहो. त्या समयी मात्र तुम्ही त्या चराचरधारी वासुदेवाशीं सायुज्य पावाल. त्याच वेळीं तुम्हास लोकांचीं मनें वेधतां येतील, तुम्हांस विद्वद्वाणी लाभेल, शहाणे व दयाधन यांचें हृदय प्राप्त होईल. त्याच वेळी तुम्ही जनांस प्रचीती देऊं शकाल कीं दुःखापासून व जिवाला बेजार करणाऱ्या, चिरडून टाकणाऱ्या नित्याच्या क्षुल्लक गोष्टीं-पासून, सुटका होणें म्हणजे काय स्थिति आहे. 'तुम्ही आपले आपणाला शोधून काढा, ती वाणी कान देऊन ऐका, क्लेश भोगा, नित्य व्यवहारांतील प्रत्येक बारीकसारीक गोष्टीपासून बोध घ्या' इत्यादि उपदेशांतला हेतु तोच होय. एकदां तुम्हांस आत्मा सांपडला कीं तो परमगुरु सांपडलाच. तो व तुम्ही एक आहां; तो देह, तुम्ही अवयव; जेथे तुम्ही तेथे तो आहे. तो कोठें दूर एकटाच आपल्या प्रभावळींत तळपत बसलेला नाहीं. जेथें तुम्ही असाल तेथें तो आहे, जेथें मी आहें तेथें तो आहे; तसेंच, जो कोणीही त्या राज्यांत येईल, राहील, व तेथील सुखानें सुखी होईल त्या माणसाचे-जवळ तो असणारच. तुम्हांला तुम्ही सांपडलात म्हणजे तुम्हाला तो परमात्मा सांपडला, आणि तो परमगुरु सांपडला म्हणजे त्या उगमस्थानापाशीं तुम्हाला हवें तेव्हां जाऊन बसतां येईल. संपूर्ण ज्ञानाची किल्ली तुमचे हातीं येईल,

त्या अनाद्यनंत समस्तभूत प्रभवांत, त्या करुणासिंधूत मिसळतां येईल. ह्या सर्व गोष्टींचा हृदयास प्रत्यक्ष स्पर्श, त्यांचे प्रत्यक्ष दर्शन तुमचे तुम्हांस करवण्याचें सामर्थ्य मला असतें तर बहार झाली असती.

काल ह्या किल्ल्यासमोर* वृक्षपंक्तीमध्यें मी बसलों होतों. तेथे कांहीं वृक्ष ठेंगणे व कांहीं उंच असून त्यांचे सोटांभोवतीं गुंफेसारख्या आकृती बनलेल्या आहेत, तें तुम्हांला ठाऊक आहे. तेथें बसलो असतां माझ्या त्या सकलसत्यसाराचा, सर्व वृक्षांच्या- सर्व प्राणिमात्रांच्या जीवनाचा, आदिकारणाचा, परमानंदाचा, आत्मतेजाचा मला साक्षात्कार झाला. एकदां तुम्हाला त्याचें दर्शन झालें, त्याचेठायीं वास घडला, तुमचें जीवन तन्मय झालें म्हणजे मग तुम्ही त्या आत्मोद्यानांतले अक्षय निवासी व्हाल, थोडीशीं झाडें—फुलें थोडा वेळ दुरून पहाणारे परके प्रेक्षक असे तुम्ही रहाणार नाहीं.

जगांत मनुष्यांचे दोन वर्ग आहेत. हें आत्मोद्यान पहा. ह्यांत सर्वत्र लुसलुशितपणा, प्रफुल्लता, रमणीयता, व शांति नांदत आहे; सहस्रावधि कलमधुरध्वनींचें कूजन आहे; समस्त वायुमंडल अक्षय सौंदर्याचे प्राणानें प्राणभरित झालेलें आहे; शक्ति, शांती आणि विलक्षण सामर्थ्य व खरेपणा यांचा नित्य साक्षात्कार आहे. ह्या उद्यानांत जे रहातात त्यांचा वर्ग पाहिला. आतां दुसरा वर्ग पहा. हे लोक उद्यानाचेबाहेर उभे आहेत, माना वर करकरून कोठें झाडांचे शेडे, कोठे दोन चार फुलें ओझरतीं पहात आहेत. येथें छाया नाहीं, हिरवी दाट पालवी नाहीं, कांहीं नाहीं. केवळ गेल्या वर्षींचे कांहीं वाळलेले खुंट व खांद्या आहेत. येथें रहाणारे आहेत यांचा वर्ग दुसरा. एकदां तुम्ही स्वतः बागेंत जाऊन राहिलां म्हणजे मग तुम्ही बागेची किल्ली इतरांना देऊन, त्यांना आंत स्वतः जाण्याचा उपदेश करूं शकाल. तुम्हीं त्यांना प्रचीती देऊं शकाल कीं, त्या बागेला मनुष्याच्या कल्पनांनीं, त्याच्या भावनांनीं भिंती बांधल्या असल्या तरी वस्तुतः भिंती नाहींत. एकदां तुम्ही आंत आलांत कीं मग, बाहेरून बाहेरच्यांच्या दृष्टीनें आंतील मनुष्यांकडे पहाण्याची पाळी तुम्हांला येणार नाहीं. तर उलट, सत्याच्या, आत्म्याच्या, जगदादिकारणाच्या

---

* हॉलंडमध्यें ऑमेन येथें एक किल्ला आहे, व त्याचेसभोंवतीं मोठें उपवन आहे. त्या किल्ल्याचें नांव एर्ड किल्ला असें आहे. त्याच ठिकाणीं हीं प्रवचनें झालीं. त्या किल्ल्याला अनुलक्षून हा उल्लेख आहे.

केंद्रांपासून अंतर्दृष्टीनें तुम्ही बाह्य जग पाहूं शकाल. एकदां बागेची किल्ली स्वाधीन झाली म्हणजे हवे तेव्हां बाहेरही जातां येईल, तेथलीं बिरळ, शुष्क पाने, वाळलेल्या फांद्या, गतवर्षींच्या फुलांचे सुकलेले देंठ, हें सर्व पहातां येईल, यथेष्ट बाहेर जाऊन तेथला मासला पाहूं शकाल; कारण त्या बागेत तुमचा एकदांचा प्रवेश झालेला आहे व त्याठिकाणीं खऱ्या ज्ञानाचें, खऱ्या आनंदाचें निधान तुम्हांस सांपडलेलें आहे.

एवढयाचसाठीं पुनः सांगतो, कीं माझे अंगीं सामर्थ्य असतें, तर बलात्कारानें अगर अन्य उपयानें ओढीत मी तुम्हाला आंत नेलें असतें. कारण एकदां आंत दृष्टी गेली व तेथील सौंदर्याचें ओझरतेही दर्शन झाले कीं मग बाहेरच्या वस्तूंनीं कधीं तृप्ती होणार नाही. नेहमीं तुम्हांला अशी हुरहुर लागेल कीं आपलें दृष्टिक्षेत्र विशाल, व्यापक व उदात्तसुंदर व्हावें; व त्यासाठीं आंत खऱ्या वस्तूजवळ आपण जावें; कारण बाहेर भयाची भुतावळ जणुं खायला उठत असते ! त्या परमात्ममंदिरांत पाऊल मात्र पडूंद्या, की तत्क्षणींच तीं सर्व भये, तीं क्षुद्र कस्पटें, ते संशय, त्या भगभगी, ते घटकेचे क्लेश, तीं सर्व भुते कायमचीं गती घेतील. कारण तुमचा वास त्या आंतल्या जगतांत होईल. तेथे थोड्या शेलक्यांचा मात्र सहवास असतो. ते खरे क्लेशभोक्ते, खरे श्रद्धावंत, खरे देवशोधक, खरे जिज्ञासु असे असतात. त्या लोकीं तुम्हीं गेलें पाहिजे, कारण तोच एक अक्षय लोक आहे; आणि सत्यप्राप्ति तेथेंच होते. इतर लोकांत तुमचेहातून दुःख, अंधश्रद्धा, विचारहीन सिद्धान्त, इत्यादि असद्वस्तूंचे अरण्य मात्र निश्चयाने निर्माण होईल; तसें सर्वांचेच हातून होते. परंतु त्या आत्मलोकांत तुमचे विभक्त अस्तित्व नसतें; तुम्ही सर्व वस्तूंचे अंगभूत बनतां; लहानशा पानापासून तों प्रचंड वृक्षापर्यंत यच्चयावत् पदार्थांचे तुम्ही अंश बनतां; कां कीं, तुम्ही त्या विराट शरीराचे अंश आहां; आणि हे उद्यान, हें मंदिर, हें राज्य हें सर्व त्या परमात्म्याचेच आहे. तेथें सर्वांनी येऊन रहावें. येथें मी रहात आहें. तेथलीच एक अंतर्वाणी ऐकून आपलें सर्वांचे अंग पुलकित झालें पाहिजे. तें बाह्य जग पहा. आणि हें पहा; आणि त्यापेक्षां हें किती अधिक स्फूर्तिदायक, स्पृहणीय, साहसपूर्ण व आनंदमय आहे तें लक्ष्यांत आणा. पण ह्याचे प्राप्तीसाठं तुम्ही आपलें आपणाला शिक्षण दिलें पाहिजे, ती तुमची वाणी एकतान

झाली पाहिजे; निर्मळ व सतत बोलती केली पाहिजे. तरच ती तुम्हाला टोंचून टोंचून, त्या राज्यांत पोहोचेपर्यंत स्वस्थ बसूं देणार नाहीं. तें राज्य, किंवा उपवन ह्या लोकांतलेंच नव्हे तर समस्त लोकांतलें सौंदर्यनिधान आहे.

हें आतां माझें घर झालें आहे, माझें मूळ स्थान बनलें आहे; म्हणून मला वाटतें कीं तुम्हाला येथे माझेसंगतीं रहाण्यास आणावें, मला सांपडलेल्या निधानाचा वांटा तुम्हा प्रत्येकाला द्यावा. मी त्याचा स्वाद घेतला आहे तसा तुम्हीही एकदां त्याचा स्वाद स्वतः घेतलात, तर त्यानंतर तें तुम्हास अगदींच नष्ट असें कदापि होणार नाहीं; थोडा वेळ हातचें गेलें तरी पुनः मिळूं शकेल; परंतु तुम्ही जर त्याचा शोधच केला नाहीं, त्यासाठीं धडपडच केली नाहीं, तर ती काय वस्तु आहे, तिच्यांत कोणतें सामर्थ्य, कोणती उद्दीपक महदाकांक्षा, कोणता हर्षोन्माद सांठवलेला आहे, ह्याची तुम्हांला कल्पना तरी कशी व्हावी? तो सारा भावना व उमाळे यांचा फेस नव्हे; ते केवल–सत्य आहे, समस्त वस्तूंचें सत्त्व आहे. आणि म्हणूनच तें अत्यंत खरें, प्राणशक्तीनें मुसमुसलेले आहे. ह्याच कारणास्तव जर तुम्हाला महत्कार्यें कर्तव्य असतील, नवसृष्टी करायची असेल, उदात्त जीवनक्रम धरणें असेल, तर त्या राज्यांत, तुम्ही प्रवेश केलाच पाहिजे, त्या उद्यानांत वास करून तेथली शीतल छाया, अनेक पुष्पांचा सुगंध व अनेक भ्रमरांचा गुंजारव यांचे सेवन केलें पाहिजे. त्या उद्यानांत वास करणे ह्याचा अर्थ उत्तमोत्तम गुण धरणें, उत्कृष्टपणाच्या परमसीमेवर राहून उदात्त आचरण करणे. जे जे म्हणून उदात्त व शाश्वत–फलदायी कर्म आहे त्याचा उगम किंवा प्रेरणा त्या उद्यानाश्रमापासून, त्या राज्यांतून, त्या आदिकरणापासूनच होते. अशाश्वत, चंचल, क्षणिक स्वरूपाचे सर्व प्रयत्न, उद्योग, खटाटोप फसतात, अपेशी ठरतात. परंतु तुमच्या प्रत्येक कार्यावर जर त्या राज्याची मुद्रा असेल तर ते देवांना, मानवांना, ब्रह्मांडांतील सहस्र प्राणिकोटींना आदरणीय, संग्रहणीय होईल. कारण हें राज्य म्हणजे देव-देवांचा निजलोक, ध्येयांचे निजधाम, समस्त भावनांची व कर्मांची ही आदिभूमि !

तसेंच हें उद्यान, हा निवास हा शोधून काढावयाचा, त्याचा हेतु काय? हें तुम्ही आपलें आपण उमजलें पाहिजे. तें एकदां उमजलें म्हणजे तो स्वाधीन

राखण्यासाठीं त्याला कवटाळण्याची, धडपडण्याची आवश्यकता नाहीं. तो तुम्हाला सोडून दूर होणार नाहीं. 'आमच्या मूर्खपणाच्या कृत्यांनीं, क्षुद्र वासनांनीं, क्षुद्र विवंचनांनीं तो हातचा निसटेल, गुप्त होईल' असें भय धरण्याचें कारण नाहीं. कारण नितांत शांतीचेसमयीं, तसेंच महासंशयाचेही समयीं एखाद्या सुंदर देवमूर्तीप्रमाणें, किंवा दिव्यसुंदर दृष्टान्ताप्रमाणें, त्याची प्रतिमा परत येऊन तुम्हाला दर्शन देईल. ती तुमच्या जीवनचित्राची अचल पृष्ठभूमि होईल. त्या उपवनांत हवें तेव्हां ह्या मायेच्या बाजारांतून निसटून जाऊन तेथें विश्रांति घेतां येईल.

म्हणून तुम्ही आपलें आपणाला शोधून काढा. ती आत्मवाणी मेघगर्जनेसारखी गरजती करा. ती वाणी सिद्ध होईपर्यंत हृदयांत सहस्रावधि भयांचें व संशयांचें प्रलयतांडव होऊंद्या. ती वाणी गरजती होईतोंपर्यंत सुख, शांति, स्वास्थ्य, संतोष यांचें स्वप्नही पडतां कामा नये. त्या वाणीशिवाय इतर सर्व कांहीं असत् आहे. उत्तमांतलें उत्तम ध्येय तें हें. बुद्धीच्या साराचें सार हें!

तुम्ही पाहिलेंच असेल कीं आकाश निरभ्र असतांना, तळीं व इतर शांत उदकें, यांत प्रत्येक धांवत्या छायेचें, उडत्या पांखराचें, वायुलहरींवर तरंगत जाणाऱ्या अभ्रखंडाचें कसें स्वच्छ प्रतिबिंब पडतें. इतक्यांत एखादा जंतु त्या पाण्यावर येतो आणि पाणी हालवून सोडतो व तत्काळ तें प्रतिबिंब नष्ट होतें. पहा! तळ्याच्या पाण्यावरचा जंतु तो काय! पण तो जगताच्या प्रतिमेचें सौंदर्य नष्ट करतो. नंतर तो कोठें तरी निघून जातो; व मग पुन्हां उदक स्थिर व शांत होतें आणि ती प्रतिमा पूर्ववत् अगदीं स्वच्छ दिसूं लागते. तो सत्याची प्रतिमा विकृत करणारा जंतु तुम्ही दूर केला पाहिजे किंवा त्या नतद्रष्टाला निष्ठुरपणें ठार केलें पाहिजे. तो नतद्रष्ट जंतु कोण? तर आमची वेगळेपणाची भावना, आमचा अहंकार.

तें राज्य जसें अव्यंग व पूर्ण आहे, तसेंच त्याचें प्रतिबिंबही आमचे हृदयांत स्वच्छ व निर्दोष आहे अशी जाणीव व निश्चय जोंपर्यंत तुमचेठायीं आहे, किंबहुना तुम्ही स्वतःच तें प्रतिबिंब बनलां आहां, तोंपर्यंत कोणताही क्षुद्र जंतु, कोणतीही वावटळ तुमच्या जीवनाच्या शांत जलाशयांत क्षोभ उत्पन्न करूं शकणार नाहीं. तुम्ही आपला खरा आत्मा शोधून

काढला, तुम्हीं त्या निजराज्यांत निरंतर राहूं लागलां आणि परमगुरूला आपला नित्य सहचर बनाविलें, असें सर्व झालें म्हणजे मात्र त्या राज्याच्या पावित्र्याची प्रतिमा तुमच्याठायीं उमटेल. त्याच वेळीं तुमच्या हृदयांत केवल-शांति नांदूं लागेल- ती शांति, जिच्या पोटीं अपार सामर्थ्य व शक्ति उत्पन्न होते, ती नांदूं लागेल; कारण तुम्ही आपण आपणाला शोधून काढलें आहां, आणि शाश्वत, अक्षय व संपादण्यास योग्य अशा वस्तूंचा सहवास जोडला आहां. माझी उत्कट इच्छा आहे कीं मी तुम्हाला कार्योद्युक्त करावें, असें कीं, नवसृष्टी करणे, ध्यानाचीं स्वप्नें पहाणे, ज्ञानप्रकाश घेऊन आत्म-जीवनानें जगणें या गोष्टी तुमच्या हातून घडतील. परंतु त्यासाठीं आधीं तुम्ही स्वतःच आळस झाडून उठा; आपण आपणावर अंकुश चालवा; अंकुशाचीं टोंचणी लागेल तेव्हांच ती वाणी ऐकूं येईल. ती वाणी जितकी अधिक जोरानें गर्जेल तितके तुमचें चरित्र अधिक उदात्त होईल, तुमचें सामर्थ्य अधिक वृद्धिंगत होईल आणि त्या उपवनांत, त्या सुखाच्या राज्यांत प्रवेश करण्याची तुमची आकांक्षा अधिक बलवत्तर होईल.

---

## [ १२ ]

# नित्य सहचर



मेघगर्जनेच्या पोटीं केवढी प्रचंड शक्ति असते, केवढी भीति आणि रहस्य भरलेले असतें! समर्थ पुरुषाच्या अंतरंगांतील वाणी‡ त्या गर्जनेसारखी असते. मेघांच्या निनादाचा कंदुक एक गिरिशिखर उचलून घेते आणि दुस-

‡ अगदीं पहिल्या पानावर जी अंतस्थ गुरूची वाणी म्हणून सांगितली ( जो अंतर्यामींचा सुलतान म्हणून सांगितला ) तीच येथें सांगितलेली आहे. ठिकठिकाणीं या आंतल्या वाणीचा उल्लेख ग्रंथांत केलेला आहे हें वाचक समजतीलच. —भाषांतरकार.

त्याचे अंगावर फेंकतें; ते तो झेलते आणि तिसऱ्याकडे झोंकतें. अशी त्या निनादाची फेकाझेली दीर्घकाल चालते. तद्वत् ती आंतली वाणी, अंतर्यामींचे जे आमचे राजाधिराज, आमचे शासनकर्ते, आमचे मार्गदर्शक, आमचे मित्र, त्यांची ती वाणी होय. पण ती कोणाच्या हृदयांत गरजते? तर त्यांच्याच हृदयांत, कीं जे त्या केवळ सत्याचे, स्वतः निर्मिलेल्या सत्याचे अनुयायी बनले आहेत. तो गिरिराज पहा. तो जणुं घनीभूत शक्तीचा महामेरू आहे. काय त्याचे सामर्थ्य, काय वैभव, काय राजैश्वर्य! थेट तसेंच ऐश्वर्य त्या महानुभाव पुरुषाचें होय, कीं ज्याने निजात्मा प्राप्त करून घेतला, ज्यानें आपलें ध्येय निर्माण केलें, आणि जो त्या ध्येयाचा मर्गा धीरगंभीर गतीने चालूं लागला. तोच पुरुष श्रेष्ठ, तोच वंद्य; तोच लोकनायक पदाला पात्र. त्याचे काम नवध्येय निर्माण करणें हे होय. पर्वतशिखरावर जेथें विद्युल्लतेचा संचार अतिशय असतो तेथे तिच्या रुद्रतांडवाचे, भीषण हर्षाचे भोक्ते केवळ ते समर्थ पुरुषच होत. परंतु सपाटीवर व दऱ्याखोऱ्यांत रहाणाऱ्या अशक्ताचे हृदयांतही त्या समर्थांनीं नवशक्तीची प्रेरणा केली पाहिजे. ज्याचा सारा जन्म सपाटीवर गेला, त्या दुबळ्याला विद्युन्मेघाच्या गर्जनेंत दिव्य सौंदर्य कसे दिसावें, देवसंदेश कसा ऐकू यावा, म्हणून तो उल्लासाचा पुतळा, तो समर्थ पुरुषच लोकनायक होय. कारण, त्याला त्या भीषण शक्तीच्या व सामर्थ्याचेद्वारे दिव्य सौंदर्यदर्शन होते, आणि तें सौंदर्य, ते सामर्थ्य, ती शक्ती, ती वाणी संदेश सांगते की,— 'वत्सा, तुझा शोध संपत आला, आणि अतःपर तुझे नवजीवनास प्रारंभ झाला.' त्या समर्थांचा उल्लासविलास कसा असावा? तीं डोलतीं तरुशिखरें पहा, त्या कोमल उपशाखा पहा, त्या विरल ललित पल्लवावलीव दृष्टि द्या. जी जी वायुलहरी येते ती त्यांच्याशीं खेळल्यावांचून पुढें जात नाहीं. सूर्याचे किरण येतात, त्यांच्याशीं बागडत बसतात. त्या प्रकाशांत, स्वर्गाचे सन्निध असल्याच्या गर्वानंदाने उन्मत्त होऊन ते लबाड पल्लव कसे नाचतात पहा! त्यांचे ठायीं सायास, शीण यांचें चिन्हमात्र नाहीं. प्राणशक्ती त्यांच्या अंगांतून मुसमुसत आहेना, तथापि ते किती मृदु आहेत! विरोध, प्रतिकार त्यांचे गांवींही नाहीं. बेट्यांना आपल्या त्या मुळांची जाणीव तरी आहे? तरी तीं मुळेंच त्यांना शक्तिजीवनरस पोहोंचवितात. स्वतः विचारी पृथ्वीच्या कठिण पोटांत खणीत, दूर खोल

जातात, अधिकच कष्ट सोसतात; कशासाठीं? तर त्या उंच, त्या गगनचुंबित शाखांना पुष्टितुष्टि मिळावी, त्यांचा रंग लाल रहावा म्हणून. असे बळ, असे सतत कष्टण्याचें सामर्थ्य, नवसृष्टी निर्माण करण्यासाठीं प्राणशक्ति पुरविणारा असा सांठा, हेच ते सुखाचे साम्राज्य. अशी शक्ति आणि असा उल्हास, असे कष्टण्याचे, झगडण्याचे सामर्थ्य, आणि अशा ससारात रगल्यासारखी आनंदवृत्ति, इतका देहविस्तार असूनही अव्यंग आकृतिसौष्ठव; हे ज्याला लाभले, त्याला अंतर्यामीं एक **नित्य सहचर** लाभला असें समजा. असा पुरुष कोठेंही असो, कोठेंही बसो, एकाकीपणा, एकटेच पडल्याची खंती त्याला कधीं शिवणार नाहीं. तसेंच कोणत्याही विकाराचा, भावनेचा, अतिरेक त्याचेठायीं दिसणार नाहीं. तो आनंदाने, मध्यमवृत्तीच्या* सरळ वाटेने त्या सुखस्वर्गाच्या गांवाला जातो. आणि तेव्हां त्याला एक अपूर्व अनुभव येतो. तो अनुभव अनेक श्रीकृष्णभक्तांनाच आलेला आहे. श्रीकृष्णपरमात्मा आपल्याला अनन्यसखा मिळावा, सहचर मिळावा ही प्रत्येकाची जीवितकामना; आपण त्याचे संनिध असावे ही जीवींची अक्षय उत्कंठा; तिच्या जोरावर तो प्रत्येकास प्राप्त झाला. जिवाचा जिवलग, आनंदाचा कंद, संसाराचा विसर असा तो झाला. प्रत्येक भक्ताचे उन्नतीनुरुप, त्याच्या मनाच्या व अंतःकरणाच्या विकासानुरुप तो त्यास वेगवेगळा दिसला. भक्ताने हौस धरावी आणि देवानें ती पुरवावी असे झाले. भक्तांनीं जे जे बनवले ते ते तो बनला—पूज्य देव म्हणा, साधा मित्र म्हणा, रासक्रीडेला अचपळ नट म्हणा, सुस्त सोबती म्हणा, महान सृष्टिकर्ता म्हणा वा दुर्बल संहारकर्ता म्हणा, असा तो त्यांस दिसला. त्याच्या भक्तांचीं दुःखितहृदयें त्याच्या चरित्रांतील नवजीवनानें टवटवीत झालीं, व मनांत ह्या भक्तांनीं जी उत्कंठा धरिली तसें त्याचें बाह्यरूप झाले!

तसाच अनुभव आम्हांला येईल. आम्ही ज्यास शोधीत आहो तो स्वानंदसाम्राज्याची केवल मूर्तिच होय! जसा आमचा संकल्प, जशी

* "आश्रयेन्मध्यमां वृत्तिम् अति सर्वत्र वर्जयेत्" या अर्थानें "मध्यमवृत्ति" हा शब्द योजलेला आहे. या बाजूचा अतिरेक नको, त्याही बाजूचा अतिरेक नको; कारण अतिरेक हा दोष; मध्य न सोडणें हा गुण. येथील मूळ शब्द Middle Path असा आहे. —भषांतरकार.

आमची भावना तसें तो आम्हाला दर्शन देईल. जसे आम्ही तसा तो. आम्ही जसें बनवूं तसा तो बनेल. ह्यास्तव आज आम्ही उत्क्रान्तीच्या कोणत्याही भूमिकेवर असलो तरी चिंता नाहीं, केवळ त्याचा समागम व्हावा, त्याचें ज्ञान व्हावे, त्याचेठायीं सुखसोहळा भोगावा, अशी उत्कट उत्कंठा, आकांक्षा, कामना, हृदयभरून असावी म्हणजे पुरे! नर-जन्मांत जिवाच्या जिव्हाळ्याचे सत्य हें एकच! तो अखिलविश्वमूर्ति आहे. हें साध्यांत साधे सत्य आपण खरोखरी अंतःकरणानें जाणलें म्हणजे आपण त्याचे अक्षय सहचर बनलों! पण प्रथम ती कामना, ती उदंड उत्कंठा, ती जिवाची ज्वलना, आपलेठायीं उत्पन्न झाली पाहिजे; नंतर तें उद्यान शोधून काढलें पाहिजे; आणि नंतर त्या मंदीरांत त्या कालातीत सकल प्रियतमाची इष्ट प्रतिमा निर्मून, तिची प्राणप्रतिष्ठा केली पाहिजे.

गेले कित्येक महिने मी असा अभ्यास चालविला आहे कीं सर्व बस्तूंत त्याला पहायचें, त्याच्याद्वारे सर्व बस्तु पहावयाच्या. माझे नेत्र ते त्याचे नेत्र; लहान थोर, जिवत मृत, सर्व बस्तुमात्राकडे त्याच्या नेत्रांनीं बघायचें. ही प्रवृत्ति बळावतां बळावतां आतां ती माझा केवळ प्राणश्वास बनली आहे. आणि भरतखंडांतील प्राचीन योग्यांप्रमाणे, किंवा इतरत्र झालेल्या मुमुक्षूंप्रमाणे, ज्यांनीं त्याचा खरोखरी शोध केला, त्याकरितां क्लेश सोसले अशा मुमुक्षूंप्रमाणें, मला अनुभव येऊन त्या परमगुरूची मला प्राप्ति झालेली आहे. आणि त्या घटकेपासून सदैव मी त्या अनेकपुष्प-शोभित, अनेकगंधसुगंधित उपबनांत बास करीत आहें. मी आनंदमय असून तो सुबासिक बायु सेबीत आहें. तो गंधबात मला अमित अभिबृद्धि, शक्ति, सामर्थ्य आणि मन-हृदय-जीव यांना नवजीवन देत आहे. आणि हें अपार ऐश्वर्य प्राप्त झाल्यामुळें यत्किंचित्‌ही कांहीं मागें न राखतां, मुक्तहस्ताने सर्वस्वदान हेच केवळ एक कर्तव्य मला उरलें आहे.

थोडे दिवस झाले, मी एकदां फिरायला गेलों होतो. बरोबर जोडी-दार अर्थात् माझा तो नित्य सहचर होता. कांहीं बेळ चालल्याबर मी एका झाडाखालीं बसलों. मनांत एक हाच नित्याचा निदिध्यास चालला होता; दुसरा कोणताही बिचारतरंग नव्हता. आणि पहातां पहातां स्वारी, आसन घालून बसलेली, अगदी माझेपुढेच प्रकट झाली. आणखी सकलसृष्टि

महाराजांची पूजाअर्चा कशी करीत आहे तोही चमत्कार दृष्टीस पडला. मोठे वृक्ष, वायूच्या लहरी व गवताच्या पात्या सर्व त्याची पूजा करीत होत्या. पहातां पहातां अंगांत सामर्थ्याचें वारें भरूं लागलें, आनंद चढूं लागला, सर्वांग थरथर कंपायमान झाले; आणि काय कसें होत आहे हेंही न कळतां अचानक वृत्ति केवळ तदाकार बनली. मी त्याचा अंगभूत आहें, भिन्नभाव नाहींसा झाला आहे असा साक्षात्कार झाला. तो वेगळा सहचर कोठें आहे तें शोधून सांपडेना. त्याचेपासून, त्या अक्षयवस्तूपासून मला वेगळें होतां येईना. आणि जेव्हां त्याच्याच वायूचा संथ श्वासोच्छ्वास मी करीत आहें हें मला समजलें, तेव्हां हृदयाला पुरेंपुरें पटलें कीं स्वसुखराज्यांत रहाणें म्हणजे काय, आणि त्या उद्यानांतील वृक्षछायेंत क्रीडा करण्यांत काय भरलेलें आहे ! तीं फुलें आणि त्या वाटेचे इतर वाटसरू यांचेकडे पहाण्याची काय मौज आहे तें मी जाणलें. त्याला शोधणारे, दुःख भोगणारे, सुख भोगणारे सर्व त्याचे अंगभूत आहेत, अक्षय त्याचेच आहेत असें दिसलें; त्याच्या हृदयांत माझें आसन बसल्यामुळें मला समजून आली. आणि ह्याच कारणास्तव आपल्यांपैकीं ज्यांना सत्याची ती प्रचंड पिपासा लागली असेल, त्यांनीं हें समजलें पाहिजे कीं तो जो केवळ सत्यावतार, त्याविरहित समजूत होणें नाहीं, आणि आत्मविजयही होणें नाहीं. आणखी, त्याची स्थापना आपण आपल्या जीवनकमलाच्या कर्णिकेचे स्थानीं केली पाहिजे; म्हणजे मग अग्निज्वाळेपासून जसे स्फुलिंग उडता तसें त्या मुख्य केंद्रापासून आपणाला बाहेर यथेष्ट संचार करतां येईल.

त्या स्थितींत अपरिचित, अनियमित, किंवा अनैसर्गिक कांहींच नाहीं. अशा त्या आनंदस्थितींत मी असें पाहिलें कीं तें स्वानंदसाम्राज्य आणि मी ह्यांमध्यें भिंत नाहींच; त्या पवित्रांत पवित्र वस्तूपुढचीं समस्त पटलें मी दूर सारलीं आहेत; मी त्या उपवनांत प्रवेश केलेला आहे आणि त्या परमात्ममूर्तीला आच्छादणारे, दृष्टीआड करणारे, विकृत करणारे सर्व पडदे फाडून, भिरकावून दिलेले आहेत. आतां तुम्हाला जर माझेमागे येणें असेल—पण पुनः एकदां पक्कें उमजून ठेवा कीं माझेमागें येणें म्हणजे अंधळ्याचे मालिकेंत चालणें नव्हे—असें येणें असेल तर चला या, आपण सोबती होऊं या. आणि तें मंत्रित उद्यान, तें सुखस्वराज्य, तो अक्षयतेचा निवास,

आणि त्यांतील पवित्राणां पवित्रम् देवाची मूर्ति यांचें दिव्य दर्शन मी तुम्हाला करवीन. पण त्याला आधीं तुमचे डोळे उघडले पाहिजेत. तुमचें मन सुशिक्षित, सुसंस्कृत बनलें पाहिजे, त्याला थोरपणानें निर्णय करतां आला पाहिजे. तुमचें हृदय त्या अपार प्रेमानें, त्या व्यक्तिसंगरहित प्रेमाने, ज्या प्रेमाला मर्यादा, दुराग्रह व भेद माहीत नाहींत, अशा प्रेमानें भरलें पाहिजे. तुमच्या अंगीं कष्टण्याचें सामर्थ्य आलें पाहिजे; थोराशीं थोर, लहानाशीं लहान होण्याचा बहुरूपीपणा आला पाहिजे; उत्तुंग शिखरावर चढण्यास सिद्ध, खरखीत सहारांत खडायला सिद्ध, अशी सिद्धता आली पाहिजे; थोर मोहाला आंत थारा देईल असा जीव सज्ज केला पाहिजे; पुष्कळ भयें अंतःकरणास जाणविलीं असलीं पाहिजेत, अल्प-संतोष सोडला पाहिजे; आणि सगळ्यांत महत्त्वाची गोष्ट ही कीं, अगणित अनुभवांच्या संस्कारानें मन-बुद्धि खरी थोर बनलेली पाहिजे. तिला त्या उपवनाविहाराच्या रमणीयतेची अभिरुचि, म्हणजेच आत्मजीवनाचा जिव्हाळा लागला पाहिजे. आणि असे तुम्ही जर माझेमागून त्या उपवनांत याल, तेथें ती सद्वस्तु शोधाल, तर तुम्हाला तें साधें सत्य तेथें सांपडेल; पवित्रांत पवित्र, मधुरांत मधुर, श्रेष्ठांत श्रेष्ठ असें देवाचें अमृत तुम्हास सांपडेल; एक सद्वस्तु ती तीच, पूज्यतम एक देवाचें देऊळ तें तेंच, तीच सर्व ग्रंथांची समाप्ति.

हें सोप्यांत सोपें सत्य; तथापि हें अगणित अनुभव, उन्नत प्रेमानंद, अलोट भक्ति यांविण लाभणें नाहीं. एकदां सांपडल्यावर मात्र, ऊन-वारा-पाऊस, आधि-व्याधि, दुःखदैन्य ह्या सर्वांपासून सुरक्षित, पक्का व निश्चयाचा आश्रय हाच एक होय. आणि ह्याची प्राप्ति झाली म्हणजे संशय अनि-श्चितपणाचें कारणच नाहीं; कां कीं तुम्ही स्वतःच सिद्ध व्हाल, अनेकांचे आदर्श व सहाय्यक व्हाल. तुम्ही वाटेवरचे खुणेचे खांब व्हाल, व जे अजून अंधारांत ठेंचा खात धडपडत असतील, ज्यांना कांहीं दिसत नसेल, त्यांना तुम्ही वाट दाखवाल. एकदां अक्षयशांतीच्या मार्गानें आपण तें सुखस्वराज्य गांठलें म्हणजे भेदभाव, एकाकीपणा, निजलाभाचा संशय इत्यादिकांचें नांवही उरत नाहीं. ती पूर्णता, तो प्रज्ञाप्रकाश, आणि इतर यच्चयावत् चिरवांछित वस्तु, तुम्हीच निजरूपीं होऊन असतां. तुम्ही त्या

मार्गानें चालूं लागलां, त्या उपवनांत विहरूं लागलां, ऊन प्रखर पडेल तेव्हां तेथील शीतल छायेत विसाव्यास येऊं लागलां, म्हणजे आपण सर्व मित्र, झालोंच, सर्व अक्षयतेचे सवंगडी झालोच. नंतर आपण सर्वच त्या पवित्रांत पवित्र देवाच्या नमुन्यानुसार मूर्ति करणारे होऊ. एकदां तुम्ही ही सुधा, ही संजीवनी प्राशन करा म्हणजे ती तुम्हाला अक्षय यौवन देईल. पूर्वी तुम्ही असंख्य अनुभव घेतले असले, अमर्याद अश्रु ढाळले असले, आनंद, दुःखे सोसलेलीं असलीं तरी अतःपर तुमचे अंतरात्म्यांत आनंदामृताचा झरा कुंड भरून निरंतर वहात उसळत रहाणार. तुमचें हृदय, अंधाऱ्या रात्रीं चमकणाऱ्या ताऱ्याप्रमाणे नित्य तरुण व उल्लासमय रहाणार, कारण तुमचेठायीं सर्व ज्ञान एकीकृत झालें; आणि सत्याचा लोप, सत्याची विडंबना करणारा जो अहंभाव राक्षस तो तुम्हीं निर्दाळून टाकला.

तेव्हां आतां शेवटचें सांगणे—तुम्ही सर्वांना, तुम्हाला माझेमागें येणें असेल तर—तुम्ही सर्वांनी त्या अक्षयतेच्या उद्यानाचे दरवाजापाशीं यावे, तुम्ही स्वतः व तें अक्षयतेचें उद्यान या दोहोमध्यें उभ्या असलेल्या दरवाजापाशीं यावे. चला तर तेथें. तेथें पोहोचल्यावर तुम्हाला पुष्कळ किल्ल्या सांपडतील. एकेकाने एकेक किल्ली घ्यावी आणि आंत प्रवेश करावा. परंतु त्या स्वानंद-साम्राज्यांत प्रवेश होण्याला, अगोदर तुमचे अंगी अलोट उत्साह व अपरिमित उल्लास भरला असला पाहिजे. नंतर तुम्हाला अनुभव येईल कीं तुम्ही सिद्ध, जीवन्मुक्त झालां आहां. 'बीज भाजुनि केली लाही, जन्म मरण आम्हां नाहीं.' तेथें तुम्हाला तो ब्रह्मनिवास, ते शाश्वत सत्य, प्राप्त होईल. तेथे जीवभाव, अहंभाव हरपेल; आणि तुम्ही इतरजनार्थ नवसृष्टी, नवे लोक, नवे निवास निर्माण करीत रहाल!



शांतिः शांतिः शांतिः.

# सत्याचें उगमस्थान

## कोठें असतें ?

भाषांतरकार

रा. रा. शिवराम नारायण कानविंदे, बी. ए., मुंबई

# दोन शब्द



प्रस्तुत पुस्तकांत 'आनंदाचें साम्राज्य' नांवाचीं जीं कृष्णाजींचीं व्याख्यानें ह्या पूर्वीं येऊन गेलीं आहेत त्यानंतरचें हें व्याख्यान आहे. तें हॉलंड देशांत एर्डे येथें तारीख २ ऑगस्ट १९२७ रोजीं झालें. मी व माझा आत्मसखा एक झालों आहों, मानवी उत्क्रांतीचें गिरिशिखर मी कायमचें गांठलें आहे असें जाहीर व स्पष्ट विधान कृष्णाजींच्या ह्याच व्याख्यानांत प्रथम आढळतें. या व्याख्यानानंतर तें विधान त्यांनीं अनेकवार व अनेक ठिकाणीं केलें आहे. कृष्णाजींचा हा जो नवीन अधिकार, ज्या अधिकारास अनुलक्षून डॉ. बेझंट या म्हणत आहेत कीं कृष्णाजी व जगद्गुरु यांची जाणीव एक झाली आहे, त्या अधिकाराचा संपूर्ण अर्थ काय, कृष्णाजी ज्यास आत्मसखा म्हणतात, ज्या आत्मसख्याशीं ते एकरूप झाले आहेत तो हृदयसखा कोण, हे प्रश्न महत्त्वाचे असून समजण्यास कठीण आहेत. १९२७ च्या ऑगस्ट महिन्यांत कृष्णाजींच्या सभोंवतीं नाना देशाचे लोक गोळा झालेले होते. त्यांस ह्या वरील प्रश्नाचा नीट उलगडा होईना. ज्या अधिकाराची आपण अपेक्षा करीत होतों तो कृष्णाजींस प्राप्त झाला आहे, तेव्हां आतां आपण लोकांस काय सांगावें, कृष्णाजींचें कार्य आपण आतां जगांत यापुढें कसें करावें वगैरे प्रश्नांच्या विवंचना त्या लोकांच्या मनांत होत्या. त्यांचा उलगडा करण्यासाठीं कृष्णाजींनीं हें व्याख्यान दिलें आहे. त्याचें मराठी रूपांतर रा. रा. शिवराम नारायण कानविंदे, बी.ए. यांनीं आम्हांस करून दिलें याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोंत. या व्याख्यानांत The Beloved म्हणून जो इंग्रजी शब्द आला आहे त्याचें भाषांतर बहुशः 'आत्मसखा' असें मराठींत करण्यांत आलें आहे. कधीं कधीं "हृदयसखा" "प्रियतम" असेही शब्द योजलेले आढळतील.

या व्याख्यानाचें इंग्रजी नांव Who Brings the Truth असें आहे. तदनुसार "सत्याचें उगमस्थान कोठें असतें?" असें मराठी नांव आम्ही या व्याख्यानास देत आहों. जो हें व्याख्यान मननपूर्वक वाचील त्याला कळून येईल कीं "सत्याचें उगमस्थान कोठें असतें?" हा जो व्याख्यानाच्या शिरोभागींचा प्रश्न, त्याचें उत्तर खोल असून माणसाला सत्य बाहेरून मिळत नाहीं, त्याचें उगमस्थान त्याच्याच हृदयगव्हरांत असतें असें सांगण्याचा कृष्णाजींचा आशय आहे.

राजाराम सखाराम भागवत.

# सत्याचें उगमस्थान
## कोठें असतें ?



अलीकडे कांहीं वर्षें मी स्वतंत्रपणें विचार करित असतों. प्रथम जेव्हां मी अशा रीतीनें विचार करूं लागलों तेव्हांच माझें मन बंडखोर बनल्याचें मला दिसून आलें. कोणाचीही वाणी,—ती कितीही अधिकारयुक्त असली तरी—ती खरी मानण्यांत मला समाधान वाटत नसे. जगद्गुरू कसा असला पाहिजे व त्याच्या स्वरूपाच्या मुळाशीं काय सत्य असलें पाहिजे हें माझें मीच शोधून काढावें असें मला वाटे. मी स्वतंत्र विचार करूं लागण्या-पूर्वीं—किंवा असा विचार करण्याची मला पात्रता येण्यापूर्वीं—मी, कृष्णमूर्ति हा जगद्गुरूच्या अवताराचें अधिष्ठान आहें असें समजून चाललों होतों; कारण बरेच लोक तसें म्हणत असत. पण मला विचार करण्याची योग्यता आल्यावर, जगद्गुरू म्हणजे काय, तो मानवी देहाचा आधार घेतो तो कसा, जगांत त्याची अभिव्यक्ती होणें म्हणजे काय, हें शोधून काढण्याची मला स्वतःला इच्छा झाली.

मी या बाबतींत आज माझी विचारसरणी संदिग्धच ठेवणार आहें; कारण, जरी मला हा विषय अगदीं स्पष्ट सांगणें सोपें असलें तरी मी तसें करूं इच्छित नाहीं. कोणतीही गोष्ट स्पष्ट करून विशिष्ट स्वरूपांत मांडली म्हणजे तींतील प्राण निघून जात असतो. निदान माझें तरी असें म्हणणें आहे कीं, एखादी गोष्ट स्पष्ट करणें म्हणजे तिचा एक विशिष्ट प्रकारचा अर्थ करणें होय. मग हा विशिष्ट अर्थ लोकांच्या मनांत एक स्वरूप धारण करितो, त्या स्वरूपांत त्यांचीं मनें अडकून रहात असतात, आणि सरतेशेवटीं त्यांस त्या स्वरूपांतून बाहेर पडणें अवश्य होत असतें.

मी आज जें सांगणार आहें तें कांहीं अधिकारानें सांगत नाहीं. मला प्रमाण मानून सांगकाम्याप्रमाणें तुम्ही वागावें असा माझा आशय नाहीं. माझें म्हणणें तुम्ही स्वतः समजून घ्यावयास पाहिजे आहे. हा भाग

"बाबावाक्यं प्रमाणम्" या न्यायानें डोळे झांकून अनुसरण्याचा नाहीं. तुम्हांपैकीं बरेचजण अशी अपेक्षा करून असतील कीं, मी अमुक एक दंडक घालून द्यावा, मी म्हणावें कीं 'मी अमुक अमुक आहें' आणि लगेच तुम्ही म्हणावें कीं, 'ठीक आहे, आम्ही तुमच्यासाठीं तुमचें कार्य करण्यास तयार आहों;' परंतु असली तुमची अपेक्षा पुरी करण्यासाठीं माझें हें विवरण नाहीं. आपण एकमेकांचें काय म्हणणें आहे हें पुरतेपणीं उमजावें व मग एकमेकांना मदत करावी एवढ्यासाठींच मी बोलत आहें. ज्या गोष्टी ह्या जन्मीं पुढें केव्हां तरी किंवा कदाचित् पुढच्या एखाद्या जन्मीं तुमच्या ध्यानांत यावयाच्या त्या आज तुम्हांला उमजाव्या असा माझा प्रयत्न आहे.

जेव्हां मी लहान होतों, तेव्हां हातांत मुरली घेतलेलें श्रीकृष्णाचें चित्र, हिंदु लोक काढतात तसलें—वारंवार माझ्या पहाण्यांत येत असे; कारण माझी आई श्रीकृष्णाची भक्त होती. ती मला नेहमीं श्रीकृष्णासंबंधानें गोष्टी सांगावयाची. त्यामुळें मोठ्या भक्तीनें, मोठ्या प्रेमानें, मोठ्या आनंदानें, त्याचें गुणवर्णन करीत, हातांत मुरली घेतलेलें श्रीकृष्णाचें ध्यान मी मनांत धरूं लागलों. हिंदुस्थानांतील मुलांमुलींना श्रीकृष्णचरित्राची किती हौस वाटते याची तुम्हांला कल्पना नाहीं. तशी मला हौस वाटत असे. मी कांहींसा मोठा झाल्यावर जेव्हां माझी थिऑसॉफिकल सोसायटीशीं व बिशप लेडबीटर यांशीं गांठ पडली तेव्हां त्यांच्या दृष्टीनें खऱ्या अशा ज्या स्वरूपांत गुरुदेव कुठुमी यांची मूर्ती माझ्यापुढें आली त्या स्वरूपांत मला गुरुदेव कुठुमी ( मास्टर के. एच्. ) दिसूं लागले व तेंच माझें ध्येय होऊन बसलें. नंतर, मी आणखी कांहीं मोठा झाल्यावर भगवान् मैत्रेयांचें मला दर्शन होऊं लागलें. ही गोष्ट दोन वर्षांपूर्वीं घडली व त्यांचें दर्शन, जें स्वरूप माझ्यापुढें मांडण्यांत आलें होतें, त्या स्वरूपांत मला होऊं लागलें. मी अधिकारी पुरुष आहें असें तुम्हांस भासवण्यासाठीं अगर तुमच्या मनांत अमुक एक तऱ्हेची श्रद्धा उत्पन्न करण्यासाठीं हा वृत्तान्त मी तुम्हांस सांगत नसून तुमच्या स्वतःच्याच विचारांस, आकांक्षांस, अंतःकरणास व श्रद्धेस बळकटी आणण्यासाठीं हें सांगत आहें. मला सत्यान्वेषणार्थ सारखी धडपड करावी लागलेली आहे. दुसऱ्याचें मत प्रमाण धरून अथवा दुसऱ्याच्या प्रेरणेनें अगर आज्ञेनें चालण्यांत समाधान न

मानल्यामुळें, ती धडपड मला करावी लागली. मला स्वतःला तें ज्ञान मिळवायाचें होतें. साहजिकच कष्टाशिवाय तें साध्य नव्हतें. अलीकडे अलीकडे बुद्धदेवांचें मला दर्शन घडत आहे व त्यांच्या सहवासांत रहाण्याचें भाग्य व आनंद हीं मला प्राप्त झालीं आहेत. मी " आत्मसखा " म्हणून ज्याला म्हणतों तो कोण, असा मला जो प्रश्न विचारण्यांत येतो त्याचा मी उलगडा करून सांगतों; मग तुम्ही त्याचा वाटेल तसा अर्थ करा. तो आत्मसखा म्हणजे माझें सर्वस्व आहे. तो श्रीकृष्ण आहे, मास्टर के. एच्. आहे, भगवान् मैत्रेय आहे, आणि बुद्धदेव आहे; व हें सर्व असूनही ह्या स्वरूपांच्यापलीकडचा तो आहे. त्याला कोणतेंही नांव द्या, त्याचें महत्त्व नाहीं. 'जगद्‌गुरु' या नांवासंबंधाचा तुम्ही वाद करीत आहां, परंतु जनतेला जगद्‌गुरूंची माहिती कुठें आहे? आम्हांपैकीं कांहीं जण व्यक्तिशः त्यांना जाणतात. काहीं जण, दुसरे म्हणतात म्हणून ते आहेत असें मानतात. कांहीं जणांना या बाबतींत स्वतःचा अनुभव व ज्ञान असतें. एकंदरींत हा वैयक्तिक प्रश्न झाला. सर्वसाधारण जनता त्या प्रश्नाच्या पंचायतींत पडणार नाहींत. 'जगद्‌गुरु' म्हणून कोणी आहेत कीं नाहींत व कृष्णमूर्ति म्हणून जी एक व्यक्ति आहे तिच्यांत जगद्‌गुरु संचार करीत आहेत कीं काय हा प्रश्न सोडवीत तुम्हीं बसलां आहां. जगांत कोणी या प्रश्नांत डोकें घालणार नाहीं. यावरून माझ्या " आत्मसख्या " संबंधानें बोलतांना माझा दृष्टिकोन काय असतो हें तुमच्या ध्यानांत येईल. हें विशद करून सांगण्याची पाळी यावी हें दुर्दैव होय; पण तें सांगितल्याशिवाय गत्यंतर नाहीं. तें होईल तितकें संदिग्ध शब्दांत सांगावें अशी माझी इच्छा होती; व त्याप्रमाणें मी तें सांगितलें आहे. माझा " आत्मसखा, माझा हृदयसखा, माझा प्रियतम " म्हणजे हें अफाट उघडें आकाश, होय, हीं डोळ्यांस दिसणारीं फुलें होत, प्रत्येक मानवी व्यक्ति होय.

मी विचार केला कीं, या सर्व सद्‌गुरूंशीं माझें तादात्म्य जोंवर झालें नाहीं, तोंवर ते एकच आहेत किंवा कसें या प्रश्नाचा विचार महत्त्वाचा नाहीं. तोंपर्यंत, श्रीकृष्ण, खाइस्ट, व भगवान मैत्रेय, हे एक आहेत कीं नाहींत या प्रश्नाच्या उहापोहामुळें अडलेलें नाहीं. मी मनांत विचार केला कीं जोंपर्यंत हे सर्व मला माझ्याबाहेर दिसतात, चित्रांतल्यासारखे दिसतात,

बाह्य वस्तूसारखे दिसतात तोंपर्यंत मी त्यांच्यापासून वेगळा रहाणार, त्या केंद्रापासून दूर असणार; पण एकदां माझे अंगांत ती पात्रता आली, तें बळ आलें, माझ्या हृदयांत त्या निश्चयानें ठाणें दिलें, माझ्या भावना शुद्ध आणि थोर झाल्या, म्हणजे त्यांच्या व माझ्यामध्यें असलेलें अंतर, तें भिन्नत्व निघून जाईल. हें अंतर नाश पावेतोंपर्यंत, हें भिन्नत्व वितळेपर्यंत मला चैन नाहींसें झालें. वृत्तीची खळबळ न उडतां अगर इतरांची खातरी करण्यासाठी तिखटमीठ लावण्याचें कारण न पडतां, माझ्या आत्मसख्याशीं मी तादात्म्य पावून, तसें मला आत्मविश्वासानें सांगतां येईपर्यंत मी कधीं हा विषय बोललोच नाहीं, लोकांस गोड वाटणाऱ्या संदिग्ध व सामान्य गोष्टी मी सांगितल्या असतील पण मी स्वतः जगद्गुरु आहें असें मी कधींच म्हणालों नाहीं. आतां मात्र माझ्या हृदयसख्याशीं तादात्म्य पावल्याचा मला प्रत्यय येत असल्यामुळें मीं तसें म्हणत आहे. यांत तुम्ही मला प्रमाण मानून चालावें, किंवा माझ्या अथवा जगद्गुरूंच्या मोठेपणाविषयीं तुमची खातरी व्हावी, हा, किंवा जीवनाच्या मूळाशीं असलेल्या सुंदर तत्त्वाचा अथवा साधेपणाचा तुमच्या मनावर ठसा उमटावा हासुद्धां माझा हेतु नाहीं. सत्यान्वेषणाची लालसा तुमची तुमच्यांत उत्पन्न व्हावी, त्याची तुमच्या स्वतःच्या मनांत उत्कट इच्छा जन्मास यावी, एवढाच माझा हेतु आहे. माझ्या आत्मसख्याशीं मी एकरूप झालों आहें असें जर मी आज म्हणत असेन–आणि मी तसें म्हणत आहें–तर मला ती प्रचीति आहे, तसला मला अनुभव आला आहे म्हणून मी तें म्हणत आहें. ज्याची मला उत्कंठा लागून राहिली होती तें मला मिळालें आहे. मी एक झालों आहें. इतःपर भिन्नत्वाची वार्ताच रहाणें नाहीं. कारण माझ्यामध्यें व्यक्तिविषयक अशा स्वतःच्या भावना, आशा, तृष्णा, राहिलेल्याच नाहींत.

माझ्या आत्मसख्याशीं मी एकजीव झालों आहें असें जें मला म्हणतां येऊं लागलें आहे तें याच कारणास्तव होय. मग त्या आत्मसख्यास तुम्ही बुद्धदेव म्हणा, भगवान् मैत्रेय म्हणा, श्रीकृष्ण म्हणा किंवा दुसरें कांहीं म्हणा.

गेलीं सोळा वर्षें तुम्ही त्या न बोलत्या चित्राची पूजा केली आहे, तुम्ही मन मानेल त्याप्रमाणें त्याची कल्पना केली आहे आणि त्या चित्रानें तुम्हांस प्रेरणा दिली आहे, शान्ति दिली आहे, निराशेच्या वेळीं प्रोत्साहन दिलें

आहे. तें चित्र बोलतें नसल्यामुळें, त्यांत जिवंतपणा नसल्यामुळें, जिवंत राखण्यासारखें त्यांत कांहींच नसल्यामुळें तुम्हांला त्याला चिकटून रहातां आलें. परंतु तें आजवर तुम्ही पूजिलेलें चित्र, तें तुम्ही निर्मिलेले चित्र, तें तुम्हांस प्रेरणा देत आलेलें चित्र, त्याला आतां जिवंतपणाची कळा येऊन— तें बोलावयास लागतांच तुम्हीं मनांत शंका घेऊं लागलां आहां कीं, हें जें चित्र आम्हीं आजपर्यंत पूजिले होतें तें खरें असेल काय ? त्याला बोलतां येणें शक्य आहे काय ? त्याच्यामागें कांहीं अधिकार असेल काय ? जगद्गुरूंचें प्रतिबिंब दाखविण्याइतका अधिकार त्याच्या अंगीं आहे काय ? जगद्गुरूंचे ज्ञान कोणीकडे ? तो केवढा दयासागर ! ते सर्व गुण ह्या एका व्यक्तींत पूर्णत्वास पोहोंचलेले असे राहूं शकतील काय ? हे प्रश्न तुमचे तुम्हींच सोडविले पाहिजेत. ख्राइस्टच्या पुनरागमनासंबंधानें डोस्टोइव्हस्की नामक ग्रथकारानें सांगितलेली जगप्रसिद्ध गोष्ट तुमच्या ध्यानांत असेलच. तींत असा प्रसंग आहे कीं ख्राइस्ट प्रभु पुनः येऊन धर्मोपदेश करूं लागले व शेवटीं एकदां रोमला जाऊन पोहोंचले. मग तेथे पोपने त्यांना निमंत्रण करून नेलें व एकान्तीं त्यांचे पाय धरून पूजा केली, त्यांची उपासना केली, परंतु त्या पोपनें त्यांना बाहेर जाऊं दिले नाही. तो ख्राइस्ट प्रभूंना म्हणाला, " भगवन्, आम्ही तुमची ही अशी एकान्तांत पूजा केली आहे. आपण ख्राइस्ट आहा हें आम्हांस कबूल आहे. परंतु आपण जगांत बाहेर फिरूं लागलां तर खळबळ उडेल. लोकांच्या मनांत उठणारे संशयकल्लोळ आम्हीं दाबण्याचा प्रयत्न करीत आहोत. आणि तुम्हीं फिरतीवर निघाल्यास ते पुनः प्रादुर्भूत होतील."

त्या चित्राला आतां जिवंतपणाची कळा येत चालली आहे. ज्यांत जिवंतपणा नाहीं अशी कोणतीही गोष्ट खरी असूं शकणार नाहीं, तींत सत्य असणार नाहीं. हिंवाळ्यांत वठलेल्या झाडाची पूजा माणसानें केली तर बिघडतें असें नाहीं, पण वसंतऋतूमध्यें त्याला नवी पालवी व कळ्या येतात, भ्रमर व पक्षी त्यावर गायन करितात आणि सर्व जगास नवजीवन प्राप्त होत असतें, त्यावेळीं झाडाची शोभा कांहीं वेगळीच असते. हिंवाळ्याचीं वर्षे तुम्ही शान्तपणानें घालविलींत; तितक्या कळकळीनें तुम्हीं स्वतःस प्रश्न टाकिले नाहींत, म्हणून तुम्हांस तशा अडचणीही वाटल्या नाहींत.

पण आतां चैतन्यानें मुसमुसणारा वसंत आला आहे; आणि या सगळ्या प्रकाराचा अर्थ काय हें तुमचें तुम्ही ठरविण्याचा प्रसंग येऊन ठेपला आहे. 'जगद्गुरु येणार' असें पूर्वीं तुम्हीं म्हणत असतांना सर्व गोष्टी तुम्हांस सोप्या वाटल्या. कारण त्याचा खोल अर्थ तुम्हांस जाणवला नव्हता. पण तें जगद्गुरूंचें कल्पनाचित्र जिवंत होऊन तुमच्या डोळ्यांसमोर उभें राहिल्यामुळें हा प्रश्न पडला आहे. आतां यापुढें तुम्हीं त्या पूर्वींच्या निर्जीव चित्राची पूजा करीत रहाणार कीं त्या चित्राच्या आंत असणाऱ्या खऱ्याखुऱ्या जीवनाची पूजा करणार हे ज्याचें त्यानें ठरविलें पाहिजे. परंतु तें चित्र आज जिवंत झालें आहे या गोष्टीबद्दलची तुमची खात्री करावी म्हणून, मी अमुक एक अधिकारी माणूस आहें असें मी ज्याप्रमाणें तुम्हांस सांगत नाहीं, त्याप्रमाणें लोकांची खात्री करण्यासाठीं तुम्हीही त्यांस अधिकाराचा हक्क सांगूं नका. त्या चित्रांत जीव आल्याची प्रचीति मला येऊन गेली आहे. चित्राला जरी मी पूर्वीं भजत असें तरी नुसत्या त्या चित्रपूजेनें माझें कधींच समाधान झालेलें नव्हतें. तें चित्र ज्याचें निदर्शक आहे त्याला मला शोधून काढावयाचें होतें. त्या चित्राच्या चौकटीच्यामागें जाऊन त्या चित्राच्या नेत्रांनीं मला पहावयाचें होतें, त्याच्या मनानें मनन करावयाचें होतें, त्याच्या अंतःकरणानें अनुभव घ्यावयाचा होता. त्याविना माझें समाधान होईना. असल्या असमाधानानें, अतृप्तीमुळें, असंतुष्टतेमुळें मला त्या चित्राशीं तादात्म्य मिळवितां आलें व आतां तें चित्रच मी झालों आहें. त्यांत कांहीं मोठी भानगड नाहीं, कीं मोठें गूढ नाहीं. त्याविषयीं लोकांची खात्री करण्यासाठीं स्वतःच्या मनांत खळबळ करून घेण्याचें कारण नाहीं. स्वतःच्या प्रचीतीशिवाय दुसऱ्याचें मत प्रमाण धरून चाललें असतां पाय घसरण्याची भीति असते; व तें बरोबरच आहे. कारण प्रमाण म्हणून धरलेल्या व्यक्ति दिवसानुदिवस बदलण्याचा संभव असतो. आज एकाचीं मतें प्रमाण धरावयाचीं, उद्यां दुसऱ्याचीं धरावयाचीं, अशा रीतीनें क्षणोक्षणीं दुसऱ्याच्या मतांस वांकणाऱ्या माणसाच्या हालांस काय पारावार आहे? तसें होतां उपयोगी नाहीं; आणि तुम्हीं तर मुद्दाम तसें घडवून आणण्याचा प्रयत्न आरंभिलेला आहे! आपणांस हिंमत वाटावी, आपली वाढ अधिक चांगली व्हावी यासाठीं कोणास तरी प्रमाण मानावें अशी माणसाची बुद्धि असते; पण स्वतःच्या बाहेर असलेला कोणताही

अधिकारी पुरुष तुम्हांस स्वतःचा विकास करण्याचें सामर्थ्य देऊं शकणार नाहीं. चित्र जिवंत झाल्याबर त्याच्या तोंडून निघणारी वाणी (सत्य ह्या दृष्टीनें) महत्त्वाची आहे किंवा नाहीं हें तुमचे तुम्हांसच पहातां आलें पाहिजे.

दुसरा काय म्हणतो ते नीट ऐकून घ्यावे अशी माझी नेहेमीची चाल आहे. माझ्या आत्मसख्याशीं तादात्म्य पावण्यासाठी कोणापासूनही जे कांहीं शिकण्यासारखें मिळेल तें मी हृदयांत सांठवीत असतों, मग तो माळी असो, अंत्यज असो, अस्पृश्य असो, शेजारी असो कीं मित्र असो. सर्वांचे म्हणणें ऐकून त्यांतून मिळेल तेवढे सत्य मी गोळा करीत असल्यानें मला माझी संपूर्ण वाढ करून घेतां आली. पण तुम्हीं एका व्यक्तीपासून सगळा सत्याचा गड्डा मिळविण्याच्या अपेक्षेने वाट पहात राहिलां आहां. कागदावर जसा फोटोग्राफ उमटतो तसे तुमच्यासमोर सत्य उभें रहावे, व तें कोणत्या तरी अधिकारी माणसाने तुमच्या माथीं मारावे याची तुम्हीं वाट पहात आहां आणि सत्यास सोडून व्यक्तीची पूजा तुम्ही करीत आहां. जेव्हां कृष्णमूर्ति मरेल (त्याला मरण चुकलेले नाही) तेव्हां त्याच्या नांवाने तुम्ही एक धर्म स्थापाल व आपल्या मनांत त्या धर्माचे नियम ठरविण्याची सुरुवात कराल व कारण सांगाल कीं कृष्णमूर्ति हा त्या सत्याची मूर्ति आहे. म्हणून तुम्हीं त्याचे देऊळ बांधाल, मग त्यांत कर्मकांडाचे विधि करूं लागाल, शब्दावडंबर माजवाल, सिद्धान्त, मते व संप्रदाय तयार कराल आणि तत्त्वविचाराचीं दर्शनें बनवाल. कृष्णमूर्ति नांवाची जी व्यक्ती, तिच्यावर जर तुम्ही मोठाले डोलारे उभारलेत, तर त्यांतच—त्या डोलाऱ्यांत, त्या देवालयांतच तुम्ही अडकून रहाल आणि त्यांतून, त्या मर्यादित क्षेत्रांतून तुमची मोकळीक करून तुम्हांला बाहेर आणण्यासाठीं दुसऱ्या जगद्गुरूला अवतीर्ण व्हावें लागेल. मात्र माणसाचा स्वभावच असा आहे कीं तो त्या नव्या जगद्गुरूच्या नांवानें देऊळ बांधीत रहातो आणि ही परंपरा तशीच पुढें चालू रहाते. पण ज्यांना समजूत आहे, दुसऱ्याच्या अधिकारावर जे विसंबून रहात नाहींत, जे सर्व लोकांना अंतःकरणांत ठाव देतात ते या देवळें बांधण्याच्या भानगडींत रहाणार नाहींत. खरी समजूत त्यांचीच पडेल. कांहीं थोड्या लोकांच्या हृदयांत दुसऱ्यांस सहाय्य करण्याची खरीखुरी इच्छा असल्यामुळें हा विषय समजणें त्यांस सोपें झालेले आहे. इतरांस हा

भाग समजलेला नाहीं. ते जरी पुष्कळ गप्पा मारीत असले, जगद्गुरूंच्या शिकवणीचा कसा अर्थ करावयाचा याविषयीं कल्पना करीत असले तरी त्यांच्या मार्गांत अडचणी येतील. पृथ्वीवर हिंडून जगास शिकवणें हें मला अगदीं सोपें आहे. आम्हांसमोर बोलत आहे हा कृष्णमूर्ति आहे, कीं पुष्कळ वर्षेंपर्यंत जोपासना केलेल्या देहांत संचारलेली ही अन्य शक्ती आहे, अंतर्यामीं ईश्वरानें ठाणें दिल्यामुळें तो बोलत आहे किंवा याच्यामध्यें आवेश झाला आहे, या विचारांच्या फिकिरींत लोक पडणार नाहींत. ते एवढेंच म्हणतील कीं "मी हा असा क्लेशांत सांपडलेला आहें, मला सुखदुःखाचे हे अनुभव आलटूनपालटून सारखे येतच आहेत; अशा या माझ्या स्थितींत कायमचें मनःस्थैर्य मला मिळण्याचा तुम्हांस कांहीं उपाय सांगतां येईल काय? तुम्हीं म्हणतां कीं तुम्हां स्वतःला आनंद व स्वतंत्रता हीं लाभलीं आहेत. तुम्हीं मला त्याचा अंश द्याल का? व अशा रीतीनें तुमच्या साम्राज्यांत-तुमच्या वातावरणांत-आम्हांसही पाय टाकावयास मिळेल का?" हेंच समजून घेण्याविषयीं ते आतुर असतील. त्यांस नांवांशीं, पंथांशीं, नियमांशीं किंवा ग्रंथांशीं कांहीं करावयाचें असणार नाहीं. मानवी चरित्राच्या सेतूखालून वहाणाऱ्या जीवन-निर्झरांचे जिवंत प्रवाह त्यांस पहावयाचे आहेत, व त्या मार्गानें पोहत जाऊन अनंताच्या अफाट सागरांशीं त्यांस भिडावयाचें आहे. आणि तुमचें पहाणें तर निराळेंच आहे! जगद्गुरूंच्या मुखांतून निघालेल्या शब्दांचा कसा काय अर्थ लावावयाचा एवढेंच तुम्ही पहात आहां. तुम्हां स्वतःला सत्य सांपडलेलें नसल्यामुळें तुम्हीं स्वतः मर्यादांनीं बांधलेले आहां, आणि तरीही दुसऱ्या माणसांस त्या मर्यादांतून मुक्त करण्याचा तुम्हीं उद्योग करीत आहां! हें कसें साध्य होणार? तुमच्या चित्तांतील जलाशयांमधलें सांचिक जीवन मोकळें व शुद्ध जोंवर तुम्हीं करून टाकलें नाहीं, जोंवर सत्याचें प्रतिबिंब त्यांत पडत नाहीं, तोंवर खरें काय, खोटें काय, जगद्गुरु म्हणजे काय, सत्य कसें असते, हें तुम्हांस कसें सांगतां येणार?

मी या जन्मांत (आणि न जाणों मागील जन्मांतही) एकाच गोष्टीची मनीषा धरीत आलेला आहें; ती गोष्ट म्हणजे बंधनांतून सुटावें, दुःखाच्या पैलतीरास जाऊन पोहोंचावें, माझे गुरु, माझा आत्मसखा मला सांपडावा

ही ती मनीषा होय. तुमचा गुरु, तुमचा आत्मसखाही तोच आहे. तो गुरु, तो आत्मसखा, प्रत्येकाच्या अंतर्यामीं आहे, प्रत्येक दगडाच्याखालीं, पायां खालच्या गवताच्या प्रत्येक काडींत तो आहे. त्याच्याशीं एक होऊन जावें भिन्न असल्याची कधींही प्रचीति येऊं नये, निराळा जीव असलेली भिन्न व्यक्ति म्हणून मी केव्हांही वेगळा राहूं नये, हीच उत्कंठा, हाच ध्यास मला लागून राहिलेला होता. या भिन्नत्वाचा संपूर्ण नाश जेव्हां मला करतां आला तेव्हांच मी माझ्या आत्मसख्याशीं एकरूप झालों. अर्थात् माझा आत्मसखा--माझें सत्य--मला सांपडल्यामुळें तें तुम्हांस देण्याची माझी इच्छा आहे.

प्रातःकाळच्या वायुलहरींस आपल्या सुवासानें सुगंधित करणाऱ्या फुला-प्रमाणें मी आहे. स्वतःच्या जवळून कोण जात आहे याचा विचार फुलास नसतो. वास देण्याचे आपले काम ते फूल करते व सर्व लोकांना, मग ते सुखी असोत, दुःखी असोत, तो वास मिळतो. पण जे संतुष्ट असतील, ज्यांना उत्कंठा लागलेली नसेल, ज्यांस अगत्य नसेल, त्या सुगंधाच्या आमोदाची ज्यांस कल्पना नसेल ते त्या वासाकडे दुर्लक्ष करून तसेच पुढे जातील. अशा माणसांना थांबवून त्या फुलाचा वास घ्यावयास तुम्ही भाग पाडणार आहां कीं काय ? अशांची खात्री कशी करावी या काळजींत तुम्ही आहां. पण त्याची खात्री कां करतां ? जे खरोखर शोध घेत आहेत त्याचीच तुम्ही खात्री करूं शकाल. तुमच्या स्वतःच्या शोधांतच तुम्ही संशयमग्न आहां, आणि म्हणून तुमचाच शोध नीट चाललेला नाहीं. कूपमंडूकवत् आपआपल्या अल्प ज्ञानांत तुम्ही संतुष्ट आहांत, स्वतःच्या अंध-श्रद्धेत संतुष्ट आहांत, प्रमाण असलेल्या व्यक्तींनीं आपणांला धडे द्यावेत व संशयाचा वारा आपणांस लागूं देऊं नये अशी तुमची अपेक्षा आहे. समजा कीं एखाद्याने तुम्हांला अधिकारयुक्तवाणीनें सांगितले कीं मी जगद्गुरु आहे; तरी त्याचा काय फायदा होईल ? त्यानें सत्यामध्यें कोणता फरक घडून येऊं शकेल ? तुमच्या अंतःकरणाची त्यानें कशी समजूत पडेल ? तुमच्या मनांत त्याने ज्ञानाचा कसा प्रकाश पडेल ? दुसऱ्याच्या मतांवर जर तुम्ही अवलंबून रहाणार असाल तर तुम्ही वाळूवर आपल्या घराचा पाया उभार-लेला आहे हें निश्चित समजा; व मग दुःखाची झुळूक आली तर ती तुम्हांला

चीत करील. उलटपक्षीं, तो पाया स्वभावानुरूपी दगडांना बांधलेला असल्यास, स्वर्जित ज्ञानाच्या सहाय्यानें, स्वतःच्या यातना आणि स्वतःचें दुःख यांच्या सहय्यानें—बांधलेला असल्यास, व अशा त्या पायावर एका विटेवर दुसरी वीट चढवून, एका अनुभवानंतर दुसऱ्या अनुभवाची रांग रचून जर तुम्ही इमारत उभारली असाल तरच तुम्हांस लोकांची खात्री करितां येईल. आजवर या तारक-संघाच्या दोन संरक्षकांवर† तुम्हीं विसंबून राहिलां आहां, आपणांव्यतिरिक्त दुसऱ्या कोणी आपणांस सत्य द्यावें अशी तुम्ही अपेक्षा धरली आहे; आणि खरी स्थिति अशी आहे कीं तें सत्य तुमच्याच अंतर्यामीं आहे. तुमच्या स्वतःच्या हृदयांत, तुमच्या स्वतःच्या अनुभवांत तें सत्य तुम्हांला सांपडेल आणि त्यासच काय ती खरी किंमत आहे. तेंच खरोखरी तुमचें दुःख नाहींसें करून तुम्हांस समाधान देईल, तुमच्या यातना दूर करील. ह्याच कारणासाठीं मला या गोष्टी बोलणें अवश्य झाले आहे. मी गुरु आहें, असें आज मी म्हणत आहें; पण गुदस्तां मला तसें म्हणतां आलें नसतें. गुदस्तसालीं मी तसें म्हणतों तर तें अप्रामाणिकपणाचें झालें असतें, असत्य झाले असतें; कारण गुदस्तां मजमध्यें उगम आणि अंत यांचा संगम झालेला नव्हता, अर्थात् मी गुरु आहें असे बोलण्यास मी समर्थ नव्हतो. आतां मला तसें म्हणतां येत आहे. कारण मी आतां माझ्या आत्मसख्याशीं एकजीव झालो आहे, बालबोध झालों आहे, त्या आत्मसख्याच्यामुळे वैभवावर आरूढ झालो आहे आणि त्याच्याचमुळें लोकांस मला सहाय्य करतां येत आहे. अधिकारासंबंधानें अथवा कृष्णमूर्तीच्या देहांतील आवेशासंबंधानें वादविवाद माजविण्याचा माझा हेतू नाहीं. तुमचीं बंधने, तुमच्या क्षुद्र उपाधि, तुमचीं दुःखें सर्व धुवून टाकावीं असा माझा हेतु आहे, म्हणजे त्यामुळें तुम्हीं मोकळे व्हाल; जेथें कशाचाही तोटा नाहीं, जेथें सर्वत्र आत्मसखा भरलेला अशा सागरांत तुम्ही मिळून जाल.

माझें म्हणणें आतां आपणांस स्पष्ट झाले असेल अशी मला आशा आहे. ज्यांस समजूत आहे त्यांस तें स्पष्ट व्हावयास पाहिजे. ज्यांचीं

---

† डॉ. बेझंट व बिशप लेडबीटर हे ते 'संरक्षक' होत.

—भाषांतरकार.

मनें-हृदयें चांचपडत असतील, ज्यांनीं शोध केला असेल, ज्यांस सत्याची उत्कंठा लागली असेल त्यांस तें सत्य सांपडेल. आपला जीवनक्रम बदलावा अशी ज्यांची इच्छा नाहीं, त्यांचा जीवनक्रम बदलणे व त्यांची खात्री करणें हें तुम्हांस शक्य नाहीं; पण ज्याअर्थीं माझ्यामध्यें स्थित्यंतरें होत होत मी माझ्या आत्मसख्याशीं एकरूप झालों आहे, ज्याअर्थीं मला माझें ध्येय मिळालें आहे, (तुम्हां सर्वांचेही ध्येय तेंच आहे) ज्याअर्थीं त्या ध्येयाशीं मी मिळून गेलों आहें, त्याअर्थीं, तो अनुभव ज्यांस प्राप्त झालेला नाही त्यांस तो देणें माझें कर्तव्य आहे, माझा तो धर्म आहे, मला त्यांत आनंद आहे. माझ्या अंतरंगांत प्रेम असल्यामुळें मी एकरूप झालो; अर्थात् प्रेमाशिवाय ते ध्येय तुम्हांस गांठतां येणार नाहीं. माझ्यामध्यें प्रेम आहे, मी दुःख भोगलें आहे, मी सर्व पाहिलें आहे व तें ध्येय मी प्राप्त करून घेतले आहे आणि ते तुम्हांस मी देत आहें. तें देणें मी तारक-संघाच्याद्वारानें देईन किंवा अन्य संस्थेच्या द्वाराने देईन यास महत्त्व नाहीं. लोकांना तें कोणत्याही संस्थेच्या मार्फतीने लाभले तरी सारखेच. त्यांचीं सुखदुःखें, त्यांचा दोन दिवसांचा बडेजाव, त्यांच्या क्षणभंगुर तृष्णा, ह्यांचा नायनाट होऊन त्या जागीं उच्च ध्येय येऊन बसलें कीं त्यांचे काम झाले.

ह्या आनंदाचें, ह्या स्वतंत्रतेचे मर्म तुमच्या एकदांचे प्रत्ययास आलें म्हणजे तुम्हीं स्वतःपासून सुटे व्हाल, स्वतःचे डामडौल, स्वतःचीं सुखे, दुःखें, व शोक यांपासून सुटाल. ज्याअर्थीं मला स्वतंत्रता (मुक्ति) मिळाली आहे त्याअर्थी मी ती तुम्हांस देऊं पहात आहें. पण तुम्हीं मला म्हणत आहां कीं ती आम्हांस अमुकच तऱ्हेने, अमुकच शब्दांनी, अमुकच भाषेने तुम्हीं दिली पाहिजे. जोवर पाण्याने तुमची तहान भागते आहे तोंवर तें पाणी तुम्हीं कोणत्या भांड्यांतून पितां याचा काय प्रश्न आहे? जोंवर अन्नाने समाधान वाटतें आणि अंगात शक्ति येते तोवर तें अन्न कोण देतो याची काय अडचण आहे? प्रत्येक गोष्ट नांवानें विकण्याची संवय तुम्हाला शेंकडों वर्षांची जडलेली आहे, आणि म्हणून जीवनावरही नांवाचा शिक्का तुम्ही मारूं पहात आहां. कृष्णमूर्ति हा अमुक अमुक आहे असा छाप त्याच्यावर पाहिजे असें तुम्हीं म्हणतां; तसें झालें म्हणजे आमची समजूत पडेल व मन शान्त होईल असे तुम्हास वाटतें. पण तसा प्रकार होणार नाहीं.

समुद्राच्या पाण्यास तुम्हीं बांधून ठेवूं शकाल काय ? लोकांनीं तसले प्रयोग करून पाहिले आहेत, पण त्यांत सदा धोका असतो. स्वतःस बांधून घेण्याची माझी इच्छा नाहीं; कारण त्यानें संकुचितपणा उत्पन्न होतो. माणसास हवेची मोट बांधतां येणार नाहीं. हवा भांड्यांत अडकवून धरतां येईल, व मग त्यांत घाण उत्पन्न करितां येईल, त्यांत विष ओततां येईल, पण बाहेर जी हवा सगळी-कडे पसरली आहे ती सर्वांच्या उपयोगासाठीं आहे. तिच्यावर तुम्हांला बंधन घालतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें मीही कोणाच्या बंधनानें बांधला जाऊं इच्छित नाही. मी माझ्या मार्गानें जात रहाणार, कारण तो एकच मार्ग मला आहे. मला पाहिजे होतें तें मला मिळून गेलेलें आहे. त्या आत्मसख्याशीं मला सायुज्यता प्राप्त झालेली आहे व तो आणि मी असे जोडीनें जगाच्या पाठीवर सर्वत्र सचार करणार आहों.

वाटतील तितके प्रमाणग्रंथ पुढें ठेवले, हवी तेवढी भीति घातली, कोण-त्याही नरकाची कल्पना पुढे केली तरी लोकांवर तुमची बळजबरी चालावयाची नाहीं; ते युग गेलें. हें युग वडाचें व अस्वस्थतेचें आहे. स्वतः सर्व जाणावें अशी आज लोकांची इच्छा आहे. तशी इच्छा तुम्हांला नसल्यामुळें तुम्हीं मर्यादित क्षेत्रांत अडकून बसलां आहां; तुम्हांला वाटत आहे कीं आपले ध्येय आपणांला सांपडलें आहे; पण तें तुम्हांस सांपडलेलें नाही. तुमच्या मनाचे बारीक सारीक संशय दुसऱ्यांनीं नाहीसे केले असल्यामुळें, तुम्हांस भ्रम झाला आहे कीं आपणांस सर्व जगताचें मत आपल्यासारखें करतां येईल.

जेव्हां फ्रान्समध्ये इफेल टॉवर नामक अत्युच्च मनोरा बांधण्यांत आला तेव्हां त्या मनोऱ्याला, आपण सर्व जगांत अत्यंत सुंदर, अत्यंत अद्भुत, अत्यंत उंच आहोंत असा गर्व वाटला होता. पण पुढें एकदां एक लहानसें विमान त्याच्यावरून उडी मारून पलीकडे गेलें !! तुम्हां सर्वांना वाटतें कीं आपण हरिणासारखे धावूं व सिंहासारखी गर्जना करूं; पण हरणाबरो-बरीनें धांवणें, व सिंहाबरोबरीनें गर्जना करणें हें तुम्हांला त्या आत्म-सख्याशीं ऐक्य पावल्यावरच शक्य आहे. आत्मसखा कोण ? असा प्रश्न मला विचारण्यांत कांहीं अर्थ नाहीं. याचें स्पष्टीकरण करून उपयोग तो कोणता ? प्रत्येक प्राणिमात्रांत, प्रत्येक दुःखी जीवांत, गवताच्या प्रत्येक

काडींत, प्रत्येक व्यक्तींत, तो आत्मसखा तुम्हांला दिसूं लागल्याखेरीज तो तुम्हांला उमजणार नाही.

बंधुहो ! तर मग एकच गोष्ट खरोखरी महत्त्वाची आहे; आणि ती गोष्ट ही की, जे लोक येथें § नसून बाहेरच्या जगतांत आहेत त्यांची तहान भागविणारें जीवन आपण त्यांस दिलें पाहिजे. त्यांस समाधान देणारें, त्यांचें अंतःकरण धुवून काढणारें, त्यांचें मन थोर करणारें जीवन म्हणजे त्यांचे त्यांस सत्य सांपडलें पाहिजे; त्यांच्या स्वतःच्या मनात आणि त्यांच्या स्वतःच्या हृदयांत, स्वतन्त्रता आणि आनंद यांची मुहूर्तमेढ उभी झाली पाहिजे.

---

§ 'येथें' म्हणजे तारक-संघाच्या मुख्य पीठांत एर्ड येथें.

# गणेश महादेव आणि कंपनीचीं पुस्तकें

रु. आ.

**कादंबऱ्याः—**

१ स्वराज्याचा श्रीगणेशा २–४
२ स्वराज्याची घटना २–४
३ स्वराज्याची स्थापना २–४
४ स्वराज्याचा कारभार २–४
५ स्वराज्यावरील संकट २–४
६ स्वराज्याचें परिवर्तन २–४
७ स्वराज्यांतील दुफळी २–४
८ आर्जिक्यतारा १–८
९ शृंगेरीची लक्ष्मी २–०
१० कुठें ! १–०
११ मराठशाहीची ढाल १–८
१२ राक्षसी रणसंग्राम १–०
१३ गौरीशंकर १–८
१४ पालखीचा गोंडा १–८

**गोष्टीः—**

१५ कळ्यांची माळ १–०
१६ मानसपूजा १–४
१७ सुख–स्वप्नें १–४

**नाटकेंः—**

१८ सं. नवजीवन ०–१०
१९ ,, सैतानी संक्रांत १–०

**काव्य-ग्रंथः—**

२० गोमांतक २–०
२१ माधवानुज २–०

**ऐतिहासिकः—**

२२ मु. रियासत (भा.१) ३–०
२३ मु. रियासत( भा. २ ) ३–८
२४ म. ,, पूर्व वि. (शि.नाही)
२५ ,, ,, मध्य वि. १, ३–०
२६ म.रियासत मध्य वि.२, ३–८
२७ ,, ,, ,, ३, खलास
२८ ,, ,, ,, ४, ३–०
२९ ,, ,, उत्तर वि. १, ३–८
३० ,, ,, ,, २, ३–८
३१ ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध ३–८

**धार्मिकः—**

३२ श्रीएकनाथ चरित्र ०–१२
३३ भक्तिमणिमाला १–८
३४ स्वामी रामतीर्थ खं. १, २–८
३५ ,, ,, ,, २, २–८
३६ ,, ,, ,, ३, २–८
३७ ,, ,, ,, ४, २–८
पुढील २ खंड क्रमशः निघतील.

**निबंध वगैरेः—**

३८ आनंदाचे साम्राज्य १–०
३९ मरणोत्तर स्थिति व परलोकविद्या २–०
४० मानवी कर्तव्यें १–
४१ निवडक लेख २–८
४२ ग्रेटब्रिटनची शासनपद्धति-१०
४३ हिंदुत्व १–०
४४ विनोदसागर, तरंग १ ला १–०
४५ स्वातंत्र्याचीं मूलतत्वें १–८
४६ यालिपीठ १–८

**चरित्रेंः—**

४७ मुलींची द्रौपदी १–८
४८ महात्मा गांधी २–४
४९ निकोलाय लेनिन ०–१२
५० जोसेफ मॅझिनी २–०
५१ वीर वैरागी १–०

# सत्य-प्रतीतीचें
## प्रमाण कोणतें ?

भाषांतरकार

श्री. देवीदास भास्कर लेले, बी. ए.,
प्रिन्सिपल, पेटिट हायस्कूल, संगमनेर.

# दोन शब्द

कृष्णजींच्या By What Authority या नांवचीं व्याख्यानें 'सत्य-प्रतीतीचें प्रमाण कोणतें ?' या मथळ्याखालीं आम्ही पुढील भागांत मराठी वाचकांसमोर ठेवीत आहोंत. मराठी पेहराव रा. रा. देवीदास भास्कर लेले, बी. ए., प्रिन्सिपल, पेटिट हायस्कूल, संगमनेर, यांनीं दिला आहे. त्याबद्दल आम्हीं त्यांचे ऋणी आहों. या व्याख्यानांत Beloved हा शब्द जो आलेला आहे त्याचें भाषांतर पूर्वीप्रमाणेंच बहुतेक ठिकाणीं 'आत्मसखा' असें केलेलें आहे. क्वचित् 'प्रियतम' अथवा 'हृदयसखा' असाही शब्द घातलेला आहे.

"सत्याचें उगमस्थान कोठें असतें ?" हें व्याख्यान झाल्यावर लगेच हीं नंतर पुढील व्याख्यानें त्याच ठिकाणीं देण्यांत आलीं. १९२७ सालीं ऑगस्ट महिन्याच्या प्रारंभीं कृष्णजींनीं तारक-संघाचा कॅंप (छावणी) एक आठवडाभर हॉलंडमध्ये उघडलेला होता. जगांतील निरनिराळ्या देशांतले अडीच तीन हजार लोक त्या कॅंपसाठीं आले असून ते एर्ड किल्ल्याजवळ झोंपडया तंबू वगैरेमध्ये आठ दिवस एकत्र राहिलेले होते. रोज सायंकाळीं ही मंडळी एका ठराविक जागीं जमून वर्तुळाकार बसत आणि तो एवढा मोठा समाज मन निवान्त ठेऊन व यत्किंचितही शब्द न बोलतां अगदीं शांत असे. या मंडळीच्या मध्यभागीं अग्नि पेटविण्याची सिद्धता केलेली असे. कृष्णजी तो अग्नि पेटवीत, संस्कृत मंत्र म्हणत आणि मग त्या जनसमूहाच्या मध्यभागीं उभें राहून एक लहानसें भाषण करीत. पुढें आलेलीं सहाही भाषणें याप्रमाणें दररोज अनुक्रमानें झालेलीं आहेत. ह्या भाषणांचा परिणाम श्रोत्यांच्या मनावर अतिशयित होत असे व ज्यांस सूक्ष्मदृष्टि आहे अशा मंडळीस तेथें अंतरंगाच्या भूमिकेवर फार मोठे चमत्कार दिसून येत आणि आपल्या अंतरंगींचे कांहीं पडदे दूर झाले आहेत असा स्वतःचा अनुभव त्या मंडळीपैकीं

पुष्कळांस येई असें सांगतात. जशीं हीं व्याख्यानें श्रोत्यांनीं शान्तमनानें, निवान्त हृदयानें, व मननपूर्वक ऐकलीं व तीं ऐकतांना कृष्णजींच्या मनाशीं स्वतःचें अंतर्याम मिळविण्याचा प्रयत्न केला तसाच यत्न वाचकांनीं केला पाहिजे; तरच त्यांस पुढील व्याख्यानांचा नीट उमज पडेल हें उघड आहे. ‘ सत्य-प्रतीतीचें प्रमाण कोणतें ?’ असें नांव या सहा व्याख्यानांस दिलेलें आहे. अर्थात् सत्य-प्रतीतीचें प्रमाण म्हणजे दुसऱ्याचा अधिकार नव्हे, तर स्वतःच्या अंतरंगांतील समजूत होय असें सांगण्याचा कृष्णजींचा कटाक्ष आहे.

राजाराम सखाराम भागवत.

---

# सत्य-प्रतीतीचें
## प्रमाण कोणतें ?

येथें प्रतिसायंकाळच्या भाषणांत मला तुम्हांला मार्ग दाखवून द्यायचा आहे, आणि तो चालायला लागणारी शक्ति तुमचेठायीं जागृत करायची आहे. तेवढें झालें म्हणजे तुमच्या स्वतःच्या वैभवाचें व ऐश्वर्याचें मूळ, तुमची स्वतःची परमार्थवासना, मोक्ष–आनंदाची विजिगीषा, हिचा अंकुर तुमचा तुम्हांला शोधून काढतां येईल. आतां हें करीत असतां, आणि, मोक्ष व आनंद ह्या शब्दांचे माझे अर्थ तुम्हांला समजावून देत असतां, आधीं हें सांगितले पाहिजे कीं, हा वेळभर, तुम्ही आपल्या पूर्वींच्या कल्पना साऱ्या एकीकडे ठेवा, आणि माझ्या मनांत, माझ्या विचारांत व भावनांत शिरा. म्हणजे, माझ्यादृष्टीनें मोक्ष व आनंद ह्यांचे अर्थ काय आहेत ते तुम्ही समजूं शकाल. तुम्हाला विचार सुकर व्हावा, आणि तुमच्या तुम्हाला स्वतःच्या अंतरंगांत खोल खणीत जातां यावें ह्यासाठीं मी तुम्हांला एक गोष्ट सांगतों.

एकदां एक ज्योति होती, ज्वाला होती—फार विशाल आकाराची, प्रचंड, खरीच आकाशस्पर्शी अशी ज्वाला होती; आणि त्या ज्वालेपासून असंख्य स्फुलिंग, ठिणग्या, बाहेर पडल्या. अशा एका ठिणगीपासून एक मनुष्य-प्राणी उत्पन्न झाला. त्याला आपण घटकाभर कृष्णमूर्ति हें नांव देऊं. मी कृष्णमूर्तींची गोष्ट घेतों याचें कारण एवढेच कीं मला तो कृष्णमूर्ति चांगला ठाऊक आहे. आतां मी त्याचें तिऱ्हाइताप्रमाणें तटस्थदृष्टीनें परीक्षण करणार आहें; व तसेंच तुम्ही स्वतःचें परीक्षण करा असें तुम्हाला सांगणें आहे; आतां गोष्टीला आरंभ करण्याचेपूर्वीं तुम्ही आपणाला स्वतःच्या व्यक्तिस्वभावा-पासून वेगळें केलें पाहिजे. तरच, मी कृष्णमूर्तींची परीक्षा करणार आहें, तशी तुमची तुम्हांस करतां येईल.

ती ठिणगी अतिदीर्घकाळानें, अगणित अवधि लोटल्यानंतर मानव-योनी पावली. तो मनुष्यप्राणी म्हणजे प्रथमतः केवळ वनचर

होता. इतर संस्कारहीन जंगली मनुष्यांप्रमाणें त्याला ध्यास एकच—स्थूल-देहाची तृप्ति करावी हा. त्यानें सदा देहाचे लळे पुरवावे; त्याच्या वासनेस बळी पडावें; फक्त देहाच्या वासनांची, कामनांची पूर्ति एवढाच त्याचा जीवनहेतु होता, पुरुषार्थ होता, किंबहुना तेंच त्याचें इतिकर्तव्य होतें.

असा तो अनेक जन्म शिकत, दुःखें भोगीत गेला. 'माझेसाठीं' म्हणून वस्तु मिळवाव्या, 'माझ्या' म्हणून त्या वस्तूंचा संग्रह करावा हें तो शिकला. पुष्कळ वस्तु–पुष्कळ वस्तूंचा पसारा–नश्वर वस्तूंचा पसारा जवळ असल्यावांचून त्याला चैन पडत नसे. अशा रीतीनें त्यानें अज्ञानाचा हिंवाळा* काढला. उत्क्रान्तिमार्गावर अल्पवय असल्यामुळें देहाच्या सुखसंतोषा-पलीकडे कांहीं कर्तव्य, कांहीं हेतु त्याला दिसतच नसे; परंतु कालगतीनें, दुःखाच्या शिकवणीनें समाजाचे नियम, सर्वांच्या हिताचे नियम, त्याला समजूं लागले; ते शिकतां शिकतां व पाळतां पाळतां, त्याला क्षणिक मिथ्या काय आणि टिकाऊ सत्य काय ह्याचा विवेक करूं लागला. आरंभाला त्यानें ते नियम मोडावे आणि दुःख भोगावें, असे अनुभवाचे घाव अनेक जन्म खाल्यावर तो सभ्य किंवा नागर मनुष्याची स्थिति पावला. नंतर कालाच्या ओघांत, युगानुयुग, वर्षानुवर्ष, नाना क्लेश भोगीत, जगाच्या मतें मनुष्याच्या सुखस्वास्थ्याला ज्या वस्तु आवश्यक आहेत त्यांच्या मोहांतून सुटण्याच्या इच्छेनें, त्यानें ज्ञानाचा शोध केला. तो आप-णाशीं म्हणाला, जेथें जावें तेथें दुःख; जेथें रहावें तेथें सभोंवतीं आणि माझ्या अंतर्यामी निबळ हलकल्लोळ! ह्या दुःखांतून, हलकल्लोळांतून, बंधनां-तून बाहेर पडलें पाहिजे; आणि बाहेर पडून, भ्रमण करून, शाश्वत वस्तु, अक्षय वस्तु, शोधली पाहिजे.

तो दुसऱ्यावर अवलंबून राही. आपल्या सुखासाठीं, प्रेमासाठीं, प्रीती-साठीं लोकांवर अवलंबून राही; भजनपूजनाची भिस्त दुसऱ्यावर ठेवी; शोधा-यला निघाला शाश्वत सत्य, आणि गुंतून पडला मंदिर, मूर्ति, मंत्र, तंत्र, विधिविधान इत्यादिकांच्या जाळ्यांत! म्हणजे गुरफटला या सर्व वस्तूंच्या

---

*युरोपांत हें व्याख्यान झालेलें आहे. तेथें हिंवाळ्यांत जबर थंडी असते, सर्वत्र बर्फ असतें, झाडांचीं पानें गळतात, माणसाचें अंग गारठतें वगैरे गोष्टींस अनुलक्षून येथें हिंवाळ्याची उपमा घेतलेली आहे. —भाषांतरकार.

उपाधिबंधनांत! पण त्यानें त्याचें समाधान होईना व जीव सदा उलटून उठूं लागला. नंतर त्यास असें दिसूं लागलें कीं आपलें अभीष्ट गिरिशिखरावर आहे आणि हीं मंदिरें, ह्या मूर्ति त्या मार्गाच्या आजूबाजूच्या वस्तु आहेत. त्यांतून चित्त काढले पाहिजे. त्याला अशी उत्कट इच्छा झाली कीं 'आपल्या उपास्य मूर्तीच्या अंतर्यामीं जे काय आहे तें शोधावें. मी जन्मानुजन्म ह्या प्रतिमेची पूजा करीत आलो पण आतां ह्या प्रतिमेच्या डोळ्यांच्या व भावनेच्यामागे जें कोण आहे त्याची भेट मी घेणार!' पण प्रतिमेच्या हृदयाच्या आंत, डोळ्यांच्यामागें जे आहे ते शोधायला त्याला अगणित कष्ट पडले, तीव्र उत्कंठा व निराशेचे मोठमोठे गचके यांतून जावे लागलें, मोठीं दुःखें भोगावीं लागलीं. नंतर हळूहळू, अनेक जन्मांच्या तपानें, यातनेनें, उपवासानें स्थूलदेहाचा संयम त्यानें साधला. ते साधन चालू असतांच, विचार व भावनाउर्मींचा संयम, ह्याचाही अभ्यास चालला होता. कारण त्या सगळ्यांचा मेळ घातल्यावांचून, सगळ्यांचे सहकार्य व समक्रिया साधल्यावांचून, विरोध थांबणें शक्य नाहीं; व स्वास्थ्यही मिळणें नाहीं.

जसा कोळी मासे धरण्यासाठीं उघड्या समुद्रांत जातो, तसा तो अनुभवसंग्रहासाठीं जीवनसागरावर सफरी करूं लागला. परंतु अनुभवाचे मासे पकडतांना अनेकदां तो आपणच आपल्या जाळ्यांत अडके; आणि मग मोकळे होण्यासाठीं, आणि सर्व अनुभवाचें सार जी ती ज्वाळा, तिला मिळण्यासाठीं, त्याला तें अनुभवाचें जाळें तोडावें लागे. हळूहळू, क्रमानें, तुम्हांला कृष्णमूर्ति म्हणून माहीत असलेली व्यक्ति, स्वतंत्र विकासार्थ बाहेर पडलेला हा स्फुलिंग, आतां महा-अनुभवांचेअंतीं, त्या ज्वाळेंत मिळून तिच्याशीं एकरूप झाला आहे.

अशी ही गोष्ट मी तुम्हाला सांगितली. कारण सामान्यतः व्यक्तीनें वेगळे होऊन या मार्गानें चालण्याचा प्रारंभ केल्यावर अनंत काळ आणि हजारों वर्षे जावीं लागतात, आणि त्यांत ते ते सगळे धडे, ते ते जीवनापासून मिळणारे सर्व अनुभव घेतल्यानंतरच कोठें मोक्ष व आनंद यांचें दर्शन संभवते, व हीं दृष्टिपथांत येतात. परंतु तुम्ही जे आतां येथें आहांत; त्यांपैकीं प्रत्येकाला मोक्ष व आनंद यांचे सांप्रत दर्शन होणें शक्य आहे. कारण तुम्ही आत्मसख्याचे, प्रियतमाचे संमुख आहां, आणि आत्मसख्यासंनिध

काळाची गति कुंठित होत असते. ज्या ठिकाणीं सगळे जाऊन पोहोंचणार आहेत तें ध्येय दिसण्यासाठीं ते सर्व क्लेश, त्या सर्व यातना, ते सर्व दुःखाचे अनुभव, तीं सगळीं तीव्र सुखें या साऱ्यांचा अनुभव घेण्याची तुम्हाला आवश्यकता नाही. जशी नदी उगम पासींच आपले ध्येय जाणते आणि म्हणून समुद्राला मिळेपर्यंत अखंड वाट काढीत जाते; तसें तुम्ही प्रारंभापासूनच सर्वांचें निश्चित ध्येय काय ते ओखळलें पाहिजे.

मी हें तुम्हाला सांगत आहें, पण माझ्या अधिकाराची छाप तुमचेवर बसविण्यासाठीं हे सांगत नाहीं, तुम्हाला भोळे भाविक बनविण्यासाठीं सांगत नाहीं किंवा तुम्ही आपली भक्ति एका व्यक्तीला अर्पण करावी ह्यासाठींही सांगत नाहीं. तर मग कशासाठीं हें सर्व मी तुम्हाला सांगत आहें ? तर तें एवढ्यासाठीं, कीं एकदां तुम्ही प्रियतमाशीं, आत्मसख्याशीं एकरूप बनलां, त्या ज्योतींत मिळालां, म्हणजे मग, ती मुक्ति व तें सुख, बाहेर जाऊन दुसऱ्यांना तुम्ही देऊं शकाल. दुःखाच्या कारागृहांत पचणाऱ्यांस, तुम्ही जाऊन मुक्तीचें दर्शन देऊं शकाल. अर्थात् तुम्ही आपल्याकडून द्याल आणि दर्शन करवाल. पण प्राप्तीचे कष्ट ज्याचे त्याने केलेच पाहिजेत. बाह्य प्रामाण्याचे आधार झाडासारखे तोडतां येतात. म्हणून तुमच्या वृक्षाचे मूळ जर अंतरंगाच्या अचल भूमींत खोल, पक्के रुतलेलें नसेल तर तो वृक्ष मरेल आणि पुनः नवें रोप करावें लागेल. परंतु त्याच वृक्षाचें मूळ अंतर्यामीं खोल, पक्के रोवूंद्या, म्हणजे मग तो सदा अनायासें कोवळी पालवी, कळ्या व छाया यांचा आनंद देत राहील. अशा ह्या मोक्षसुखाच्या प्राप्तीचें वर्णन करीत असतां माझें तुम्हाला प्रत्येकाला आग्रहाचें सांगणें हे आहे कीं, हे बोलणाऱ्या व्यक्तीसंबंधींचा विचार तुम्ही करूं नका, तर स्वतःच्या आंत जा आणि आपापल्या अंतरंगाचें परीक्षण करा. मला निजसुख लाधलें; कारण मला शान्ति मिळाली, स्वास्थ्य मिळाले, मी आत्मसख्याशीं ऐक्य पावलों; आणि म्हणून माझी इच्छा ही कीं तुम्हीही तसेच व्हावें; पण तसें होण्याला, आत्मसख्याशी ऐक्य पावण्याला तुमचेठायीं तसेंच दृढ व शुद्ध हृदय, आणि स्वच्छ, शान्त मन असलें पाहिजे. जसा सूर्य—महान् वनवृक्ष असो कीं राईएवढें फूल असो, सर्वांना समभावानें प्रकाश देतो आणि विकास करतो; तद्वतच तुम्ही आत्मसख्यासंमुख जोंवर

आहां (मग तुम्ही उत्क्रान्तीच्या कोणत्याही पायरीवर असाना, त्याची कांहीं चिंता नाहीं.) तोंवर तुमचा आत्मविकास सर्वांगपरिपूर्ण होणारच.

ह्याच तर जीवनाचा हेतु आहे. ज्योतींतून स्फुलिंग बाहेर पडावा, त्यानें अनुभवाचा संग्रह करावा, आणि शेवटीं पुनः येऊन ज्योतींत मिळावें, व निराळी व्यक्ति नाहींशी व्हावी. धन्य तो, सुखी तो, कीं जो असा आत्मसख्याशीं, प्रियतमाशीं ऐक्य पावला आहे. धन्य तो, कारण कीं तहानेल्यांना, अकिंचनांना तो जीवनाच्या जिवंत झऱ्याचें पाणी देऊं शकेल.

म्हणून मित्रा, मी सांगतों—तूं प्रथमारंभींच हें उमज कीं सुख दुसऱ्या कोणत्याही व्यक्तीवर अवलंबून नाहीं, तें तुझेचठायीं आहे. आत्मसख्याशीं एक होण्याची माझी अनिवार इच्छा होती, ती पूर्ण झाली आहे;कारण पुरातन काळापासून तो माझा कृतसकल्प होता. आतां जोंपर्यंत आत्मसखा तुमच्यासमवेत आहे, जोंवर त्या ध्येयाच्या साक्षात् दर्शनाचा पर्वकाळ आहे, ते ध्येयदर्शन हृदयांत व मनांत स्थिर धरण्याची, नीट प्रस्थापित करण्याची संधि जोंवर आहे, तोंवर सर्व अंतराय एकीकडे सारा, भेदकारक सर्व गोष्टींचा संहार करा, आणि आत्मसख्याशीं एक होऊन जा. फार मोठी संधि आलेली आहे. तुम्हाला परमार्थप्राप्तीची महापर्वणी उगवली आहे ! मात्र तुमची इच्छा तीव्र व प्रबल असली पाहिजे.

तेव्हां तुम्हाला हें दाखवून देण्याचा माझा हेतु आहे कीं मोक्ष व आनंद प्राप्त करून घेण्याची व अक्षय राखण्याची शक्ति व सामर्थ्य तुमचें तुमच्या अंतर्यामीं आहे. मग तुम्ही बाहेर जगापुढें गेलांत म्हणजे स्वतःच्या अधिकारानें, स्वानुभवाच्या सजीव आधारानें तुमची वाणी बोलूं शकेल.

— २ —

आज तिसरे प्रहरीं मी बागेंत फिरत होतों. फुलें पूर्ण फुललीं होतीं. एक ताटवा होता, त्यांत फुलें रंगीबेरंगी असून प्रत्येक फुलाच्या प्रफुल्लतेची कमाल झाली होती. प्रत्येकानें जगांत येऊन फुलून, मनुष्याला आल्हाद देऊन आपल्या अंतरंगांतला सुगंध प्रकट करावा व सौंदर्यभोक्त्या मानवाला तो अर्पावा ह्या हेतूनें तें एकेक फूल सर्व ग्रीष्मऋतूभर वाट पहात बसलें होतें.

त्याच न्यायाने मनुष्यही सर्वत्र, सर्व देशांत, सर्व कटिबंधांत, सर्व काळांत आपल्या जन्माचे सार्थक करण्यासाठींच धडपडत असतो. राजकीय, सामाजिक, आर्थिक कोणतेंही कार्य असो, त्याच्यायोगानें सुखप्राप्तीद्वारा स्वतःचा विकास करणें, जन्मसाफल्य साधणें ह्यासाठींच त्याचा प्रयत्न असतो. सर्व लोक, पूर्वेचे घ्या कीं पश्चिमेचे घ्या; त्यांची कातडी पांढरी काळी, सांवळी, पिवळी, कशीही असूं द्या; सर्व शोधताहेत एकच वस्तु-ती वस्तु सुख होय; आणि सुख तर सर्वांची घरची ठेव आहे, सुख सर्वांची परमगति आहे, सुख सर्वांचे परमसाध्य आहे. आणि पुनः तें सुख कसें ? तर ज्याला दुःखाचा वारा लागणार नाहीं, जें अक्षय, अनंतजन्मांच्या अनुभवा-भांडाराचें पक्क फल, असें तें सुख आहे. असें शाश्वत, सनातन, अविनाशी सुख खरोखरीच अस्तित्वांत आहे. मात्र तें मिळण्याला अल्पकालिक दुःखांच्या पायऱ्या चढून गेलें पाहिजे. कोठेंही जा. मनुष्य नाशवंत वस्तूंत सुख शोधीत असलेला दिसतो. पौर्वात्य देशांत असो, पाश्चिमात्यांत असो, मनुष्याचें दुःख, क्लेश एकसारखेच असतात. सर्वांच्या वासना त्याच आणि वेदनाही त्याच ! तरी पण सर्वजण वस्तुतः जें शोधीत असतात तें शाश्वत सुख सदा स्वतःचे ठायींच असतें. जें सुख शाश्वत आहे, जें मोक्षरूप आहे, त्याला मनुष्य क्षुद्र, क्षणिक वस्तूंत शोधतो. तो भुकेला असला तर पोटाची शान्ति करूं पहातो; दुःखानें भारावला असला तर आपला आपणाला विसर पडणें यांत त्याचें सुख असतें. संसार सोडून एकान्ताचा, गिरिकंदराचा आश्रय करणारा सन्यासी तेंच सुख शोधतो; प्रतिभावंत मनुष्य, कलाकुशल मनुष्य, नवसृष्टिकर्ता तेंच शाश्वत सुख शोधतो कीं जें सर्वकाळ टिकेल, त्याला सामर्थ्य देईल, दुःखाचे, क्लेशाचे, विपत्तीचे आघात सोसण्याची प्राणशक्ती देईल. परंतु शाश्वत सुख शोधतांना ते अशाश्वतेच्या पाशांत गुंततात. ज्याचा नाश होतो त्या सुखाचा काय उपयोग ? क्षणभर हर्ष व्हावा आणि क्षणानें तो मावळावा, यांत काय राम ? नवसृष्टि निर्माण करावी, तिनें घटकाभर आल्हाद द्यावा, आणि घट-केंत ती नष्ट व्हावी अशा कलेचा काय उपयोग ?

कोठेंही जा, कोठेंही भ्रमण करा, सर्वत्र लोक असे एक विश्रामस्थान उत्कंठेनें शोधीत आहेत कीं जेथें स्वस्थ व शान्ततेनें रहातां येईल, व जेथे आपण सुखाचे स्वराज्याशीं एकरूप होऊन जाऊं. ते सुख शोधण्याचे व त्या

सुखाच्या प्राप्तीचे अनेक मार्ग आहेत; पण सर्वांची गति, ध्येय एकच; मग मनुष्य कोणत्याही प्रवृत्तीचा व कोणत्याही विशिष्ट स्वभावाचा असो. जगांत त्याचा उद्योग कशाही प्रकारचा असो, त्याचे अंतिम साध्य मोक्ष व आनंद हेंच असतें. एकदां साध्य दृष्टीस पडले म्हणजे त्याच्या प्राप्तीसाठी, दुःखाचा स्पर्श होतांच नासणारीं सर्व सुखे तुम्ही बाजूला साराल.

कोणत्याही देशांत पहा, तुम्हाला असें दिसेल कीं सुखाचें स्वराज्य शोधणारा मनुष्य, ते आंत आहे हें जाणत असूनही, भ्रमरासारखा एका फुलावरून दुसऱ्या फुलावर असा भ्रमत व मध वेचीत असतो. त्याची दृष्टि सदा बाहेर असते. तें सुख, ते सौंदर्य, ते स्वास्थ्य व मोक्ष तो बाह्यसृष्टींत मिळवूं पहात असतो. आणि असा तो बाहेरच्या आभासमय जगांत भ्रमतांना असत्याच्या जणुं जाळ्यांत सांपडतो आणि म्हणून तो कर्म उत्पन्न करूं लागतो. जे पेरावे तें उगवतें, जसे कर्म तसें त्याचें फळ येतें. तें टाळतां येत नाहीं. यामुळे तो वारंवार ह्या नश्वर वस्तूंच्या पाशांत अडकतो. एका दुःखांतून दुसऱ्या दुःखांत तो जातो, मोठ्या दुःखांतून त्याहून मोठ्या दुःखांत, लहान सुखांतून मोठ्या सुखांत‡ अशा त्याच्या वाऱ्या चालतात. जोंपर्यंत चंचल सुखदुःखाच्या पिंजऱ्यात असा तो अडकला आहे तोंपर्यंत शाश्वत सुखाच्या राज्यांत त्याचा कधीं प्रवेश होणार नाहीं.

तें आनंदाचे राज्य ह्या बाह्यजगांत नाहीं. येथे आभास व क्षय एवढेंच आहे. तें राज्य तुम्हा प्रत्येकाच्या आंत आहे. तुम्ही तिकडे वळून ते शोधले पाहिजे. जसा फुलाच्या आत सुवास असतो, तो फुलाचा देव जसा फुलाच्या आंत लपलेला असतो, तसे तुमच्या अंतर्यामीं आनंदाचे स्वराज्य आहे; मग तुम्ही उत्क्रान्तीच्या कोणत्याही पायरीवर असा, किंवा कशाही दुःखक्लेशांमध्यें व्यापलेले असा. एकदां ते तुमच्या अंतर्यामीं तुम्हाला

‡ येथे मूळांत Pleasures हा शब्द आहे. अंतिम ध्येयास इंग्रजींत Happiness असें म्हटलें असून त्याचे भाषांतर प्रायः आनंद असें या पुस्तकांत केले आहे. इतर लौकिक सुखांस प्रायः सुख शब्द लाविलेला आहे. पण कधीं अंतिम ध्येयासही सुख म्हटलेलें या पुस्तकांत आढळेल. वाचकांनीं संदर्भावरून अर्थ पाहिला पाहिजे. —भाषांतरकार.

सांपडलें म्हणजे मग सत्यजगांतून मिथ्याजगांत बाहेर पडून तुम्हांस निर्धास्त फिरतां येईल.

क्षणभर एक दृष्टान्त देतों. त्यावरून तुम्हांला स्वच्छ दिसेल कीं सर्व मनुष्यांची परमगति, अंतिम साध्य, मोक्ष व आनंद होय. क्षणभर कल्पना, करा कीं एक पर्वतशिखर आहे; अस्तोन्मुख सूर्याचे किरण त्यावर पडले आहेत, सरत्या दिवसाचें सौंदर्य तेथें एकवटले आहे. पर्वताकडे जाणाऱ्या रस्त्यावर अनेक टप्पे आहेत, व तेथे अनेक विश्रामकुटिका असून त्यांत देवांच्या मूर्ती आहेत. प्रत्येक ठिकाणचा पुजारी लोकांस बोलावून सांगत आहे कीं 'येथें थांबा, व ह्या देवाची पूजा करा.' मग जरी मनुष्य जाणतो कीं, अंतिम-ध्येय वेगळें आहे, तरी, तेथे तो थांबतो, वेळ फुकट घालवितो, आराम करतो; आणि अशा रीतिनें विनाकारण कर्म उत्पन्न करून त्यामुळें जन्ममरणाच्या चक्रांत अडकतो; तेव्हां, जर मनुष्य दुर्बल असेल, नीट शिखर गांठण्यापुरती निर्धारशक्ति व बळ त्याचेठायीं नसेल, तर त्या टप्प्यांतून त्याला गेलें पाहिजे, आणि प्रत्येक कुटिकेत विसांवा घेतला पाहिजे. ती निर्धारशक्ति, तो निश्चय, ती जन्मसार्थक्याची उत्कंठा पाहिजे असेल तर माणसाने स्वतःच्याआंत गेलें पाहिजे आणि तेथें जें सत्य आहे तें डोळे उघडून पाहिलें पाहिजे.

तुम्ही बहुतेक लोक कोणतें तरी चित्र पूजीत असतां; आणि तें चित्र जिवंत झाले म्हणजे म्हणतां कीं तें असे जिवंत झालें नसतें तर बरें झालें असतें. कारण तें चित्र तुम्हाला सांगूं लागतें कीं नुसत्या नश्वर, फाटणाऱ्या, चित्रपटाची पूजा करूं नका; तुम्ही आपल्या अंतरंगांत जा. तें म्हणतें 'आंत जा, आणि तेथें सत्याचें राज्य, तथ्याचें राज्य, मोक्षाचें–आनंदाचें राज्य आहे, तें तुमचें तुम्ही शोधून घ्या.' तेव्हां तें तुम्हांस जड वाटतें. कारण तसें करण्याला विचार पाहिजे; त्याला शिस्त, अभ्यास पाहिजे; आत्मपरीक्षा, आत्मचिकित्सा पाहिजे; आणि तें करणें बहुतेकांच्या जिवावर येतें. तुम्हाला असें पाहिजे कीं एक अलौकिक चमत्कार घडावा आणि त्यानें एकदम तुम्हांस नेऊन त्या पर्वत-शिखरावर बसवावें. तुम्ही अशी वाट पहात बसलां आहां कीं अकस्मात् मेघगर्जना व विजेचा कडकडाट आणि चमचमाट होऊं लागावा व त्यामध्यें कोणीएक अद्भुत, दिव्य विभूती प्रगट व्हावी; तिनें एक औषधी द्यावी, आणि तिच्यायोगानें एकदम तुमचें दिव्य रूपांतर व्हावें, व

तुमच्याआंतलें किल्मिष भस्म होऊन एकदम पर्वतशिखराबर उड्डाण करण्याचें सामर्थ्य त्यानें तुम्हांला यावें.

परंतु मित्रा, सत्य तुझ्या अंतर्यामीं आहे. मला सत्य सांपडलें आहे, मी त्या सत्याशीं एकरूप झालों आहें, अंतरंगांत मी व माझा आत्मसखा एक झालों आहों. म्हणून माझी ही इतकी उत्कंठा कीं तुझ्या अंतरंगांतलीं द्वारें कशीं खुलीं करावीं हें तुला सांगून तुझ्या स्वतःच्या हृदयांत, तुझ्या स्वतःच्या मनांत तुझा प्रवेश करून द्यावा. म्हणजे तेथें तुला शान्ति व स्वास्थ्य लाभेल; परंतु तुला हेंही कळलें पाहिजे कीं दुःख म्हणजे काय, क्लेश म्हणजे काय, ताप म्हणजे काय; तसेंच शाश्वत सुख कोणतें, अक्षय आनंद कोणता हेंही समजलें पाहिजे. अनुभवानें शहाणपणा येतो; आणि शुद्ध अंतःकरणानें समजूत येते. पण माणसास जर अनुभव नाहीं, आणि त्याच्या हृदयास समजूत जर नको आहे तर तो मनुष्य आजूबाजूच्या विश्रामस्थानात दीर्घकाळ राहील. परंतु सध्यां हृदयसखा, आत्मसखा, तुमचेजवळ आहे. म्हणून, तीं विश्रामस्थानें सोडून हृदयसख्याशीं सायुज्य तुम्हास मिळण्यासारखे आहे.

हेंच तर प्रस्तुत पर्वणीचें महात्म्य आहे. उन्हाळ्याचे दिवस थोडे—त्यांतच माणसाला गवत सांठवितां येतें, **अतिथीचे** स्वागताची सिद्धता करायला संधी तेवढीच. शेवटीं तुम्हास दिसेल कीं आत्मसखा म्हणजे दुसरा कोणी नाहीं तर तुमचाच जीव आहे. मात्र पूर्ण उन्नति, पूर्ण विकास पावलेला, थोर झालेला, तुमचाच जीव पण पूर्णत्व पावलेला असा तो आहे! एकदां तुम्हाला तो तुमचे हृदयांत सांपडला, आणि ती मूर्ति तुमचे चित्तांत पक्की स्थापली गेली, म्हणजे झालाच शाश्वतसुखाच्या राज्यांत तुमचा प्रवेश. मुक्तिही तीच; तिला बंधनें नाहींत.

तेव्हां, ज्याला मुक्ती हवी, तें सुख हवें, त्यानें आपल्या अंतर्यामीं संचार केला पाहिजे, व स्वतः तें स्वराज्य शोधून घेतलें पाहिजे. तें निजधाम सांपडेल, तेव्हां असे आढळेल कीं तें सर्वांचें स्वराज्य आहे; कां कीं सर्व लोक तें शोधीत आहेत, व सर्व लोक दुःखानें दुःखित आहेत, कष्टी आहेत. जे त्या झऱ्याचें पाणी पितील, अनुभवापोटीं येणाऱ्या शहाणपणाची जोड जे जोडतील ते बाहेरील जगांत जाऊन दुःखितांना मुक्तिरूप शाश्वत आनंद देऊं शकतील.

— ३ —

आज तुम्ही ध्यान देऊन माझे शब्दाचा ध्वनि ऐकायला पाहिजे, माझ्या बोलण्याचा भावार्थ संपूर्णपणे ग्रहण करावयाला पाहिजे; म्हणजे तुमचें मन आणि हृदय या दोघांचीही समजूत पडेल. ह्या संध्यासमयीं माझी अशी इच्छा आहे कीं जमल्यास तुम्हाला माझ्या मनांत व हृदयांत घेऊन जावें आणि माझी मनकामना कशी सफल झाली, मोक्ष व आनंद देणारी निजशान्ति, निजस्वास्थ्य मला कसें लाभलें, आत्मसख्याचें दर्शन व त्या प्रियतमाची प्राप्ति मला कशी झाली हें तुम्हांला दाखवावें. तुम्हाला पूर्ण समज व उमज पडावा ह्यासाठीं माझें असें मागणें आहे कीं, तुम्ही मला 'बाबावाक्यम् प्रमाणम्' असें मानून चालूं नका; कारण माझा हेतु हा आहे कीं तुम्ही उमज पाडून घेतलात तर तुमच्या हृदयांत, गाभाऱ्यांत, तुमचे तुम्हाला नेऊन सोडावें. म्हणजे तेथें माझ्या आत्मसख्याची भेट होईल, शान्तीचा मार्ग लाधेल; तेथें निभ्रान्तपणा आहे, तेथें संशयाची सावलीही नाहीं, असें तुम्हांस आढळेल.

माझा भाव पूर्णपणे तुमच्या ध्यानीं यावा ह्यासाठीं ह्या घटकेपुरता, कदाचित् ह्या जन्मापुरता सत्याचा साक्षात्कार मी तुम्हाला करून दिला पाहिजे. म्हणजे, सत्याची तुमची कल्पना व धारणा ह्यांच्याभोंवतीं पूर्वग्रहाचे तट जे तुम्ही ह्या जन्मांत उभारले असतील ते पाडण्याचें सामर्थ्य तुम्हाला येईल. कारण तुमची लघुवृत्ती तुमच्या संकुचित कल्पना, जें कांहीं गबाळ तुम्ही स्वतःच्या अंतर्यामीं सांठवलें आहे तें, जें तुमच्या स्वभावांत दृढमूल होऊन बसले आहे, ज्याने तुमचें मन आकुंचित केले आहे, ज्याने तुमची सत्य ओळखण्याची दृष्टिच विकृत केली आहे, त्या सगळ्याचा मला तुमच्या हातून समूळ संहार करायचा आहे. मी सांगतों त्या गोष्टी अगदीं साध्या आहेत, इतक्या साध्या कीं भानगडीची संवय असलेल्या मनाला त्या कळणार नाहींत. कारण भानगडींनीं भरलेले हृदय सत्य घेऊन त्यास विद्रूप करतें. मी जें सांगतों त्याचा, लोकांची खात्री करण्यासाठीं किंबहुना तुम्ही आपल्या स्वतःची खात्री करण्यासाठींही, वेदवाक्य म्हणून उपयोग करूं नका.

मी जाणून आहें कीं ह्या मेळ्यांत अनेकांना अनेक विषयांसंबंधीं

संशयाची जळजळ लागली आहे आणि स्वच्छ ज्ञानानें व योग्य समजुतीनें तिचें शमन व्हायला पाहिजे आहे. म्हणून माझें तुम्हाला असें आग्रहाचें सांगणें आहे कीं शब्दांवर रणें माजवूं नका, त्यानें घात होईल. ह्या मेळ्यांत (आणि जगांतही) असे लोक आहेत कीं जे म्हणतात, आमचा विश्वास बसायला, म्हणजे वस्तुतः जें अगदीं साधें सरळ आहे—आणि मोठें सत्य सदा साधें, सरळच असतें—तें कळण्याला कांहीं तरी चमत्कार दिसला पाहिजे. कोणीएकाने, खरेंच, मला म्हटलें कीं ‘चमत्कार दाखवा, म्हणजे माझा विश्वास बसेल कीं तुम्ही आपणांला जे म्हणावितां तेच तुम्ही आहां.’ परंतु तुम्हास सत्य समजावें व ते तुम्ही ग्रहण करावें ह्याहून मोठा चमत्कार कोणता व्हावयाचा बरें? आणखी, कोणीएक मनुष्य तुम्हाला तुमचे हृदयांत, तुमचे मनांत, नेऊन घालूं शकतो, तेथें सत्य शोधार्थ तुम्हांस सहाय करूं शकतो, याहून मोठ्या चमत्काराची आवश्यकता तरी काय? समुद्राभिमुख वहात जाणारा शान्त, निस्तरंग नदीप्रवाह, स्वतः समुद्राच्या लाटांचे तांडव, निर्मलरम्य गुलाबाचें फूल, किंवा निरभ्रनीलगगनमंडलांतला एकाकी मेघ हे हृदयंगम होण्याला कशाला पाहिजे चमत्कार? अशा प्रसंगीं प्रेक्षकाच्या, शोधकाच्या, दुःखिताच्या मनाचा निश्चय असा व्हायला हवा, कीं ज्यानें त्याच्या विचाराचा ओघ बदलेल, त्याच्या मनाची बैठकच निराळी होऊन जाईल. मी जाणतों कीं चमत्काराने मोहित होणे सोपें आहे, आणि विचारानें सत्याचा निश्चय करणें व विश्वास ठेवणे हे कठिण आहे. मला एखादा चमत्कार करतां येईल तर तुम्ही तत्काळ विश्वास ठेवाल. पण खरा विश्वास, खरी श्रद्धा, अशा क्षणिक गोष्टींच्या पोटीं जन्मत नाहीं. चमत्कार क्षणाचा; सत्य अक्षय, चिरकाळचें! माझा हेतु असा आहे कीं तुम्हांला माझे हृदयांत घेऊन जावें, आणि मला प्राप्त झालेल्या ज्ञानाची तुम्हाला समजूत करून द्यावी. आणि ह्यासाठीं माझे सांगणें आहे कीं, “तुमच्या सर्व भानगडी, सर्व मतमतान्तरे व कल्पना एकीकडे ठेवा म्हणजे तुम्हांला तें सत्य कळेल.”

मी सांगितलेंच आहे कीं परमात्म्याच्या कृपेनें मला आपला व्यक्तीचा आत्मा एका उच्च भूमिकेवर स्थापित करतां आला आहे. तेथून जीवनाचा देखावा, सामान्य मनुष्याला दिसतो त्याहून अगदीं निराळाच दिसतो.

इतरांवर स्वार होणारा संसार तेथें माझ्यावर स्वार होऊं शकत नाहीं. तेथें ससाराचें, जीवनाचें शुद्ध व साधें रूप कळतें. तो मोक्षाचा आणि आनंदाचा प्रसाद मला मिळण्याचा सुयोग प्राप्त झालेला आहे. संकुचित मायाममतेच्या पाशांतून, सर्व दुःखाकष्टांतून स्वतःला सोडवावें, मोकळें करावें, तेव्हांच तें शाश्वत सुख लाधते. त्यांतलें कांहीं ज्ञान तुम्हांला द्यावें तृषार्तांना शान्ति देणाऱ्या त्या जीवनामृताचें दान करावें हा माझा कृतसंकल्प आहे, आणि तसें मी करणार आहे. मग मला कोणी कांहीं म्हणो, हें नांव देवो नाहीं तर तें देवो; ही दानाची इच्छा अत्युत्कट, जाज्वल्य आहे, म्हणून तर तुम्हाला मी आपले हृदयाशीं नेणार आणि निजज्ञान देणार. दुसऱ्यांना शाश्वत सुख देणें, जें त्यांना स्वतःच्या आधिव्याधींतून, स्वतःच्या क्षुद्रपणा–सकुचितपणांतून, पूर्वग्रहांच्या बंधनांतून मुक्त करील, असें सुख दुसऱ्यांना देणे ह्यांत ते सत्य वसत असते; आणि हे मी करूं शकेन, कां कीं माझे आंत जिवत झरा आहे; तेव्हां शब्दांवर मतभेद आणि कलह करूं नका. मुख्य मुद्याची गोष्ट ही आहे कीं तुम्हाला सत्य कळावें. कारण तुम्ही दुःख भोगीत आहां; व मला प्राप्त झालेलें सत्य प्राप्त व्हावें अशी तुम्हाला उत्कंठा आहे; तुम्ही जन्ममरणाच्या चक्रांत अडकलां असून त्याच्या तावडींतून सुटूं पहात आहां.

कोण सत्य देतो, ज्या पर्वतशिखरावर तुम्हाला स्वतःला सुखस्वराज्य सांपडणार, त्यावर चढण्याची शक्ति देणारे ज्ञान कोण सांगतो, ह्याचे कांहीं महत्त्व नाहीं. तुम्ही जर एका व्यक्तीची, समजा कृष्णमूर्तींची पूजा करूं लागाल तर दुःख पावाल. कारण ती व्यक्ति निघून जाईल. तिच्यामागें जरामरण ठेवलेलेंच आहे. ती जात्याच अशाश्वत वस्तु. परंतु तेंच तुम्ही सत्याचे भक्त व्हा, म्हणजे सत्याचें निजांग बनाल. जेव्हां तुम्ही सूर्यास्ताची शोभा पहातां तेव्हां ती शोभा तुमचे हातीं एखादी स्मृति, एखादी नीतिनियमांची जंत्री, सिद्धान्ताचें बाड, किंवा विधिनिषेधाचे कोड देत नाहीं. पण तुम्ही त्या सौंदर्यांत तन्मय, तल्लीन व्हा; म्हणजे स्मृति, नीतिनियम, कायदेकानू ह्या भगभगीची आठवणही होणार नाहीं. तें ज्ञान मिळालें, ती समजूत आली, म्हणजे अशाश्वताच्या, कवडीमोल भानगडींच्या जाळ्यांत तुम्ही कधीं गुंतणार नाहीं.

मी हें सर्व सांगतों, पण ह्यांत अधिकाराचा भाग मुळींच नाहीं. माझी इच्छा इतकीच कीं तुमची योग्यता, तुमची शक्ति तुम्हाला पटवून द्यावी, तुमची आकांक्षा वाढवावी; आणि त्यायोगानें तुम्ही परमार्थ साधून इतरांना दान करावें. मी अमुक किंवा तमुक आहें कीं नाहीं; म्हणवतों तोच आहें कीं नाहीं ह्याचें काय महत्त्व आहे? मी जो आहें तो आहेंच आहे. जें मी नाहीं तें मजपासून आपोआप गळून पडेल. जें मी जोडलें, जे मजपाशीं सुरक्षित आहे, किंबहुना जें माझें अंग बनलें तें कदापि जाणार नाहीं.

तेव्हां इतकी समजूत करून घेऊन आपण त्या ज्ञानानें ह्या प्रश्नाचें निरक्षिण करूं कीं जगाला काय हवें आहे? तर, जगाला अशीं माणसें हवीं आहेत कीं ज्यांना सत्य प्राप्त झालें आहे, आणि जीं पंथ, मत व वाद यांत बुडलेलीं नाहींत. तुम्ही मला कोण मानतां, किंवा मी तुम्हांला काय समजतों, ह्याची जगाला क्षिति नाहीं. पण आपल्यापाशीं ज्ञान असेल तर त्याची मात्र त्याला तहान लागलेली आहे. असल्या क्षुद्र वादांत जर तुम्ही कालाचा अपव्यय कराल तर जे दुःखी—कष्टी आहेत, सत्यज्ञानासाठीं आतुरजन जे आहेत, त्यांना आणि त्यांच्या अडचणींना तुम्ही विसरून जाल.

मी म्हटलेंच कीं, माझ्या मनांत तुम्हाला ती समजूत, तें ज्ञान देण्याची तीव्र उत्कंठा लागलेली आहे कीं ज्याने शब्दांचा कीस, शास्त्रें, दर्शनें यांचें ओझें, ह्या सर्वांपासून तुम्ही सुटाल, मोकळे व्हाल. तें ज्ञान तुमच्यापुढें आरसा ठेवील. त्यांत तुमचें रूप जसें आहे तसेंच दिसेल; व तें पाहून डोंगर चढायचें बळ तुम्हाला येईल. तुमचा तुम्हाला शोध लागावा, तुमची तुम्हाला प्राप्ति व्हावी, तुमची तुम्हाला शक्ति मिळावी, हीच मुख्य गोष्ट. तुमचे सिद्धान्त, पंथ आणि मतें ह्यांचें महत्त्व नाहीं. तुम्हीं दुःखांत तळमळत असतां, म्हणून तुम्हाला वाटतें कीं दुसऱ्यानें शब्दांचा मंत्र फुंकावा आणि आपण दुःख विसरावें; मंद, मधुर गीतानें मनाला मोहनी पडावी, तंद्री लागावी. पण अशा उपायांनीं कधीं दुःखाचें मूळ नष्ट होणार नाही. तें कांहीं काळ टळेल. पण जसा दुसरे दिवशीं सूर्योदय न चुकतां होतो तसें तें दत्त म्हणून पुढें येईल. म्हणून दुःखाचा नाश व्हावा, आणि दुःख उत्पन्न करणाऱ्या कारणाचाही नाश व्हावा, ह्यासाठीं तुम्ही

स्वतःच्या अंतर्यामीं गेलें पाहिजे आणि तेथें सत्याचें जगत्, आनंदाचें जगत् शोधून मिळविलें पाहिजे.

जगाचा प्रश्न म्हणजे व्यक्तीचा प्रश्न होय. व्यक्तीला शान्ति मिळाली, सुख मिळालें, उदंड सहिष्णुता व परोपकाराची तीव्र इच्छा आली, म्हणजे जगाचा प्रश्न असा वेगळा उरणारच नाहीं. तुम्ही स्वतःचा प्रश्न तसाच टाकतां, आणि आधीं धांवतां जगाचा प्रश्न सोडवायला! अगोदर स्वतःच्या मनांत व हृदयांत उमज आणि शान्ति हीं स्थापन न करतां तुम्ही देशांत आणि राष्ट्रांत दुसऱ्या लोकांच्या मनांत स्वास्थ्य व शान्तता स्थापायला जातां. परंतु समजूत, निश्चयसामर्थ्य हे जर आधीं तुमचे आंत उत्पन्न झाले असले तरच ज्ञान व शान्ति तुमचेद्वारें बाहेर उत्पन्न होईल.

जीवनाचा उद्देश काय? दुःख कशासाठीं आहे? क्लेश कशासाठीं असतात? अश्रूंचा पूर कशासाठीं आहे? संयम करून काय मिळतें? धडपड करून काय उत्पन्न होत असतें? तर बाबा, ही उत्क्रान्तीची क्रिया आहे. अगदीं आरंभापासून, पृथ्वीचा पाया घातल्यापासून, ज्योतीतून स्फुलिंग बाहेर पडून ती आपल्या विभक्त मार्गास लागल्यापासून हीच क्रिया आहे. जीव त्या पर्वतशिखराची चढण चढत असतो आणि एकीकडे व्यर्थ गोष्टींचा संग्रह करीत असतो, आणि त्या संग्रहानें कर्म उत्पन्न होत असतें; पण पुढें त्या चढावाबर प्रगति झाल्यानतर हळूहळू एकेक गबाळ टाकूं लागतो, व तो साधा होत जातो; शेवटीं जाऊन मूळ ज्योतीत मिळतो, स्वतः सत्य बनतो. तुम्हीं ज्योतींतून निघालां, ज्योतीला पुनः जाऊन मिळणार, आणि आदि, अंत एक होणार. हाच जीवनचा उद्देश, की जो स्फुलिंग वेगळा होऊन बाहेर पडला, त्याचा वेगळेपणा नाहींसा व्हावा. ते केले कीं सत्य तुमच्या आंत स्थापित झाले, तुम्हीं सत्याचे अंश झालांत, किंबहुना तुम्हीच स्वतः सत्य बनलांत.

तुम्ही येथून गेलां म्हणजे, तुमच्या मुखावर तेज, तुमच्या अंतःकरणांत आनंद पाहून लोक तुम्हाला प्रश्न करतील; कां कीं त्यांनाही तुमच्या अनुभवांत वांटेकरी व्हावेंसें वाटेल. तुम्हीं त्यांना आनंद कसा द्याल? तुम्ही काय असें सांगणार कीं "अमुक पदवीची एक व्यक्ती आहे, तिच्यावर तुम्ही श्रद्धा ठेवली पाहिजे?" किंवा तुम्ही असें म्हणणार कीं, "अमुकानें माझें हृदय उघडून दिलें, मला उमज पाडून दिला, आणि त्याचा

बांटा मी तुम्हांला देतों ?" या दोहांपैकीं तुम्ही काय सांगणार तेवढयावर तुमची परीक्षा होईल; तेवढयावरच तुम्हाला इतराना सहाय करतां येईल. लोकांना नांवे, पदव्या, चिन्हे, संघ, संस्था, कशाची आवश्यकता नाहीं. पंथ, सिद्धान्त, बळेंच लादलेलीं मते, ह्यानीं त्यांचे समाधान होणार नाहीं. तें होईल अंतर्यामींच्या समजुतीनें, सहानुभूतीनें, प्रेमाने. ज्यानें त्यांची तहान भागेल, उत्कंठेची तृप्ति होईल, जळजळ शमेल, शान्ति व निश्चिति मिळेल व जेणेकरून त्यांची त्याना शक्ति लाभेल, तें त्याना हवे. पण तुम्ही त्यांचेवर प्रामाण्याचा, अधिकाराचा छाप मारला, मग कोणाचा कां माराना--कीं ते त्या अधिकाराच्या मर्यादेंत बांधले गेले. तें बंधन त्यांना दुःख देणार, आणि एक अशी वेळ येणार, की तें अधिकारबंधन ते तोडूं पहाणार.

तुम्हा प्रत्येकाच्या अंतर्यामीं जें सत्य बसत आहे तें उघडे करायला पाहिजे, आणि त्या कामीं तुम्हाला उत्तेजन देण्याचें सामर्थ्य माझ्यांत बसत आहे. सूर्य जसा गुलाबावर प्रकाशतो, कमळावरही प्रकाशतो, तसे ते उत्तेजन असतें. तुम्हाला आतुरता असेल, पुरेशी समजूत असेल व मनांत हेतु असेल तर तुम्हाला त्या सत्याचा उमज पडेल. शुद्ध अर्थानें, साध्या रूपाने ते ग्रहण करतां येईल. तुमच्या स्वभावांत गुंतागुंती असतील तर तुम्ही तें विद्रूप कराल. समुद्राप्रत वहात जाणारी नदी कांठच्या सर्व लोकांना जीवन देते. ते गोरे आहेत कीं काळे, की सांवळे, कधीं विचारीत नहीं. ती काय ते सारें एवढेच ध्यानांत धरते की मला आपला झरा जिवंत व शुद्ध राखला पाहिजे, म्हणजे मला कांठच्या तहानेल्या माणसांना व भूमींत मुळें खोल रोवून उभ्या असलेल्या झाडांना पोसतां येईल. माणसें आपल्या यंत्रांनीं व भानगडींनीं आपला प्रवाह दूषित करतील कीं काय ह्याची पंचाइत ती करीत नाहीं.

तेव्हां मित्रहो, ज्याअर्थीं जगाच्या सर्व भागांतून तुम्ही येथें एकत्र झालां आहां, आणि येथून पुनः आपआपल्या ठिकाणीं तुम्हाला जायचे आहे, व येथें ऐकलेल्या गोष्टी लोकांना निवेदन करायच्या आहेत, त्याअर्थीं माझे तुम्हाला सांगणें आहे, कीं सत्याविषयीं तुमच्या मिथ्या कल्पना, तुमचीं संकुचित मतें, तुमच्या मनाचीं बंधनें तुम्ही तोडून टाका, म्हणजे मग जे भुकेले असतील

त्यांचें अक्षय समाधान करणारें अन्न त्यांना तुम्ही देऊं शकाल. तें करण्या साठीं, ( तुम्ही जसा आपला आंगरखा काढून ठेवतां, तसे ) आपले पिटुकले वाद आणि मनाचीं गुंताळीं एका बाजूला काढून ठेवलीं पाहिजेत आणि निरभ्र आकाशांत एकटाच तारा असावा तसे साधे तुम्ही झालां पाहिजे. जर एखाद्या गुलाबाचें सौंदर्य, सूर्यास्ताचें सौंदर्य किंवा आकाशाचें सौंदर्य, समक्ष पाहूनही तुम्हाला त्याचें मर्म समजत नसेल, त्याचा रसास्वाद घेतां येत नसेल तर त्या सौंदर्याविषयीं तुम्हांला मी सांगणें व्यर्थ आहे. तुमच्या डोळ्यांवर पडदा असला तर मी तो कदाचित् फाडून टाकूं शकेन. पण पुनः दुसरा पडदा उभा करण्याचा गुण जर तुमच्यांत असेल तर दुर्भाग्य तुमचें! तुम्ही जेव्हां जगांत बाहेर निघाल, तेव्हां तुम्हाला सत्याचें ज्ञान झालेलें असलें पाहिजे; पण जर तुमची समजूत कोती असेल, तुमचें मन संकुचित असेल तर तुम्ही तें सत्य विकृत कराल; आणि तुम्ही लोकांस सहाय करूं शकणार नाहीं. मी जाणतों कीं तुम्ही आपली प्रीती, आपली भक्ती, कृष्ण-मूर्तीच्या व्यक्तीला अर्पण करतां; पण मित्रहो, तेवढ्यानें कार्यभाग होणार नाहीं. तुम्ही सत्य जाणलें पाहिजे; ह्या चार दिवसांत आपल्या हृदयांत जाऊन तेथें कृष्ण–मूर्ति शोधून घेतली पाहिजे, आणि तेथें ती मूर्ति तुम्हाला सांपडेल. जसा मला माझा आतमसखा, माझा प्रियतम सांपडला तसा तुम्हाला तो कृष्ण-मूर्ति सांपडेल आणि तो तुम्हाला सांपडला म्हणजे शान्तिपंथांत तुमचा प्रवेश झाला, व मोक्षाचीं, आनदाचीं द्वारें तुम्हांला उघडलीं असें होईल.

— ४ —

पूर्वींच्या काळीं मनुष्य जगाच्या गडबडी व उलाढाली ह्यांपासून दूर वनांत जात असे आणि तेथें आपल्या अंतरींच्या सत्याच्या जगतांत शिरून सुख–शान्ति मिळवीत असे; एकान्तांत जाई आणि तेथें आपल्या स्वतःचा शोध करी, आत्म्याची उपासना करी, स्वतःशीं हितगुज करी; आणि जेथें मोक्ष आहे, आनंद आहे, त्या धामांत प्रवेश करी. पण आतां हल्लींच्या काळीं तुम्हांला भौतिक जगांत आणि आत्मिक जगांत बरोबरच पुनर्घटना करायची आहे, तेव्हां तुम्हांला जगांतच राहून मोक्ष व आनंद शोधून काढला पाहिजे. एकीकडे भौतिक घटना चालू असतांना, त्याच वेळीं आंत आत्मिक बल व आत्मिक निश्चय ह्यांची घटना केली पाहिजे; आणि पुनः त्या घटनेच्या

कर्मापासूनही अलिप्त राहिलें पाहिजे. जेव्हां चित्रकार चित्र काढतो, तेव्हां तो त्या चित्राशीं बांधलेला रहात नाहीं. त्याचे कार्य इतकेंच कीं मनःपटा-वरची कल्पना स्थूलपटावर उतरायची. तेवढें केलें कीं झाला तो मोकळा. तसे तुमच्यापैकीं जे अजून शोधीत आहेत, चांचपडत आहेत, प्रत्येकाचे आंत असलेल्या सत्याच्या, सुखाच्या राज्यांत जाऊं पहात आहेत, त्यांनी बाह्य आकाराच्या जगांत, असत्याच्या, व्यक्ताच्या जगांतच राहिले पाहिजे, आणि असत्य, नश्वर वस्तूंमध्यें कार्य करीत असतांच सत्य शोधिलें पाहिजे. त्यांनीं सत्याचे भक्त, सत्याचें अंग बनले पाहिजे, आणि त्याबरोबरच खोट्या आणि क्षणिक वस्तूंमध्यें उद्योग केला पाहिजे. पूर्वीप्रमाणे आत्मशोधन, आत्मचिंतन करण्यासाठीं, संसार सोडून वनांत, आश्रमांत, गिरिकंदरात एकान्तीं जाऊन तुम्हाला रहातां येणार नाहीं. ती खरी मुक्तीच नाहीं. तो केवळ स्वार्थाचा शोध, स्वार्थाची प्राप्ती होय. आजच्या काळीं ज्यांना खरीखुरी आत्मप्राप्ति कर्तव्य असेल त्यांनीं जगांतच कार्य करीत असतांना, जगांतील अशाश्वत वस्तूच उदात्त व सुंदर करून जग निर्दोष आणि उत्कृष्ट बनवीत असतांना, धडपडत व तळमळत असतांना, दुःख सोशीत असतांनाच मोक्ष व आनंद शोधला पाहिजे.

ह्या दृष्टीने पहातां मोक्ष म्हणजे नाश नव्हे, तर त्याच्याउलट संघटन आहे. मुक्ती नास्तिरूप, नकाररूप नाहीं; उलट अस्तिरूप, होकाररूप आहे. मुक्त होणे म्हणजे शून्यांत शिरणे, स्वतः नाहींसे होणे असें नव्हे; तर सत्यांत शिरणें, सत्याचें अंग होणें, आणि बाहेर जाऊन कोंडलेल्या पाण्यावरील प्रतिबिंबास भजणारांची सुटका करणे असे आहे. हे ध्यानांत धरा म्हणजे तुमच्या अंगीं मोठें चैतन्य व उत्साह येईल; आणि तुम्ही जगाचे ईश बनाल.

जेव्हां हा मोक्ष तुम्हांला मिळेल, आणि हा आनंद तुमचें निजांग बनल, तेव्हां तुमच्या साक्षात् अनुभवास येईल, कीं मोक्ष हें अंधुक स्वप्न नव्हे, तर वास्तविक त्यांत नवीन घडण आहे. तुम्ही तो समोर अग्नि पहातां तितकाच मोक्ष प्रत्यक्ष आहे; आणि त्या नाचत्या ज्वाळांसारखाच तो जिवंत व चैतन्यमय आहे. आतां असे कांहीं लोक आहेत, ज्यांची कल्पना अशी असते कीं, मोक्ष म्हणजे जगाचा नाश होय, अस्तित्व नाहींसे करणाऱ्या पोकळींत शिरणें होय. पण खरी गोष्ट ही, कीं वेगळा आत्मा तेथें उरत नाहीं, तेथे सर्वांचा आत्मा असतो, तेथे अखिल जग एक असते;

त्यांत गवताची काडी, प्रत्येक पान, फूल, झाड, प्रत्येक मनुष्यप्राणी, अनंत आकाश सर्व कांहीं असते. बऱ्याचजणांची कल्पना अशी आहे कीं, मोक्ष म्हणजे सर्व वस्तूंचा नाश, ऐहिक सुखस्वास्थ्याच्या जगताचा नाश, कला, शास्त्रें, सौंदर्य या सर्वांचा समूळ संहार! असा भ्रम बऱ्याच लोकांचा आहे म्हणूनच मी तुम्हांला बजावतों कीं, तसें नाहीं; भोंवतालच्या वस्तु अधिक सुंदर, अधिक उत्कृष्ट, अधिक वैभवशाली करीत रहाण्यानें मोक्ष प्राप्त होत असतो; मात्र तसे करीत असतांना त्या सर्व पदार्थांपासून माणसानें अलिप्त राहिले पाहिजे.

जसा वायु फुलांतून सुगंध वाहून नेतो, तरी फूल तसेंच रहातें, तसा मुक्त मनुष्य असतो; तो प्रत्येक जात्यायेत्याला प्रसन्नता देणारा, आनंद देणारा असतो. तेव्हां असा मोक्ष, असा आनंद तुम्हांपैकीं जे कोणी शोधीत असतील, त्यांनीं नुसतें सुखस्वप्नांत रमावें, नुसतें मननांत गढून बसावें, नुसते निवान्त स्थळीं रहावें असे नाहीं; तर त्याबरोबरच त्यांनीं ह्या अशाश्वत वस्तूंच्या जगांत, येथील सुखसौंदर्य अल्पकालिक आहे तरीही, जग भव्य, सुंदर बनविण्यासाठीं, जन सुखी करण्यासाठीं, अखंड झटलें पाहिजे. स्थूलाचा विसर पडावा यासाठींच त्याला आधीं उत्कृष्ट केले पाहिजे. मोक्षप्राप्तीसाठीं त्याची उपेक्षा करतां कामा नये.

तुमचे ज्ञान–समजूत–शहाणपण, जर तुम्ही ते स्वतःचे बंध तोडण्याचे कामीं न लावाल तर, त्या विद्येचा, समजुतीचा, शहाणपणाचा उपयोग काय? तुमच्यांतले पुष्कळजण कदाचित् पुस्तकीविद्येंत मजपेक्षां पंडित असतील; या जन्मीं वयानें पुष्कळ मजहून मोठे आहेत; पण मी मुक्ति मिळविली आहे, मला आनंदाचें साम्राज्य लाधलें आहे, आणि त्यामुळें मीं तुम्हांला सांगतों कीं, तुम्हांला त्या निजधामांत चलायचें असेल तर सर्व बंध तोडा, तुम्हांला जखडणारे दुःखाचे पाश छेदून टाका. कारण जोंवर मनुष्य क्लेशाच्या पाशांनीं बद्ध आहे, दुःखांच्या बंधनांनीं जखडलेला आहे, तोंवर त्याला स्वतःच्या अंतर्यामीं शिरतां येणार नाहीं, त्याला स्वतःचे दर्शन स्वच्छ होणार नाहीं.

जेव्हां तो सर्व वस्तु त्यागील, तेव्हां मन व हृदय हें त्याला स्वाधीन ठेवतां येईल. कारण डोळा जाईल तिकडे हृदय जाते; आणि मन हृदयाचे पावलावर पाऊल ठेवून अनुसरतें. सत्यशोधनाची ही इच्छा उत्कट होईपर्यंत मनांत

सारखी अस्वस्थता असते. कारण तुमचेंच कर्म तुम्हांला दुःख देत असतें. तुमच्या स्वतःच्या वासना, तुमचे स्वतःचें अल्प-ज्ञान, तुमचे स्वतःचे तुच्छ हेतु, तुमचे स्वतःचे क्षुद्र मान आणि तुमचीं क्षुद्र ढोंगें हींच तुम्हांला दुःख देतात. हें फोलकट पार झाडून टाकून मोकळें होण्याचें सामर्थ्य तुमच्यांत नाहीं, तोंवर कदापि तुमचा पाय त्या राज्यांत, तें तुमच्याच अभ्यंतरीं असूनही, पडूं शकणार नाहीं.

एक काळ असा होता, कीं इतर माणसांप्रमाणें कृष्णमूर्ती ही व्यक्तीही, मुक्तीची इच्छा असूनही, आपल्याच वासनेच्या फेऱ्यांत, ज्ञानाच्या अहंकारांत, क्षुद्र अभिमानांत आणि ढोंगांत गुंतून पडे. मग त्यानें इच्छा धरली, कीं जीवनाचा मुख्य हेतु जे सत्य ते मिळवायचें; तें सत्य, ती विद्या आणि आपली अविद्या ह्यांतील भेद नष्ट करायचा. त्या वेळीं तो दुःखांत होता, जन्ममरणाच्या चक्रावर बांधलेला होता. परंतु आतां त्याचा अहंभाव मोक्षानंदाचे अग्नींत भस्म झाला आहे. आतां त्याचा वेगळा भाव उरलेला नाहीं. कारण आतां त्याच्या इच्छा, त्याचा निजाविर्भाव, त्याची क्रियासृष्टि ह्या सर्व त्याच्या हृदयसख्याच्या, आत्मसख्याच्या झाल्या आहेत.

तुम्हांला मोक्षानंदाचा मार्ग दाखवावा, तुमचे हृदय उघडावें आणि अंतरात्म्यांत तुमचा प्रवेश करवावा व तेथें सत्य तुमचें तुम्ही शोधून घ्यावें हा माझा हेतु आहे. आणि म्हणून तुम्हांस मी सांगतो, कीं सर्व वस्तु सोडा, तुम्ही बंधन करणारे ग्रंथ टाका, मनाला सांच्यांत कोंडणारीं शास्त्रें टाका, मनाला कुंपण घालणारीं कर्मे टाका, अंतरंगांत जाण्यासाठीं स्वतःचे स्नेही सोडा, कुटुंबें सोडा.

जर तुम्हाला आंत जाणें असेल आणि आकाशांतल्या एकट्या एक ताऱ्यासारखें तें सत्य शोधून घेणें असेल तर, तुमचे देव आणि ते देव मागतात ते मंत्र तंत्र व विधि यांचा त्याग केला पाहिजे; कां कीं, हें सर्व अवडंबर घेऊन आंत शिरूं जाल तर त्यांच्या जाळ्यांत गुंताल. तुमचें पूजेचें देऊळ तुमचें कारागृह बनेल. तुमचे भोळे भाव, सिद्धान्त व मतें तुमचे पाय बांधतील. ह्यांच्या अडचणींतून सुटण्यासाठीं तुम्ही त्या सर्व गोष्टींचा त्याग केला पाहिजे. मी जाणतो कीं पुस्तकांचेआड, पंथ-सिद्धान्त-दैवते-विधिविधानें ह्यांचे आड लपणे सोपें व सुखाचें असतें. परंतु त्यांच्यांत

अडकलां आहांत तोंवर तुमचें मन संकुचित रहाणार, तुम्ही बद्ध रहाणार आणि अशाश्वत सुखदुःखाचे झोंके खाणार. पण दाट धुक्याच्यामधून मनुष्य जसा पलीकडे जातो त्याप्रमाणें या सगळया गोष्टी पाठीमागे टाकून तुम्ही पुढे सरसावलां व अंतरंगांत प्रवेश करून तेथें तुम्हांस सत्य सांपडलें म्हणजे तुम्ही तात्काळ त्याचें अंग बनाल. मग तुम्हाला काठ्यांची, कुबड्यांची गरज नाहीं. पण त्या कामाला सामर्थ्य पाहिजे, दृढनिश्चय पाहिजे, त्या उद्योगाच्या आनंदांत मनुष्य गर्क झाला पाहिजे. हें साधें सत्य उमजण्यासाठीं तुम्ही तुमचा संकुचितपणा, क्षुद्रपणा, क्षुद्र ज्ञान टाकून दिलें पाहिजे. तुमचें मन भानगडींनीं भरलें आहे म्हणून तुम्ही सत्यावर त्या भानगडी चढवतां. तुमच्यापाशी पुस्तकी ज्ञान आहे, ग्रथांचे प्रामाण्य आहे, तेव्हां त्या सत्यावर पुस्तकीज्ञान व ग्रंथांचें प्रामाण्य तुम्ही लादूं पहातां.

म्हणून मित्रा, जर तुला तें सत्य शोधायला शिकायचें असेल, अग्निज्वालेसारखे नित्य नाचत असणारें, सदा मनाला मोहविणारें, जीवनसार्थक करण्यास नित्य नवा उत्साह देणारें तें सत्य ज्या मंदिरांत रहाते त्यांत प्रवेश कर्तव्य असेल, तर सर्व वस्तु सोडून देऊन, सर्व वस्तु बाजूस सारून आपल्या अंतर्यामीं शिरले पाहिजे. सर्व वस्तूंचा त्याग फार कठीण आहे. त्या सत्याचा विजय फार कठीण आहे, ह्यामुळें तुम्हाला कुबड्या लागतात. देवळांत एकान्त साधणे सोपें; पर्वतशिखरावर एकान्तांत एकटे रहाणे फार कठीण. शान्त स्थितींत, निर्बान्तपणा असताना मधूनमधून क्षणभर पर्वतशिखर दिसेल, प्रसंगीं हृदयांत प्रवेश होईल, सत्याचा स्पर्श होईल; परंतु त्या सत्याला पक्के चिकटून बसण्याला महानिश्चय लागतो. कारण ज्यांचा आनंदाच्या राज्यांत शिरकाव झालेला नाहीं, ज्यांनीं त्या स्वातंत्र्याचा रस चाखला नाहीं, त्यांना त्या सत्यापेक्षां हे मिथ्या जगच फार सत्य वाटतें. ह्यामुळें तुम्हांला क्षुद्र आधारांची आवश्यकता पडते. परंतु शेवटीं सर्वांचा संगम होतो. तुम्ही ह्या मंदिरांतून या, की त्या आश्रमांतून या, येणार सर्व एकाच गतीला. ही परमगति ज्यांनीं पाहिली, त्यांचा उद्देश, त्यांचा निश्चय, त्यांचें कर्तव्य हेंच ठरते की बाहेर जावें, आणि ज्यांनीं ती गति पाहिली नाहीं, भोंवली नाहीं, ज्यांना ह्या गोष्टींचा गंध नाहीं, त्यांना जीवनदान करावें.

— ५ —

आतां आपल्या समागमाची आणखी एक उद्यांची संध्याकाळ उरली आहे. ती गेल्यावर हा मेळा संपेल. म्हणून माझी इच्छा फार आहे कीं येथून जाण्यापूर्वी, मी जें कांहीं सांगत आहें, त्याचा तुम्ही बोध, उमज करून घ्या. सत्य कसें येतें, तें कोठें असतें आणि त्याच्या प्राप्तीचा उद्योग कसा करायचा हें तुम्हां सर्वांना आतांपर्यंत समजलें असलें पाहिजे. सत्य शोधीत असतां साहजिक तुम्हीं स्वास्थ्य मागत असतां; पण स्वास्थ्यापेक्षां समजूत मागणें श्रेयस्कर. स्वास्थ्य येतें जातें, समजूत टिकते. कां कीं समजूत म्हणजे अनुभवाच्या तळाशीं राहिलेले सत्त्व होय. समजूत म्हणजे प्रौढपणापासून, पक्वतेपासून, विचारापासून, सुख व दुःख यांपासून येणारें शहाणपण होय. स्वास्थ्य गोड लागतें. ते मनाला गुदगुल्या करणारें असतें, समाधान देतें. पण स्वास्थ्य माणसाला सत्त्व देत नाहीं जीवाला संपन्न करीत नाहीं; तें नुसतें कोंडल्या पाण्यासारखे नासते आणि त्याची मनावर हिरवी शेवाळ धरते.

मला मोक्ष व आनंद मिळाला तो दुःखांतून, क्लेशांतून, अनुभवांतून मिळाला; सर्व वस्तूंचा त्याग केल्यावर मिळाला; पूर्वीं पूजीत असलेलीं दैवतें सोडलीं म्हणून मिळाला. आणि मला तो मिळाला आहे म्हणूनच तो तुम्हांला देण्याची मला उत्कंठा आहे.

सत्य सहसा समजत नाहीं. सूर्याकडे दृष्टि लावायला डोळे सुदृढच पाहिजेत. तसे समर्थ डोळे फार थोडयांचे असतात. म्हणून माणसांना रंगीत आरशा लागतात. सत्य डोळे दिपवितें म्हणून, सत्य अति प्रखर असतें म्हणून, सत्य संघटना करणारें पण आधीं संहारकरणारें असतें म्हणून, केवळ शुद्ध रूपांत, अगदीं नग्न—आवरणरहित रूपांत सत्य तुम्हांला नको असते. म्हणून तुम्ही त्यावर पुढे आवरणें चढवतां. त्याला कर्णमधुर गोड नांवें देतां; त्याने तुमचें समाधान होतें. हें सर्व मी जाणतों; कां कीं, हें सर्व मी केलें आहे. डोळे न दिपावे म्हणून रंगीत आरशी लावावी आणि स्वतःला फसवावें हेही माझ्या वांट्यास आलें आहे. पण शेवटीं, दुःखामुळें, क्लेशामुळें, समजूत प्राप्त व्हावी या उत्कंठेमुळें, सारख्या त्या आग्रहामुळें, मला रंगीत चष्मा टाकणें भाग झालें. सत्यप्राप्ती व्हायला आधीं समजूत स्वच्छ असली पाहिजे. ती झाली म्हणजे सत्य मिळतें.

सर्वांच्या अंतरंगांत आणि माझ्या अंतरंगांत जें सत्य बसत आहे तें मला मिळालें आहे. सर्वांचे आंत आणि माझे आंत रहातो तो आनंद मला मिळाला आहे. सर्वांच्या अंतर्यामीं आणि माझ्या अंतर्यामीं जी मुक्ती आहे ती मला लाधली आहे. आणि ते सत्य तुम्हाला मी द्यायला हवें असेल तर, पूर्वग्रहांनीं अल्प ज्ञानाने, क्षुद्र सुखांनीं व दुःखांनीं, रंगवलेल्या आरशा तुम्ही टाकल्या, पाहिजेत.

तुला स्वास्थ्य हवें, सत्त्व हवे, ज्ञान व शहाणपण हवें; पण मित्रा, ते ज्ञान, तें सत्त्व, ते शहाणपण तुला त्याच वेळीं मिळेल, कीं जेव्हां तूं सत्य अगदी नग्न रूपांत पाहूं शकशील, जेव्हां त्या सत्याशी एकजीव होशील तेव्हां सत्यांतच बसति करिशील. पण ज्यांना हें सत्य, हे मोक्षानंदाचें सत्य कळायला पाहिजे असेल, त्यांनीं पूर्वीं सांचवलेल्या, पूर्वींपासून वाढत जाऊन सत्याला झांकणाऱ्या सर्व वस्तु टाकल्या पाहिजेत. माझी इच्छा ही की तुम्ही तें सत्य आपले आपण शोधून काढावे, स्वबुद्धिचें सत्य, स्वतःच्या निर्माणशक्तीने मिळवावे. कारण तुमची बुद्धी—निर्माणशक्ति आणि माझी बुद्धि—निर्माणशक्ति ह्या एकच आहेत. दुसऱ्याचें प्रामाण्य हा ढग आहे. तो अंधार देतो, उजेड देत नाहीं. तो पर्वताचें अंग झांकतो. म्हणजे त्यानें तुमचे उपास्य ध्येय दृष्टीआड होते. तुमच्या मनांत सर्व गोष्टी उघड्या, स्वच्छ, रेखीव अशा असल्या पाहिजेत; तरच तुम्हालां सत्य प्राप्त होईल.

कांहीं तरी चुकेल, अंतरेल, अशी धास्ती तुमच्या मनाला नसावी. पुष्कळांना साहजिक भय वाटतें, कीं चुकीच्या समजुतीमुळें किंवा समजूत न झाल्यामुळे आपल्याला आत्मसख्याचे ऐश्वर्य दिसणार नाहीं. पण मित्रा, तुला जर तें ऐश्वर्य पहायचे असेल, आत्मसख्याचे मुखदर्शन हवे असेल तर तुझे हृदय शुद्ध व मन निर्भ्रान्त असलें पाहिजे. तरच तुला विवेकाचें सामर्थ्य येईल, निवड करण्याचें सामर्थ्य, क्षुद्र, नश्वर, वस्तूंच्या त्यागाचें सामर्थ्य येईल.

म्हणून माझें तुम्हांला सांगणें आहे कीं, स्वास्थ्याची लालसा धरूं नका. समजुतीची धरा; कारण समजुतीनें अंगीं तारतम्य येतें, समजुतीनें सहिष्णुता येते, प्रीति येते. ह्यांच्याविना जो सत्य शोधूं जाईल तो करंटा. तो आपल्या हातानें आपले पायांत बेड्या घालणार ! म्हणून मी तुम्हांला सांगतों तुमच्यापाशीं समजूत असूं द्या. अमुक एक ठराविक मतें, सिद्धान्त, शास्त्राधार व

भोळे भाव नकोत. तेव्हांच तुम्ही लोकांस सहाय्य करूं शकाल, आत्मसख्याचे खरे शिष्य व्हाल; आणि तो आत्मसखा तुमचे संनिध राहील.

सगळ्यांसारखा कृष्णमूर्तीहि पूर्वी शोध करीत होता, बाबावाक्यं प्रमाणम् मानून भजनपूजन करीत होता. परंतु जसा काळ लोटला, दुःख आलें, तसें, मूर्तीच्या मागें, प्रतिमेच्या मागे, सूर्यास्ताच्या मागें, सर्व धर्मांच्या मागे, सर्व तत्त्वविचारांच्या मागें, सर्व पंथाच्या मागें, सर्व संस्थांच्या मागे जें सत्य दडून आहे, त्याच्या दर्शनाची त्यास इच्छा झाली. त्याला असत्याची, मिथ्याची खुंटी धरून लोंबावें लागलें आणि शेवटी हळु हळु अटक करणारीं सगळीं देवळें, व आमची पूजा करा, असा आग्रह करणारीं सगळीं दैवते, ह्यांचेपलीकडे तो गेला. असा पलीकडे जाऊन तो सर्व धर्मांची, सर्व प्रेमांची जी परमगति, परमफल, त्याप्रत पोहोंचला. तेथें भजन पूजन संपतें, वासना संपते; आणि विभक्त जीव नाश पावतो व शुद्ध होतो. ह्या सर्व पायऱ्या मी चढलो आहें; म्हणून अनुभवाचे अधिकारानें, स्वानुभवाचे आधारानें मला हें सांगतां येतें. त्यांतलाच अनुभव व तें ज्ञान तुम्हांला द्यावे ही माझी इच्छा.

वाटाड्या पर्वतावरची जवळची वाट जाणतो. जरी तींत संकटे असलीं मोठाले पहाड चढावे लागले, पुष्कळ खड्डे असले तरी तुम्हांला जर स्वतः त्या वाटाड्यासारखे व्हावयाचे असेल, तर त्या जाणत्या वाटाड्याच्या मागोमागच गेलें पाहिजे. तरी पण तुम्ही भोळेपणाने, अंधविश्वासाने आंधळ्यासारखे अनुसरूं नका. तर, स्वतःच्या सत्यजिज्ञासेने, स्वकष्टाने, बंधक विषयांच्या बेड्या व दुःखाचे पाश तोडण्याच्या स्वतःच्या इच्छेनें तुम्ही अनुसरा. तुमच्या हृदयांत सत्य बसत आहे, आत्मसखा बसत आहे. तेथें आंत माझेमागोमाग जाण्याची तुमची इच्छा असेल तर, तुमचें मन समजुतीनें सुसंस्कृत झालेलें हवें, ज्याला पूर्वग्रह नाहींत, जे बांधलेलें नाहीं, महत्पदाकडे जें संकुचित दृष्टीने पहात नाहीं असे तें पाहिजे. कारण पूर्वग्रह सूर्याला झांकणाऱ्या ढगासारखा असतो. तो सत्य लपवतो, उघडें करीत नाहीं. पण बहुतेक लोकांना ढगाच्यावर, जेथे आपले व सूर्याचेमध्यें कांहीं पडदा नाहीं, तेथें रहाणें आवडत नाहीं; ढगाचेआड रहाणे त्यांस आवडतें. तेव्हां जर तुमचें मन पूर्वग्रहरहित, लघुत्वरहित, आणि सुजाण असेल, तर सत्य येईल; सत्य आपले घरीं तुम्हांला बोलावून नेईल. सत्याचें घर तुमचेंच हृदय व तुमचेच मन होय.

आणखी तुमचें हृदय शान्त असलें पाहिजे आणि प्रेमळ असलें पाहिजे. तथापि तें व्यक्तिसगरहित, अलिप्त पाहिजे. प्रेम अत्यावश्यक आहे. कारण प्रेमानें तुमचें हृदय मोठें होते, विकास पावते; आणि जसा खुल्या आकाशांत पक्षी सदा आनंदी रहातो, तसे प्रेमामुळे तुम्ही रहातां. तसें प्रेमानें भरलेलें तुमचें हृदय आनंदी झाले पाहिजे; पण प्रेमाने परिपूर्ण असले तरी एका व्यक्तीस न चिकटणारें, अलिप्त असें तें असले पाहिजे, आणि एका व्यक्तीवर किंवा समुदायावर नाहीं तर सर्वांवर प्रेमवृष्टि करण्यास समर्थ असे झाले पाहिजे.

तुम्ही आपलें शरीर शहाणपणाने निकोप केले पाहिजे. कारण शरीर निर्मळ, निर्दोष नसेल तर प्रकृति वाईट होईल. जेव्हां तुमचे विचार, भावना व शरीर पूर्णपणें परस्पर सहकारी व सहायकारी होतील, एकमेकांचें उत्तेजन व विकास करूं लागतील, तेव्हां सत्यापासून तुम्हाला दूर ठेवणारा पडदा फाटून जाईल. मग तुमचें अभीष्ट तुमचेपाशीं येईल, सांचिक पाण्यांतले स्वास्थ्य नव्हे तर समजुतीपासून मिळणारें स्वास्थ्य येईल. रानांत जेथें फारसा वारा वहात नाहीं,जेथें कोणी रहात नाहीं,तेथें आंतलें पाणी वहात नाहीं असे सांचिक पाण्याचें स्थिर डबकें असावें, वर हिरवें शेवाळ दिसत असावे; अर्थात् आंत चिटपांखरूं उतरत नाहीं, कोणी प्राणी पाणी पीत नाहीं, माणसाचे मन जेथें रमत नाहीं, देवलोकाचें, अनंत आकाशाचें, उडत्या पक्ष्याचें प्रतिबिंब ज्या डबक्यांत दिसत नाहीं; तशी स्वस्थपणानें सुखावलेल्या मनाची, भावनेची, शरीराची स्थिति होते. परंतु मला समजूत आली पाहिजे अशी तुम्ही इच्छा धरा, आपल्या आंत बसणाऱ्या सत्याच्या प्राप्तीची इच्छा धरा, कीं तत्क्षणीं तुम्ही नाचऱ्या समुद्रजलासारखे व्हाल. मध्यें मध्यें शान्ति-स्वस्थताही तुम्हांला मिळेल, तरी पण तुम्ही नाचत बागडत समुद्राला मिळायला जाणाऱ्या नद्यांसारखे व्हाल. तेव्हां माझ्याठिकाणीं वसणारे सत्य अनुसरावें अशी ज्यांची इच्छा असेल त्यांनीं आपल्या सुखांत आणि आपल्या दुःखांत, आपल्या स्वतःच्या समजुतींत, आपल्या अनुभवांत आपलें शहाणपण शोधलें पाहिजे. अज्ञ मुलाला चित्र देण्याचा काय उपयोग ? त्याला त्यांतलें सौंदर्य काय कळणार ? पण तेंच एखाद्या खऱ्या कलावंताला द्या; चित्रांची मार्मिक अभिरुचि असणाऱ्या मनुष्याला द्या. तो त्याचा रसास्वाद घेईल. तो त्याची नक्कल करूं इच्छिणार नाहीं; तर

आपल्या परीनें, आपल्या पद्धतीनें तें आपलेठायीं निर्माण करूं इच्छील. तुम्ही नक्कल करूं जातां म्हणून दुःख पावतां, तुम्ही प्रामाण्याचा आधार धुंडूं लागतां, त्यानें संकट येतें. पण जर तुम्ही समजुतीची इच्छा धराल, सह-कार्याची इच्छा धराल, त्या समजुतीला अनुसरून नवसृष्टि करण्याची इच्छा धराल; तर तुम्हाला संकट येणार नाहीं, तुम्हांला शान्ति लाभेल, आत्मसख्याच्या अखंड समागमाचें सुख तुम्ही आपलेठायीं स्थापन कराल. आणि मित्रा, आपण जो हा अल्प काळ एकमेकांच्या समागमांत घालवला, त्यांतही ज्ञान असणाऱ्या कांहीं जणांना, (अद्भुत गोष्टीचे ज्ञान मी म्हणत नाहीं.) तरी ती समजूत आली असेल; त्याजवर त्या समजुतीशीं सहकार्य करण्याची जबाबदारी आहे. लहान ज्वालेला लांकडे लावलीं म्हणजे मोठा अग्नि होतो. तद्वत् जर सत्यैश्वर्याचा अंकुर तुमचेठायीं आला असेल तर तुम्हाला त्याची पूर्ण वाढ करतां येईल. किंवा तुम्ही असेहि करूं शकाल, कीं,—असती ज्वाळा आज विझूं द्यावी, आणि वाट पहात बसावें कीं, हा कल्प जाईल, पुढला कल्प येईल, मग ज्वाला पुनः पेटेल, आणि त्या वेळीं ती आम्हाला ऊब देईल, सुख देईल, आमच्या मनाला पुष्टि देईल, दुःखित हृदयाला शान्ति देईल!

— ६ —

एकदां एकेठिकाणीं एक पर्वत होता. त्याचें शिखर ढगांचेवर उंच गेलेलें, अर्थात् अदृश्य होतें. त्याच्यासभोवतीं विस्तीर्ण प्रदेश, व अगणित दरीखोरीं होतीं. त्याचे शिखर शोधण्यासाठीं जगाच्या सर्व भागांतून लोक जमले होते. नाना राष्ट्रांचे, नाना प्रकारचे लोक त्या पर्वतावर जे सत्य होतें, त्याच्या शोधार्थ आलेले होते. कोणी डोंगरावरील वृक्षवनस्पती व पशुपक्षी ह्यांचे परीक्षणासाठीं आलेले होते, कोणी पर्वताची उंची, घेर, सावलीची लांबी, थरांचें रूप व घटना, इत्यादिकांची शास्त्रीय रीतीनें परीक्षा करण्यास आलेले होते. कांहीं लोक ह्यासाठीं आलेले होते कीं पर्वताची पूजा करावी, त्याच्या भव्य दर्शनाचें सुख भोगावें, त्याची मूर्ति स्मृतीवर कोरावी व घरीं जाऊन ती भक्तिभावानें हृदयांत बाळगावी. कित्येक त्याचें चित्र रंगविण्यासाठीं आले होते. कित्येक त्याचा फोटोग्राफ काढायला आले होते. कोणी त्यावरचीं मातीचीं ढेंकळें व दगड घरीं घेऊन जाण्या-

साठीं आले होते. कोणी त्याचेभोंवतीं कांहीं विधिविधान करायला आले होते; कांहींजण तो पर्वत अस्तित्वांत आहे हें सत्य इतरांना सांगावें म्हणून आले होते; कित्येक तेथें येऊन ओरडून बोलत व हंसत आणि आपलाच प्रतिध्वनी त्यांस पर्वताकडून ऐकूं येई. दुसरे कित्येक ज्ञानाच्या इच्छेनें आणि आपल्या सर्व संकटांच्या निवारणाचा उपाय मिळावा म्हणून आलेले होते. पण त्या पर्वताचें शिखर मेघांच्या वर, देवलोकाजवळ गेलेलें होतें. आणि जे त्याच्या शिखरावर आरूढ झालेले आहेत, आणि तेथून सर्व जनतेचा सर्व वृत्तींचा, सर्व मैदानें व दऱ्यांचा संपूर्ण देखावा ज्यांना दिसत आहे असे त्याच्यावर चढून गेलेले लोक अगदींच थोडे होते. तसें सत्य आहे.

तुम्ही जे चाळीस वेगवेगळ्या देशांतून येऊन येथें एकत्र झालां आहां, ते सत्य शोधावें, सत्याची उपासना करावी म्हणून आलां आहां. पण तुम्ही आपल्या समजुती, आपल्या शंका, आपला उत्साह व आपापल्या बुद्धी बरोबर घेऊन आलां आहां. आणि मी ऊर्ध्वहस्तानें जी घोषणा तुम्हांसमोर करीत आहें तिचें शोधन व ग्रहण करूं पहात आहां. तुम्ही त्या सत्याच्या—माझ्या—दर्शनासाठीं आलां आहां; आणि येतांना कांहीं ज्ञान, कांहीं पूर्वग्रह, कांहीं विवेक, व सत्यास विकृत करणाऱ्या कांहीं कल्पना इतकें बरोबर घेऊन आलां आहां. पर्वतशिखरावर चढूं इच्छिणारा मनुष्य, समग्र सत्य आणि तेंही त्याच्या नग्नस्थितींत त्याच्या सर्वांगपरिपूर्ण रूपांत जाणूं इच्छिणारा मनुष्य, खंबीर असला पाहिजे. आपलेठायीं सत्य सांठविण्याला व तें धारण करण्याला त्याचें हृदय बळकट असलें पाहिजे, त्याचें मन जोरदार असलें पाहिजे, आणि सत्याचें दैदीप्यमान ऐश्वर्यदर्शन करण्याला त्याचे डोळेही सुदृढ असले पाहिजेत. जे लोक मूर्ति पुजायला, पर्वतावरचे खडक पुजायला येतात ते त्याचा काय तो एक भाग पहातात आणि आपलें क्षुद्र ज्ञान, क्षुद्र शहाणपण, क्षुद्र समजूत हेंच सर्व ज्ञान आहे असा पक्का भ्रम घेऊन घरीं जातात. पण जर तुम्हांला संपूर्ण सत्य, केवल-सत्य—त्याच्या अगदीं अगाध साध्या रूपांत—प्राप्त झालें नाहीं तर तुम्ही सत्यरूप होणार नाहीं. सत्याचा एक भाग म्हणजे संपूर्ण सत्य नव्हे. सत्याची एक बाजू कळल्यानें संपूर्ण सत्याची परिपूर्ण समजूत माणसाला येत नाहीं.

माझेठायीं जें सत्य वसत आहे, व जें जन्मानुजन्म, शतकानुशतक

आत्मसात् करून आपले हृदयांत स्थापण्यास मी शिकलों आहें, तें संपूर्णपणें तुम्हांला द्यावें ही माझी फार इच्छा आहे. तुम्ही नाना देशांतून आपापल्या नानामनोवृत्ति, आपापल्या बेगळ्या समजुती, आपापलें बेगळें ज्ञान येथें घेऊन आलां आहां; ह्यामुळें तुम्ही हें सत्य पूर्णपणें स्वीकारण्याला, त्याच्या केवळ नग्नरूपांत, त्याच्या अगदीं साध्या स्वरूपांत तें तुम्हांला कळावयाला, अगोदर मनाची शुद्धि व हृदयाची शान्ति साधली पाहिजे. तुमची सर्वांची इच्छा अशी असते, कीं तुमच्या सुखांच्या, तुमच्या दुःखांच्या, कष्टांच्या धांवत्या छायेला तत्काळ कांहीं औषध मिळावें. पण तें औषध बाहेरून मिळणारें नसतें; तें आंतच, तुमच्या स्वतःच्या बुद्धींत, तुमच्या स्वतःच्या समजुतींत, तुमच्या शहाणपणांत बसत असतें; त्यामुळें तुमची निराशा होते. तुम्हांला सत्य पूर्णपणें कळत नाहीं, त्यामुळें तुमचा गोंधळ होतो, शंका व संशय उठतात, युगायुगीं तुम्ही दुःख, सुख व इतर गबाळ सांठवलें आहां, आणि आतां तुमचें म्हणणें असें कीं सत्याचें ओझरते दर्शन होतांच क्षणांत तें सर्व भस्म होऊन जावें ! हें कसें व्हावें ? मूळ उगमापाशीं घाण कालविलेली, मग नदी शुद्ध, निर्मळ, पवित्र कशी रहावी ? तेव्हां तुम्ही परत मूळ ठिकाणीं गेलें पाहिजे, आणि तेथून पूर्वीं चढलेल्या पायऱ्याच पुनः नव्याने चढूं लागलां पाहिजे. मनांतल्यामनांत त्या पायऱ्या पुनः चढा व प्रत्येक पायरीचें प्रयोजन नव्यानें समजून घ्या; म्हणजे पर्वतावर एकान्तांत देवदारवृक्ष जसा सरळ सोंट सुदृढ वाढतो तसे तुम्ही वाढाल; पण ह्याला सर्वसंगपरित्याग पूर्ण झाला पाहिजे. अधिक मोठीं दुःखें, अधिक मोठीं सुखें, अधिक मोठ्या आनंदोर्मि यांचा अनुभव आला पाहिजे. तरच तुम्ही, मनुष्य-मतीच्या मेघांच्यावर ज्याचा माथा गेलेला आहे अशा त्या पर्वतशिखरावर आरूढ व्हाल; म्हणून, सर्व लोक जेथून चढूं लागतात, त्या पहिल्या पायरीपासून तुम्हीही चढण्याला आरंभ केला पाहिजे. त्यांतच ज्ञान आहे, त्यांतच शहाणपण आहे, हृदयांतली आणि मनांतली समजूतही त्यांतच आहे. जर तुमचे मन पवित्र व हृदय निर्मल नसेल, जर तुमचें मन सुजाण आणि तुमचें हृदय प्रेमानें, सहानुभूतीनें भरलेलें नसेल, तर मग तुमच्यामागें केवढाही आधार, अधिकार, असो, तुमच्यापाशीं ग्रंथांचें व गुरुप्रसादाचें केवढेंही पांडित्य असो, उन्हाळ्यांतील झाडाच्या पानासारखें तें सर्व शुष्क होऊन जाईल.

तेव्हां शहाणपणा व सत्य यांच्या शिखरावर जे चढूं इच्छितील, त्यांचें संपूर्ण स्वरूप, त्यांची संपूर्ण थोरवी व साधेपणा यांचें जे आकलन करूं इच्छितील त्यांनीं आपलें मन व हृदय शुद्ध, दृढ व उत्कृष्ट ठेवलें पाहिजे. तसें करण्यासाठीं तुम्हीं नेहमीं आपण आपली परीक्षा केली पाहिजे, गुणदोष पाहून एकसारखे स्वतःमध्यें फेरफार केले पाहिजेत, सावध राहिलें पाहिजे, पूर्ण व महान् रूपांत सत्याचा पुरा बोध होण्याला, आधीं तुम्ही बलवान् , सुजाण, अनुभव—ज्ञानसंपन्न मनुष्य बनलेंच पाहिजे. जेथें सत्य बसतें, त्या उंच शिखरावर चढण्याची इच्छा असेल तर तुम्हीं आपल्या सर्व विचारांवर पहारा ठेवला पाहिजे, सर्व कृतींवर व सर्व प्रीतीवर पहारा ठेवला पाहिजे. कारण त्या सत्याच्याच प्रमाणांत जर या गोष्टी शुद्ध नसतील, निर्मल नसतील, जोरदार नसतील तर त्या बंधन करतील; आणि दुबळ्याला खांद्यावर घेऊन का कोणी पर्वतावर चढवूं शकेल ? ज्याचें त्यानें आपल्या बळावर चढलें पाहिजे. बळ नसेल तर आपलें आपण स्वतःच्या अंतरंगांतून तें आणलें पाहिजे; आणि म्हणून, क्षणिक दुःखक्लेशांचा, अशाश्वत प्रीतीचा व वासनांचा अंत करणारें तें सत्य ज्यांना हवें, त्यांचें हृदय सबल, शुद्ध व निर्मल झाले पाहिजे. तुमचेपाशीं शहाणपण पाहिजे, अनुभव पाहिजे, वाट दाखविणारी आत्मवाणी पाहिजे. हीं नसतील, तर पुष्कळ दिवस उजाडतील व पुष्कळ मावळतील, पुष्कळ वर्षें लोटतील, तरी तुम्हाला सत्य दिसणार नाहीं. आणि ते गुण मिळविण्यासाठीं तुम्ही शंका घेतल्या पाहिजेत, प्रत्येक कार्याला व मनांत उद्भवणाऱ्या प्रत्येक विचाराला हटकलें पाहिजे. निजान्तरीं बसणारें ते सत्य प्राप्त होईपर्यंत कदापि समाधान मानतां कामा नये. तो निश्चय अनिश्चयाचे, शंकेचे पोटीं मात्र जन्मणारा आहे. त्याला आधीं स्वतःचे उद्देशाविषयीं, स्वतःचे ध्येयाविषयी, स्वतःचे निर्धाराविषयीं संशय असला पाहिजे. मग अनिश्चयांतून अशा रीतीनें उपजलेला निश्चय अढळ असतो, अगाध असतो, जोरकस आणि ध्येयाची पाठ पुरविणारा असतो.

तसेंच, प्रामाण्याचे आधाराविषयींही सावध रहा. त्या आधारानें क्षणभर आराम मिळेल. पण त्याला शाश्वती नाही. तो आधार म्हणजे सत्य नव्हे, तो कायम टिकणारा नव्हे. ती निरभ्र आकाशांतील ढगाची सावली दोन घटकेंत निघून जाईल आणि तुम्हाला प्रखर उन्हाचे चटके खात ठेवील.

म्हणून तुम्हाला जर तुमचें स्वतःचें, स्वानुभवाचें, स्वतःचें निर्मिलेलें ज्ञान हवें असेल, तर तुम्ही आपले हृदयांत जा. तेथें सांचवलेले सर्व पदार्थ, सर्व घाण स्वच्छ धुवून काढा; आणि मग, जसा सकाळचा सूर्य उदयास येऊन आपल्या उष्ण किरणांनीं धुकें नाहींसें करतो, तसें हळू हळू तुमचेठायीं पर्वतशिखर गांठण्याचें सामर्थ्य, निश्चय, दृढ संकल्प, हीं उदय पावतील. त्यांत मात्र खरें स्वास्थ्य आहे; कारण जें तुम्ही स्वतःच्या अनुभवानें, स्वतःच्या ज्ञानानें संपादन करतां तेंच शाश्वत व कायमचें होतें. तुम्ही स्वहस्तानें, स्वतः दुःख भोगून, स्वतः कष्ट सोसून जे निर्माण कराल, त्याचा कोणीही नाश करू शकणार नाहीं. त्यापासून उदात्त जीवनाची आकांक्षा उत्पन्न होते. कारण उदात्त आकांक्षा, तुमचें हृदय नाहीं तर दुसरे कोण देऊं शकेल ? मनुष्याचें स्वतःचें मनच "शान्तीचा मार्ग, मोक्ष—आनंदाचा मार्ग तूं चोखाळ" अशी टोचणी लावील, असा नेट लावील; दुसऱ्याचें मन तें कसें करू शकेल ? दुसरे लोक धीर देतील, किंवा उमेद खचवितील; पण मार्ग चालण्याचें सामर्थ्य तुमचेच हृदयांत असले पाहिजे; तो निर्धार तुमचेचठायीं, तो शहाणपणा तुमच्याचअंगीं असला पाहिजे. जर तुम्हाला त्या सत्याची प्राप्ती हवी असेल, त्या सत्यज्ञानांत पारंगत होणें असेल, तर तुम्हाला ह्या संन्यासमार्गानें गेलें पाहिजे आणि कवडीमोल वस्तु बाजूस सारल्या पाहिजेत, महाज्ञान मिळविण्यासाठीं स्वतःचें अल्पज्ञान टाकलें पाहिजे, अधिक शहाणपण मिळविण्याकरितां तुमचें चिमुकलें शहाणपण बाजूस केलें पाहिजे; आणि अशा रीतीनें, जेथें सशयाचे व गैरसमजाचें अभ्र नाहीं, जेथें मति विकृत होण्याचा प्रश्न नाहीं, मिथ्या विचार, मिथ्या भावना, चंचल प्रीति ह्यांचा संबंध नाहीं, असें तें निजधाम तुम्ही गांठलें म्हणजे तें सत्य तुमच्या स्वाधीन होईल, मग तुम्ही खरोखर माझ्यासारखे व्हाल. आत्मसखा व्हाल.

तेव्हां दूर देशांतून तुम्ही येथें ज्या ज्या भावनेनें आलां असाल त्याप्रमाणें तुम्ही कोणी पर्वताची पूजा कराल, कोणी त्याचा फोटोग्राफ घ्याल, कोणी तेथले माती, धोंडे गोळा करून घरीं न्याल, कोणी पर्वतासभोवतालचे देव, यक्ष-गंधर्व त्यांची परीक्षा कराल. परंतु जे पर्वतशिखरावर चढतील ते पर्वताशीं सायुज्य पावतील, जे शिखरारूढ होतील ते दुसऱ्या माणसांना दान करणें, सहाय्य करणें, त्यांना मुक्त करणें या गोष्टींचा सुख-

सोहळा भोगतील. म्हणून नाना देशांतून आलेले मित्रहो, ह्या पर्वतपूजेचा कोणता प्रसाद परत घरीं घेऊन जावें ह्याविषयीं सावध रहा. अंशसत्य घेऊन जाणार कीं पूर्णसत्य घेऊन जाणार ह्याची काळजी घ्या. आणि आज जर तुम्ही अंश घेतला असेल तर अगदीं शिखर गांठावें, आत्मसख्याशीं एक व्हावे, सत्यरूप व्हावें, ही इच्छा, ही जागती ज्योत हृदयांत ठेवा. आणि जेव्हां मजप्रमाणें तुम्ही ही पदवी पावाल, मजप्रमाणे आत्मसख्याशीं सायुज्य पावाल, तेव्हां तुम्ही त्या अक्षय जीवनामृताचे दुसऱ्यांना दान करूं शकाल दुःखितांचें दुःख हरण करूं शकाल, व जगाचे तारक व्हाल. आज तुम्ही दिवटीच्या उजेडांत चालत आहां. पण मी आपल्या हृदयांत तुम्हांला घेतलें आहे आणि तुम्हाला सूर्याचा प्रकाश देईन हा माझा संकल्प आहे.

आज ही आपली शेवटची संध्याकाळ. उद्यां तुम्ही नानादेशांना जाणार सत्याचा अंश घेऊन जाणार. तुम्ही आपल्या शिरावर केवढा भार घेऊन जाणार आहां याची तुम्हाला कल्पना नाहीं. तुम्ही स्वतःचे जीवन व लोकांचे जीवन अधिक सरस, अधिक संपन्न करायला जात आहां. तुमच्या हृदयांत सूर्य तुमच्या मनांत आल्हाद वसला पाहिजे, आणि तुम्ही शाश्वत पदार्थ निर्माण करायला, लोकांना अक्षय सुख देणारी नवसृष्टि निर्माण करायला पाहिजे. जो मोक्ष पावला, जो कृतकार्य झाला, जो संपूर्ण सत्य हस्तगत करून बसला त्याला वियोगाचें दुःख नाहीं, आणि तुम्ही सर्व माझेठायीं आहां म्हणून मला वियोग नाहीं. परंतु तुमचे हृदयांत मी नाहीं म्हणून तुम्हाला वियोग आहे व दुःख आहे. ज्यांना सत्याचे अल्पज्ञान असल्यामुळे सत्याचा विजय साधला नाही, जे सत्याचे अंग बनत नाहींत त्यांना वियोग आहे. परंतु जर तुम्ही आपल्या हृदयांत ते सत्य धराल समस्त साधनांचें परमसाध्य जो मी त्या मला आपल्या हृदयांत धराल, तर तुम्हाला वियोग होणार नाहीं. त्या पर्वतशिखराच्या आरोहणाची धडपड व झटापट चालू असतां, सुखांत व दुःखांतही ऐक्य नांदतें. तेव्हां मित्रा, जर तुझ्यापाशीं हें सत्य आहे, तर तूं कोठें हवे तेथें जा, तूं एकाकी होणार नाहीस तूं कधीं खिन्न, निरुत्साह होणार नाहींस, तुला कधीं बाहेरच्या समाधानाची भूक लागणार नाहीं; हें एक सत्य जवळ असल्यावर दुसऱ्या सत्याची आवश्यकताच पडणार नाहीं.

---